


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

Klee

Marc Chagall

J. Dubuffet

Alberto Giacometti

H. Matisse

G Braque

# नवी क्षितिजे

अनुक्रमणिका






# नवी क्षितिजे

संपादक
श्री. नाना जोशी

रचना
हर्मिष देव्हारे

अक्षरजुळणी
अभिजित पंडित

मुखपृष्ठ
अनेक नामवंत
चित्रकारांच्या स्वाक्षऱ्या.

मुद्रण व्यवस्था
विजय राणे
सीमा ऑफसेट, कळवा,
ठाणे.

मालक, मुद्रक, प्रकाशक
आणि पत्रव्यवहार

श्री. नाना जोशी
४ अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई – ४०० ०१२.

# नवी क्षितिजे

अंक त्रेपन्नावा २०००

## अनुक्रमणिका







## संपादकीय

नवी क्षितिजेचा हा ५३ वा अंक

या अंकात युरोपीय कलाक्षेत्रातील एका महाप्रचंड 'स्कॅम'चा श्री. माशेलकर यांनी परिचय करून दिला आहे. प्रख्यात चित्रकारांच्या कलाकृतींच्या प्रतिकृती तयार करून, त्या 'अस्सल' आहेत सांगून त्या विकणे हा 'धंदा' आता तसा चांगलाच जुना झाला आहे. पण येथे परिचय करून दिलेल्या 'स्कॅम' मध्ये आणखी एक विषेश आहे. चित्रकाराने कलाकृती निर्माण केल्यानंतर, त्या चित्राच्या इतिहासाला सुरुवात होते. उदा. हे चित्र कोणी काढले, कोठे व कधी काढले, ते निर्माण झाल्यानंतर ते चित्रकाराकडेच होते की ते त्याने कोणास विकले होते; पहिल्या प्रथम ते खरेदी केले गेल्यानंतर मागाहून ते केव्हा, कोणी व कोठे विकत घेतले, ते ज्या ज्या वेळी विकले गेले, तेव्हा त्याची किंमत किती होती, त्या कलाकृतीची एकंदर परिस्थिती, या सर्वांची अनुक्रमवार अगदी तपशिलात जाऊन नोंद ठेवली जाते. या सर्व माहितीला, PROVENANCE हा इंग्रजी शब्द आहे. हा तपशील त्या चित्राची कलावस्तूंच्या बाजारात किंमत ठरविण्याबाबत फारच उपयुक्त व मार्गदर्शक मानला जातो. या 'स्कॅम'चा सूत्रधार **ड्रेवे.** त्याने मुळातील प्रोव्हेनान्सच बदलून टाकण्याचे चातुर्य दाखविले. आजवर कोणालाच जे शक्य झाले नव्हते, ते त्याने 'सिद्ध' करून दाखविले. ही किमया ड्रेवे याने कशी केली, त्या सर्वांचा वृत्तांत या लेखात आहे. शिवाय 'अस्सल' चित्राला लोक आडमाप पैसा कां मोजतात? या लोकांच्या मानसिकतेचा मागोवा घेणारा लेख या 'स्कॅम'च्या लेखाचा उत्तरार्ध म्हणून देण्यात आला आहे. वाचकाला हे दोन्ही लेख नवी माहिती व दृष्टिकोन प्राप्त करून देतील असा विश्वास आहे.

**प्रा. मायकेला मान** यांच्या लेखावरून तयार केलेला 'लोकशाहीची काळी बाजू' या शीर्षकाचा लेख या अंकात आहे. हा लेख देण्याची दोन कारणे आहेत. **एक** - भारत स्वतंत्र झाल्यानंतर त्याने लोकशाही राज्यव्यवस्था स्वीकारली. एकीकडे आपण 'एक राष्ट्र' आहोत हे सिद्ध करताना, लोकशाही राज्यव्यवस्था स्वीकारणे आणि हे ध्येय साध्य करणे, ही कामगिरी किती अवघड आहे याची कल्पना आपल्या नेत्यांना नसावी. असल्यास त्यांनी आपल्या अनुयायांना या संबंधात बुद्धिपुरस्सर जागृत केले नसावे, हाच निष्कर्ष काढावा लागतो. या संदर्भात प्रिन्सटन विद्यापीठातील **प्रा. सिरील ब्लॅक** यांची आठवण प्रकर्षाने होते. एका अमेरिकन विद्यार्थ्याने असा प्रश्न उपस्थित केला की, 'लोकशाही राज्यव्यवस्था असलेल्या व शांततावादी भारतात एवढ्या प्रचंड प्रमाणावर हिंसा का होते? **प्रा. ब्लॅक** यांनी उत्तर देताना सांगितले की, "आपण अमेरिकन आणि युरोपीय - थोडक्यात सर्वच पाश्चिमात्यांना आपल्या स्वतःच्या इतिहासाचा विसर पडलेला आहे, म्हणून तू हा प्रश्न उपस्थित केला आहेस. अमेरिका 'एक राष्ट्र' म्हणून सिद्ध होण्याकरता एका यादवी युद्धातून गेला. इंग्लंडचा इतिहास

अनुक्रमणिका

वाचल्यास आपणास तेच आढळते. फ्रेंच राज्यक्रांतीत किती हिंसा झाली हे सर्वांनाच परिचित आहे. ह्या पार्श्वभूमीवर भारताकडे पाहिले असता, तेथे होणारी 'हिंसा' तशी भयावह नाही. याचा अर्थ असा नाही की तेथे 'हिंसा' होईलच वा ती व्हावी. पण ती झाल्यास ती का होते आहे हे आपल्या इतिहासावरून आ ःगास समजेल. थोडक्यात भारताला हसणे वा त्याला नावे ठेवणे यासारखा दुसरा मूर्खपणा नाही.'' इत्यादी. **दोन** - भारताच्या आजूबाजूच्या देशातून जे काही घडत आहे त्याचा अन्वयार्थ लावण्यास या लेखाची मदत होईल. उदा. फिलीपाईन्स (ख्रिश्चन विरुद्ध मुसलमान), इंडोनेशिया (मुसलमान विरुद्ध ख्रिश्चन), फिजी (फिजीचे मूळ रहीवासी विरुद्ध भारतीय), सॉलोमन आयलंडस् (मूळ रहिवासी विरुद्ध इतर) अशी जी यादवी चालू आहे, त्या भागाची कारणे व तिचे मूळ समजण्यास या लेखाची मदत व्हावी. भारतीय संघराज्यापुढे असणाऱ्या संभाव्य अडचणींची कल्पनाही येईल.

प्रख्यांत शास्त्रज्ञ **गॅलिलीओ,** त्यांची कन्या **मारिया सेलेस्ट** आणि तत्कालिन समाज, यांच्या संबधावर सौ. सुमती जोशी यांच्या लेखाने प्रकाश टाकला आहे.

न्यूझीलंडच्या मॅस्सी विद्यापीठातील प्राध्यापक, **रॉय डब्लू परेट्ट** यांच्या लेखावरून तयार केलेला 'इतिहास काळ आणि ज्ञान' - प्राचीन भारतातील हा लेख बरेच काही सांगून जातो. भारतीयांची अनैतिहासिकता आता सर्वांनाच इतकी चांगली मान्य झालेली आहे की ती जवळ जवळ गृहीतच धरण्यात येते. वस्तुस्थिती तशीच आहे का? असल्यास तिचे कारण काय असावे? युरोपीय समीक्षकांनी या संबंधात मांडलेले विचार हे बरोबर आहेत का? भारतीयांच्या अनैतिहासिकतेचे मूळ भारतीय तत्वज्ञानात आहे का? वाचकाला या सर्व प्रश्नांचा ऊहापोह केलेला या लेखात आढळेल.

'संगीत आणि मनोविज्ञान' या लेखमालेतील आणखी काही भाग या अंकात समाविष्ट करण्यात आला आहे.

'नवी क्षितिजे'च्या वाचकाला हे सर्व साहित्य उद्‌बोधक व वाचनीय वाटेल अशी आशा आहे.

**- नाना जोशी**

**नवी क्षितिजे संबंधी**

* सुट्या अंकाची किंमत रुपये १५०/-
* ५३, ५४, ५५ व ५६ अशा चार अंकांची किंमत रु. २०१
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या सुमारे १७० ते १७५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणारे नाही. थोडक्यात ५४ या अंकासाठी वर्गणी पाठवल्यास ५३ व्या अंकापासूनच अंक पाठविण्यात येईल.

अनुक्रमणिका

# सामाजिक प्रतिष्ठा आणि कलाकृती

## १. विसाव्या शतकाच्या कलाजगतातील एक अचाट 'स्कॅम'

**–गोपाळ माशेलकर**

यातील पहिला लेख हा एका अचाट स्कॅमबद्दल आहे. दुसरा लेख. हे असे स्कॅम, होण्यास कोणत्या प्रकारची मानसिक स्थिती कारणीभूत होते त्यासंबधी आहे. हा दुसरा लेख प्रख्यात लेखक ARTHUR KOESTLER यांच्या ANATOMY OF SNOBBERY या लेखावरून तयार करण्यात आलेला आहे.

विसाव्या शतकातील अत्यंत कल्पक आणि हानीकारक अशा एका कलाक्षेत्रातील बनावटगिरीसाठी **जॉन म्यॅटला** (Myatt) फेब्रुवारीमध्ये सजा झाली. तत्पूर्वी निसर्गरम्य स्टॅफर्डशायर खेड्यातील एका चिंचोळ्या बोळामधील एका साध्या कॉटेजमध्ये तो राहत होता. शेजारीपाजारी त्याला ओळखत एक सामान्य दर्जाचा चित्रकार, 'करीयर' घडवू शकेल अशी शैली नसलेला. त्यानं काही मनोवेधक 'पॉप' स्वरावलीचं लेखनही केलं होतं. १९७९ मध्ये ४० 'ब्रिटिश टॉप' मध्ये त्याचं 'सिलीगेम्स' होतं, ही त्याची लक्षात राहावी अशी एकमेव कामगिरी.

परंतु १९८६ च्या प्रारंभी, **जॉनला** शोध लागला, थोर वस्तादांप्रमाणे तो रंगवू शकतो, आणि पुढील नऊ वर्षामध्ये एक चित्रकार म्हणून व्यावसायिक यश त्यानं संपादन केलं, आश्चर्य वाटावं असं. अर्थात् हे सारं चाललं होतं छुप्या पद्धतीनं. **ब्राक, मातीस, जिआकॉमेत्ती, ल कार्बुसिए,** हे सारे प्रख्यात चित्रकार त्याच्या चित्रफलकावर साकार होत होते. त्यांची शैली त्यानं एवढी आत्मसात केली की त्याची चित्रं **'अस्सल'** मानली जाऊ लागली.

होता होता, १९९५ च्या सप्टेंबरमधील एक दिवस उजाडला. आपल्या छोकऱ्याला शाळेच्या बसपर्यंत पोचवण्यासाठी **जॉननं** घराचा दर्शनी दरवाजा उघडला आणि त्याच्या आवारात पोलिस असल्याचे त्याच्या नजरेनं टिपले. साध्या वेषातील एका अधिकाऱ्यानं आपण **जोनाथन सर्ल** अशी त्याला स्वतःची ओळख करून दिली. **सर्ल** हा एके काळचा चित्रकार, चित्रांची डागडुजी करून ती पूर्ववत करणारा आणि कलेतीहासाचा जाणकार आणि सध्या स्कॉटलंड यार्डचा 'डिटेक्टिव्ह सार्जंट.' पत्राशीची झुळूक लागलेला **जॉन** मनोमनी हादरला. त्यांनी पोलिसांना चहाचं आमंत्रण दिलं. नंतर आपल्या मुलाला शाळेच्या बसपर्यंत पोचवण्याची त्यानं परवानगी मागितली. ती मिळताच तो घराबाहेर पडला. तो परतून घरी

येईस्तोवर अधिकाऱ्यांनी घराची कसून उलथापालथ केली होती. **जॉन** आपल्या स्टुडिओमध्ये **सर्ल**समवेत उभा राहून अवतीभवतीच्या राड्यावरून नजर फिरवत होता. आपल्या मुलांनी काढलेल्या एका चित्राकडे अंगुळीनिर्देश करत जॉननं विचारलं, "हे आवडलं आपल्याला?" **सर्लनं** सहानुभूतीपूर्ण मान हालवली, परंतु खोलीच्या भिंतीवर **जिआकॉमेत्ती, छगाल, ब्राक** आणि **ड्यूबूफेट** (Dubuffet) या महान चित्रकारांची टांगण्यात आलेली चित्रं पाहून तो आश्चर्यचकित झाला. **जिआकॉमेत्ती, ल कार्बुसिए** आणि **बेन निकल्सन** यांच्या चित्रांवरून केलेल्या रेखाटनांची ड्रॉईंग पॅडस् इतस्ततः विखुरलेली ही त्यानं पाहिली.

**जॉननं** तिथल्या तिथं कबुली देऊन टाकली की नऊ आधुनिक थोर चित्रकारांची सुमारे २०० चित्रे त्यानं चितारली, त्यावर त्यांची सही करून आणि ती बनावट चित्रे स्वतः दर सहा आठवड्यांनी एक अशी लंडनला पोचती केली. ती ज्याच्या हवाली तो करत होता त्या माणसाचं नाव होतं **जॉन औ 'ख्रिस्ती'**, 'सोथबी' (Sotheby) आणि 'फिलिप्स' यांच्या लिलाव कचेऱ्या तद्वतच लंडन, पॅरिस आणि न्यूयॉर्क येथील नामवंत खरेदीविक्री करणारे यांच्या मार्फत **जॉनची** बनवाट चित्रे (त्याच्या सोबत आणखीनही एक अद्याप ओळखू न आलेला चित्रकार होता) **ड्रेवे** Drewe अक्कलहुषारीनं विकतो असा 'स्कॉटलंड यार्ड'ला संशय होताच. त्यानंतर **जॉननं सर्लला** जे सांगितलं ते पोलिसांना ठाऊक नव्हतं. तो म्हणाला की त्यानं बऱ्याचश्या चित्रांसाठी सहज ओळखता येण्याजोग्या घरगुती 'इमल्शन' रंगाचा वापर केलेला होता. हा रंग साठीच्या मध्यावर विकसित करण्यात आला होता, म्हणजे बरीचशी 'पेंटिंग्ज' लोकांसमोर आल्यानंतर कैक जणांनी काही वेळेला त्यानं 'के-वाय्' जेलीचा वापर केला होता, ब्रशचे फटकारे प्रवाही व्हावेत यासाठी. आपल्या पेंटिंग्जवर किती लाखांचा व्यवहार झाला असावा याची कल्पना **जॉनला** नव्हती पण या वर्षांमधली त्याची कमाई जवळपास १,६५,००० डॉलर्स होती. यातील काही त्यानं स्वतःच्या नावे स्वीस बँकेत जमा केले होते. त्याच्यापाशी या घटकेला असलेले ३०,००० डॉलर्स तत्काळ परत करण्याची आणि Drewe **ड्रेवेला** जाळ्यात पकडण्यासाठी मदत करण्याची त्यानं तयारी दर्शवली.

त्यानंतर सात महिन्यांनी, ६ एप्रिल १९९६ रोजी, भागीदारांबरोबरची संभाषणं 'रेकॉर्ड' केल्यानंतर, गुप्तहेरांनी **ड्रेवेच्या** घरावर छापा घातला. **'व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट म्युझियम', 'टेट गॅलरी'** आणि **'द इन्स्टीट्यूट ऑफ कन्टेपररी आर्ट'** मधील शेकडो दस्तऐवज त्यांना तिथं आढळून आले. "व्हि" अँड "ए" च्या **'नॅशनल आर्ट लायब्ररी'** मधून गहाळ झालेले दोन कॅटलॉग तसेच स्वयंपाकघरातील टेबलावर 'म्युझियम बॅग' मध्ये कागदपत्रे लंपास करता यावीत यासाठीच ती बॅग खास बनवण्यात आली होती. तिथं 'टेट'चे अधीप्रमाणित करणारे, रबरी शिक्के होते, गेल्या कित्येक तपाआधी युरोपात विक्री करण्यात आलेल्या चित्रांच्या रसीटा होत्या, **ड्यूबूफेट** आणि **जिआकॉमेत्ती** यांच्या इस्टेटमधील

प्रमाणित सर्टिफिकीटे होती; याशिवाय हस्तऐवज 'फॉर्जरी'ची नेहमीची उपकरणं : कात्र्या, वस्तरे, चूक दुरुस्त करण्यासाठी वापरले जाणारे द्रव, गोंद, टेप.

पोलिस आणि कला-तज्ज्ञ यांना लौकरच आढळून आलं की **जॉननं** तयार केलेले बनावट 'मास्टरपिसीस' हे **ड्रेवेच्या** अचाट बुद्धीमत्तेची केवळ एक झलक होती. **जॉनच्या** बनावट चित्रावर अस्सलपणाचा शिक्कामोर्तब करून घेण्याचं **ड्रेवेचं** कौशल्य ही त्याच्या बुद्धिचातुर्याची कमाल! निर्मिती, विक्री, प्रदर्शनं येथपासून तो सांप्रतच्या मालकापर्यंत त्या कलाकृतीचा इतिहास, अगदी तपशीलवार, त्याला माहीत असे. सुरक्षितेविषयी अत्यंत जागरूक असलेल्या जगातील काही कला-पुराभिलेख विभागात Drewe ड्रेवेनं अगदी पद्धतशीरपणे घुसखोरी केली होती, **जॉनच्या** अत्यंत अनपेक्षित बनावट कलाकृतींना वाट बिनबोभाट मोकळी व्हावी म्हणून त्यांची जातकुळी (Provenence) प्रस्थापित करण्यासाठी अस्सल पेंटिंग्जच्या मूळ स्थानात त्यानं फेरबदल केले होते आणि नंतर बनावट रेकॉर्ड संग्रहाचं मानांकन करून चित्रांना निमिषार्धात वारस मिळवून दिले होते. भ्रष्टाचाराचं हे प्रमाण अभूतपूर्व होतं, पद्धतशीरदेखील. 'आर्किव्हिस्टां'च्या दप्तरखान्याच्या अधिकारांच्या कधीच ध्यानात येणार नव्हतं की. त्यांच्या संग्रहालयात केल्या गेलेल्या घोटाळ्याचे प्रमाण काय! जॉननं सुमारे २०० 'मास्टर पिसेस' बनवले होते व Drewe ड्रेवेनं ते विकले होते, त्यापैकी पोलिस जेमतेम ७३ हुडकून काढू शकेल होते. महत्त्वाच्या समकालीन चित्रकृतींसाठी जीव टाकणाऱ्या 'मार्केट'मध्ये ड्रेवेनं Drewe बनावट चित्रे सरकावली होती एवढंच नव्हे तर – त्यानं कलेच्या इतिहासाचा चेहरामोहराच पार बदलून टाकला होता. पोलिसांनी या घोटाळ्याचं वर्णन '२० व्या शतकात पाहिलेलं समकालीन कलाक्षेत्रातील सर्वात मोठं "फ्रॉड" या शब्दात केलं आहे. ब्रिटनच्या 'प्रोसेक्युशन ऑफिसनं ड्रेवे Drewe हा ब्रिटनच्या सांस्कृतिक वारसाला धोका असल्याचं जाहीर केलं होतं.

**म्यॅटनं** ज्यांच्या कलाकृतींची 'फॉर्जरी' (नक्कल) केली होती त्या चित्रकारांच्या 'मार्केट'वर या 'स्कॅन्डल'नं विघातक परिणाम केला होताच, त्याहून महत्त्वाचं म्हणजे कला व्यवसाय स्वतःचाच एक खतरनाक शत्रू असल्याचं उघडकीला आणून दिलं होतं – हा व्यवसाय अस्सलपणाच्या ज्या निकर्षावर सर्वस्वी अवलंबून असतो. त्यात चलाखीनं फेरफार करता येणं शक्य असतं आणि यात एवढ्या जणांना स्वास्स्य असतं, जे भ्रष्टाचाराला उद्युक्त करतं. ड्रेवेची Drewe काहणी त्याच्या कल्पना चातुर्याविषयी जेवढं सांगते त्याहूनही अधिक फसगत करून घेण्याच्या कलाविश्वाच्या तत्परतेविषयी ही बरंच काही सांगून जाते.

**'म्युझियम ऑफ मॉडर्न आर्ट'** चा डायरेक्टर **ग्लीन लॉरी** सांगतो, 'कलाजगतातील हे एक अत्यंत व्यापक स्वरूपातील "फ्रॉड" आहे. या केसचं वैशिष्टय ड्रेवे Drewe किती पद्धतशीर काम करायचा आणि विधिग्राह्यतेच्या प्रक्रियेविषयीची त्याची जाण किती उत्तम होती. यंत्रणेमध्ये त्यानं केलेली बनवाबनवी, "फॉर्जरी" इतकीच स्वारस्यपूर्ण आणि पीडादायकही आहे.

**पीटर लॅंड्समन** सांगतो, "**जॉन** Drewe ड्रेवेला मी प्रथम भेटलो पेन्टोव्हिले तुरुंगाच्या भकास कोठडीत. फ्रॉड, फॉर्जरी यासारख्या गुन्ह्यापायी त्याला सहा वर्षांची सजा झालेली होती. मध्यम अंगकाठी, भुरकट निळे डोळे, पिंगट केस, अंगावर तुरुंगाचा राखाडी पेहराव. त्याची नाखुषी त्याच्या रागीट स्मीतामधून जाणवायची. बोलण्याची हातोटी लक्षणीय. त्याच्यावरील खटला ज्यानं उभा केला होता त्या प्रॉसेक्यूटर जॉन बेव्हननं इशारा दिला होता की त्याच्या समोर असताना नेहमीच सावध रहा. त्यानं सांगितलं होतं, "खटला चालू असताना स्वाक्षरी करायची म्हटली तरी मी अतिशय खबरदारी घेत होतो आणि त्याच्या जवळपास राहाणं कटाक्षानं टाळत होतो. या ना त्या कारणानं त्याच्याशी ज्यांचा ज्यांचा संबंध आला त्याचं वाटोळं झालं आहे."

आठवडाभर जवळजवळ रोज **ड्रेवे**[Drewe]लॅंड्समनला त्याच्या हॉटेलात जाऊन भेटत होता, प्रत्येक वेळेला स्वतः निरपराधी असल्याचे दोहरावत होता : ' या केसचा विषय आहे कला. कहाणीसाठीचा एक धूम्रपटल; वस्तुतः ही कहाणी आहे विराट आणि अशुभ; जिचा शोध घेण्याची पोलिसांची तयारी नाही. आणि जी ऐकण्यास कोर्टाची तयारी नाही. ती कल्पितकथा वाटेल, पण तशी ती नाही" अर्थात् ती तशीच होती.

Drewe ड्रेवे आयुष्यभर दप्तरखान्याचे मुख्य अधिकारी यांच्या कल्पितकथाच रचत होता. १९४८ मध्ये तो जन्मला **जॉन कॉकेट** (Cocket) या नावानं आणि ससेक्समधील एका मामुली कनिष्ट वर्गाच्या घरात लहानाचा मोठा झाला. लहानपणीदेखील, त्यानं स्वतःविषयी कहाण्या रचल्या होत्या. तो मित्रांपुढे बढाई मारत असे की यॉर्कच्या अर्लचा साक्षात वारसं आहे आणि 'ब्रिटिश होम स्टोअर्स' च्या संस्थापकाचा पुत्र आहे. त्याचा आय. क्यू १६५ असल्याची नोंद असली तरी तो सामान्य बुद्धीचा विद्यार्थी होता. डॅनिएल स्टोक्स (Stoakes) हा त्याकाळातील त्याचा स्नेही, ज्याचं आयुष्य त्यानंतर ३५ वर्षांनी Drewe ड्रेवेच्या आयुष्याशी घसटणार होतं. डॅनिएल सांगतो की अतिशय शिस्तशीर असा तो मुलगा होता. त्याच्या लायब्ररीत भरगच्च पुस्तकं होती, कात्रणांच्या फायलींचे ढिग होते, जणू काही पुढील काळात वापरण्यासाठीच तो लिखित माहिती एकत्र करत होता. त्याची खोली म्हणजे एक प्रयोगशाळाच वाटत असे.

१७ व्या वर्षी **कॉकेट्टनं** शाळेला रामराम ठोकला आणि Drewe **ड्रेवे** हे नाव धारण केलं. त्यानंतरची २५ वर्ष तो नजरेत भरला नाही. काही काळ 'अॅटोमिक एनर्जी ऑथोरिटी' मध्ये तो निम्न प्रशासकीय पदावर होता. त्यानंतर ब्रिटिश सरकारपाशी तो टॅक्स भरत असल्याची नोंद नाही, अधुनमधून पकडला जात होता वा वैद्यकीय उपचार घेत होता. त्याच्या अधिकृत सेवेचा रेकॉर्ड कोरा आढळतो.

या काळातला वृत्तांत Drewe **ड्रेवे** पेश करतो. तो सांगतो की १९६८ मध्ये पॅरीसमधील विद्यार्थ्यांच्या निदर्शनामध्ये तो सहभागी झाला होता. तिथून त्यानं जर्मनी गाठली. 'Kiel कील विद्यापीठात सहा वर्षे मी पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास केला. माघारी इंग्लंडला

आलो.' त्यानं म्हणे ससेक्सच्या विद्यापीठात वर्षभर 'एक्स्परिमेंटल फिजिक्स' शिकवलं होतं आणि 'सनी बफेलो'ची पदार्थविज्ञानशास्त्राची दुसऱ्यांदा पी. एच्. डी पदवी संपादन केली होती. या दोन्ही संस्थांमध्ये **जॉन कॉकेट** वा **जॉन** Drewe **ड्रेवे** याला पदवी बहाल केल्याची नोंद आढळत नाही. ससेक्सच्या विद्यापीठानं तर त्याचं नावही कधी ऐकलेलं नव्हतं.

१९८० मध्ये **बॅट-शेवा गाउड्समिडशी** त्याचा परिचय करून देण्यात आला. **गाउडसमिड** ही स्थलांतरित इझरायली होती व लहान मुलांच्या डोळ्यांची विशेषज्ञ होती. गोल्डर्स ग्रीनमधील एका प्रशस्त घरात ती राहत होती. आसपास उच्च मध्यमवर्गीय वस्ती. ज्यू आणि इझरायली समाजात ती 'पॉप्युलर' होती. मोठ्या प्राणहानीमधून वाचलेल्या तिच्या आईवडलांना जर्मनीकडून मिळालेल्या नुकसान भरपाईच्या रक्कमेमधून या घराचा काही भाग खरेदी केला होता. (पुढील काळात Drewe ड्रेवेबरोबरच्या तिच्या संगतीमुळे सारी मालमत्ता ती गमावणार होती.) प्रथम भेटीच्या दिवशी, Drewe **ड्रेवे** शुभ्र रोल्स राईसमधून तिच्या दारात हाजिर झाला, भला थोरला पुष्पगुच्छ घेऊन त्यानं तिला सांगितलं की 'अॅटोनिक एनर्जी ऑथोरिटी'चा तो एक सल्लागार आहे आणि 'ब्रिटिश एअरोस्पेस'च्या मंडळाचा एक सभासद आहे. या दोन्ही गोष्टी म्हणजे तद्दन थापा होत्या. परंतु आपल्या खर्चिक रहाणीसाठी तो पैसे कुठून मिळवतो ते कुणालाच ठाऊक नव्हतं. त्यानं **पीटर लॅंड्समनला** सांगितलं होतं, 'मी १९८० मध्ये संरक्षण मंत्रालयात नोकरीला होतो. त्यानंतर वूलविचमधील लष्कराला दारूगोळा पुरवणाऱ्या एका कंपनीत काम केलं.'

**गाउड्समिड** समजत होती की Drewe ड्रेवे रोज संरक्षण मंत्रालयात जाण्यासाठी बाहेर पडत होता. वस्तुस्थिती अशी होती : गेली बरीच वर्षे एका खाजगी ज्यूंच्या हायस्कूलमध्ये प्रत्यक्षात पदार्थविज्ञानशास्त्र शिकवत होता. ही शाळा हायगेटच्या सुखवस्तू परिसरात होती. १९८५ मध्ये त्यानं ती नोकरी तडकाफडकी सोडली. का सोडली या प्रश्नाला शाळेच्या प्रशासकानं एवढंच सांगितलं, "त्यानं सोडून जावं असं आम्ही त्याच्या मनात भरवलं आणि तो सोडून गेला." नंतर तो मुकाट झाला.

**गाउड्समिडशी** त्यानं लग्न केलं नसलं तरी 'माझी पत्नी' असा परिचय तो करून देत असे. ती सांगते, तीनदा त्यानं मला विचारलं त्याच्याशी विवाहबद्ध होण्याबद्दल मी त्याच्याशी लग्न केलं नाही. कारण कुठं तरी पाणी मुरतंय– काहीतर विचित्र असं, पण त्यावर नेमकं बोट ठेवणं मला शक्य नव्हतं. तो दरवाजे बंद करून सारंकाही करत असे.' 'त्यांना दोन मुलं झाली, एक मुलगा, एक मुलगी' मी माझ्या कामाविषयी त्याच्याशी कधी चर्चा केली नाही, त्यानं त्याच्या कामाविषयी चर्चा केली नाही.'

**गाउडसमिडच्या** ध्यानी आलं, घरात हळूहळू पेंटिंग्जचा भरणा होत आहे Drewe **ड्रेवेनं** स्पष्टीकरण दिलं : अॅटोमिक एनर्जी ऑथॉरिटी मधील त्याच्या जुन्या भलेमागत्याची ती चित्रं आहे. त्याला एकेक करून आपल्या संग्रहातील चित्रं विकायची आहेत. आणि कमिशनवर मित्राला तो केवळ मदत करत आहे. एके दिवशी, घराच्या मागील दारच्या

आवारात एका पेंटिंग्जवर तो माती पसरत असल्याचं तिच्या दृष्टीला पडलं. ती सांगते, 'तो म्हणाला ते अधिक जुनं वाटेल असं केल्यानं, बरीच वर्ष ते व्हॉल्टमध्ये होतं त्यामुळे ते अगदीच नवीन भासतंय.' खरी मेख अशी होती, १९८६ मध्ये[Drewe] **ड्रेवेची** एव्हाना हतभागी **जॉन म्यॅटशी** गाठ पडली होती, एका किफायतशीर अशा नव्या करीयरसाठी तो Drewe **ड्रेवेशी** हातमिळवणी करणार होता.

**म्यॅट जॉन**[Drewe] **ड्रेवेला** गवसला तेव्हा त्याच्या आयुष्याची घडी साफ विस्कटलेली होती, भावनिकदृष्ट्या आणि आर्थिकदृष्ट्या. त्याची बायको नुकतीच त्याला आणि त्यांच्या दोन मुलांना सोडून निघून गेली होती, आणि स्थानिक शाळेत चित्रकला शिकवून मिळणाऱ्या तुटपुंज्या पैशात तो कशीबशी गुजराणं करत होता. तो सांगतो, 'माझी स्वत:ची चित्रं मी काढत नव्हतो. घरी काम करण्यासाठी मार्ग मी शोधत होतो.' त्याच्या एका मित्रानं Raoul Dufy **राउल ड्यूफाच्या** पेंटिंग्जची प्रतिकृती तयार करण्यासाठी त्याला ४०० डॉलर देऊ केले. त्यानं मूळ चित्राबरहुकूम चित्र रंगवलं, डुफीची सहीसुद्धा हुबेहूब केली. त्याचा मित्रही म्हणाला की त्याचं चित्र कला-विशेषज्ञानाही **'अस्सल'** वाटत आहे, तेही चकले. **म्यॅटला** हा एकूणच प्रकार गंमतीचा वाटला. परंतु त्याची पुनरावृत्ती करण्याचा विचार त्याच्या मनात डोकावला नाही. परंतु परिस्थितीच अशी उद्भवली, मुलांसंगे घरी राहावं लागत असल्यानं तो अतिशय उद्विग्न झाला. १९८६ मध्ये 'प्रायव्हेट आय' या लंडनमधील उपरोधिक लिखाणासाठी प्रसिद्ध असलेल्या पाक्षिकामध्ये त्यानं एक 'क्लासिफायड' जाहिरात दिली. : '१९ आणि २० व्या शतकातील बनावट चित्रे २४० पौंडांना आणि प्रोफेसर Drewe **ड्रेवेकडून** त्याला बोलावण्यात आलं. प्रोफेसरमहाशयांनी सांगितलं की तो एक 'न्यूक्लिअर फिझिसिस्ट' असून स्वत:च घर सजवण्यासाठी त्याला पेंटिंग्ज हवी आहेत. त्यानं प्रयत्न मागणी केली एका **मातिसची,** नंतर एका **क्लीची,** त्यानंतर १७ व्या शतकातील डच 'मास्टर्स'च्या शैलीतील सागरी-चित्रं.

कॅनव्हासाच्या गुंडाळ्या घेऊन जॉन लंडनच्या Euston एयुस्टन स्टेशनवर Drewe **ड्रेवेला** भेटत असे. दोघं मिळून एक 'पाइंट' रिचवत. हळूहळू **जॉन** Drewe **ड्रेवेला** आपल्या आयुष्याची कर्मकहाणी सांगू लागला. घटस्फोटामुळं प्रपंचाची कशी कुतर ओढ होत आहे याचं वर्णनही त्यानं केलं. Drewe **ड्रेवेनं** त्याला सल्ला दिला, त्याचं सांत्वन केलं आणि अखेरीस स्वत:च्या घरी येण्याचं त्याला आमंत्रण दिलं. **जॉननं** त्याचं मोठालं घर पाहिलं, त्याची मर्सिडिझ, त्याचे कपडेलत्ते, त्याचं बोलणं-चालणं पाहिलं Drewe **ड्रेवेनं** त्याला सांगितलं की संरक्षण मंत्रालयातील त्याच्या कामाबरोबरच 'ब्रिटिश इंटेलिजन्स'शी-देखील त्याचे कामानिमित्त संबंध आहेत. खांद्याच्या भागातील कातडी पिशवीमधील दोन पिस्तुले दाखवण्यासाठी त्यानं जाकिट मागं खेचलं. 'मी त्याच्या पुरता पित्या झालो. त्याच्यासारखी दुसऱ्यांना वश करणारी, आव्हान देणारी अशी सनसनाटी व्यक्ती अवतीभवती



अनुक्रमणिका

आढळली नसती. एक दिवस Drewe ड्रेवेनं **जॉनला** विचारलं की कुठल्या **शैलीत** रंगवावं असं त्याला वाटतं. जॉन उत्तरला की 'क्यूबिस्ट' शैलीत चित्रं रंगवण्याचा विचार त्याच्या मनात बहुत दिसापासून आहे. त्यानं[Drewe]**ड्रेवेसाठी** लौकारच एक **ब्राक** रंगवून दिला.

१९८६ च्या एका संध्याकाळी[Drewe]ड्रेवेनं **जॉनला** एक खुषखबर दिली. "मी तुझं एक पेंटिंग" "ख्रिस्ती'कडे घेऊन गेलो होतो, ते म्हणाले ते ३८,००० पौंड मोलाचं आहे." 'हा असा क्षण होता जेव्हा वाजवी धंदा संपुष्टात आला आणि गुन्हा सुरू झाला.' Drewe ड्रेवेनं पुढील बोलणी करण्यासाठी त्याला लंडनला पाचारण केलं. **जॉन** म्हणाला, "माझा विश्वासच बसत नाहीये. तुला ठाऊक आहे का, ते इमल्शन रंगात रंगवलेलं आहे?' पण Drewe **ड्रेवेच्या** उद्गारानं त्याचा 'अहं' नाही म्हटलं तरी सुखावला होता. तो सांगतो, 'इथंच गफलत झाली. माझी प्रतिक्रिया आस्था प्रदर्शित करून व्यक्त झाली.'

Drewe ड्रेवेनं वेळही अचूक साधली होती. ८० च्या मध्यावर, 'आर्ट मार्केट' मध्ये कधी नव्हे एवढ्या नफ्याची उलाढाल होत होती. तत्संबंधीच्या वर्ता वृत्तपत्रांच्या पहिल्या पानावर झळकत होत्या **जास्पर जॉनच्या 'फॉल्स स्टार्ट'ची** किंमत १९६० मध्ये ३,१५० पौंड होती. तेच १९८८ ला १७ मिलियन पौंडाला विकलं गेलं. **पिकॅसोचं 'यो पिकॅसो'** १९८९ मध्ये ४७. ९ मिलियन पौंडाला गेलं. १९९० मध्ये **व्हॅन गॉफचा डॉक्टर गॅचेटचा** पोर्टेट, ज्याच्या अस्सलपणाविषयी शंका असूनही एका जपानी कलासंग्रहकानं ८२. ५ मिलियन डॉलरला खरेदी करून विक्रम केला. फारशा परिचित नसलेल्या चित्रकारांच्या चित्रांच्या किंमतीही गगनाला भिडल्या. **जॉन म्यॅटच्या** मास्टर पिसीस वर हा हा म्हणता उड्या पडू लागल्या.

**'ग्रॅहम सदरलंडनयांनी** ख्रिस्तावरील भाल्या मोठ्या टॅपेस्ट्रीसाठी रेखाटणं केली होती त्यांची नक्कल करण्यासाठी **म्यॅटनं** 'कॉव्हेन्ट्री कॅथिड्रल'च्या बऱ्याच फेऱ्या केल्या. **जिआकॉमेत्तीच्या** प्रतिरूपांचा बारकाईनं अभ्यास केला, नंतर पाच तासात त्याच्या एका पेंटिंगबरहुकूम चित्र रंगवलं, जे पुढं १,७५,००० पौंडांना विकलं गेलं. त्यानंतर **म्यॅटनं** आपला मोर्चा **बेन निकल्सन, ल कार्ब्रसिए, मातिस,** आदी विश्वविख्यात चित्रकारांकडे वळवला. इमल्शन आणि के. वाय जेली हा त्याचा शिष्टसंमत नसलेला फार्म्युला झटपट वाळणारा होता, त्यामुळे तो झटपट चित्रं रंगवू शकत होता. 'तांत्रिक अंगाकडे मी फारसं लक्ष पुरवलं नाही. मी जे जे केलं त्यात निष्काळजीपणा होता.'

असं असूनही, त्याची चित्रं **'अस्सल'** म्हणून लाख किंमतींना विकली जात होती. स्वप्नातही त्याला लाभलं नसतं असं आर्थिक यश **'मातिस'** रंगवून तो कमावत होता. त्याच्या जमान्यात वा अन्य काळीही एवढ्या प्रचंड संख्येनं आणि एवढ्या नानाविध शैलीमध्ये कुठल्या नकलकारानं काम केलं नसेल. 'व्यसनच जडलं होतं ते.' पण 'हे भयानक होतं, थरकाप उडाला होता माझा. ज्या क्षणी ते ती चित्रं पूर्वस्थितीत आणण्याच्या कामाला लागतील त्यावेळी त्यांच्या ध्यानी येईल त्यांच्या समोर काय रंगवून ठेवलं आहे.'



अनुक्रमणिका

परंतु Drewe ड्रेवेनं **म्यॅटला** धीर दिला, सांगितलं, वर्षा आधी तो प्रेमभंगाचं दुःख भोगत होता आणि कफल्लक होता. किती कुशल आहे तो, किती श्रीमंत बनेल तो. 'मी हुरळून गेलो. मलाही वाटू लागलं, मी एक बडी असामी आहे.' तरीही तो जाणून होता, 'हे काही खरं नाही असं खरंच काही घडत नाहीये, या साऱ्याचा शेवट आसवं ढाळण्यात होणारेय.'

**म्यॅटच्या** आधीही 'फॉर्जरी' करणारे चित्रकार होते. एखाद -दुसऱ्या नामवंत चित्रकारांची नक्कल ते करत असत. जेणेकरून गायब असलेल्या महान चित्रकृतीच्या शोधाची दिलचस्प वार्ता लक्ष वेधून घेत असे. १९३० व १९४० या दोन दशकात Hans Van Meegeren नं Vermeer च्या नकला केल्या होत्या; १९५० च्या दशकात अतिउत्साही **टॉम कीटिंगनं रेम्ब्राब**रहुकूम चित्र रंगवली होती आणि एरिक हेब्बोर्ननं **ऑगस्टस जॉन, कोरो** (Corot) आदी 'कॉपी' केले होते

बोगस चित्रं किती प्रमाणात विकली जातात यासंबंधीची माहिती मिळवणं जिकरीचं होतं, कारण विक्रेते आणि लिलाव करणाऱ्या संस्था 'फ्रॉड' आढळून आल्यास त्याबाबत गुप्तता राखत, ग्राहकांच्या विश्वासाला धक्का पोचू न देण्याची दक्षता घेत, नपेक्षा त्यांच्या धंद्याला जबरदस्त फटका बसण्याची शक्यता असे. तज्ज्ञांचा दावा असे की काळ आणि चित्रकार लक्षात घेता, विक्रीसाठी असलेल्या लक्षणीय चित्रकारांच्या चित्रांपैकी १० ते ४० टक्के चित्रं बोगस असतात. लिलाव होणाऱ्या गृहांमधून विकल्या जाणाऱ्या चित्रांपैकी १५ टक्के चित्र बनावट असल्याचं एका विक्रेत्यानं जाहीरपणं सांगितलं होतं. **'मेट्रोपोलिटन म्युझियम ऑफ ऑर्ट'चे माजी डायरेक्टर थॉमस होविंग** म्हणतात की, त्यांच्या कारकिर्दीमध्ये म्युझियमनंविकत घ्यावी म्हणून जी चित्रं आलेली होती. त्यातील ४० टक्के चित्रं बनावट होती वा बऱ्याच वेळा डागडुजी करण्यात आलेली होती. कीटिंग आणि हेब्बोर्न यांची बनावटगिरी उघडकीस आणणाऱ्या ब्रिटिश कला-समीक्षक **जेराल्डीन नॉर्मनच्या** मते प्रमुख **इम्प्रेशनिस्ट** चित्रकारांच्या नावावर जी चित्रं खपवली जाण्याचा प्रयत्न होतो त्यातली निदान १० टक्के चित्रं बनावट असतात. काही तज्ज्ञ सांगतात की मार्केटमध्ये असलेल्या **जिआकॉमेत्तीच्या** चित्रांपैकी जवळजवळ ६० टक्के चित्रं बनावट आहेत, याला काही प्रमाणात Drewe **ड्रेवेची** चलाखी कारणीभूत झालेली आहे. **रशियन आव्हां गाद** काळातील समजल्या जाणाऱ्या चित्रांपैकी ४० टक्के चित्रं निश्चितच बनावट आहेत. अस्सलपणाची सर्टिफिकेटे पैश्याच्या मोबदल्यात दिल्याबद्दल **मोदिग्लिआनी** आणि **छागाल** यांच्या विधवांना दोषी ठरवण्यात आलं होतं. असं सांगतात, **साल्वेदोर दाली** मृत्यूशय्येवर अर्धवट ग्लानीत असताना बनावट लिथोग्राफसाठी हजारो कोऱ्या कागदावर त्यानं स्वाक्षरी केल्या होत्या. इटालियन चित्रकार **गिओरिगो द चिरिको** (Chirico) तर आपल्या नव्या चित्रावर २० वर्षामागची, ज्या काळात त्याची चित्रं लोकप्रिय होती आणि

त्यांना प्रचंड मागणी होती, तारीख टाकताना पकडला गेला होता 'फोर्जरी'ची ही घटना दु:खदायकच आहे.

अत्याधुनिक कला, विशेषत: फ्रॉड करण्यास सुलभ असल्याचे दिसते. तिची शैली अमूर्त, बऱ्याच वेळा चित्र समजण्यास आकलन होण्यास कठीण. तिच्या अंगभूत गुणामुळे तशा चित्रांबद्दलची आवडही मर्यादित. **परंतु अशी चित्रे सामाजिक प्रतिष्ठेची, जाणकारीची बाब बनली होती हे विशेष !** आणि असे बकरे आपल्या जाळ्यात पकडणे **हे** Drewe **ड्रेवेचं** लक्ष्य बनलं होतं. जगातील अत्यंत शिक्षित असे ग्राहक आणि जाणकार यांच्या ध्यानी फसवले जाण्याची शक्यता येत नसे, आणि एकदा पेंटिंग विकत घेतल्यानंतर ते बनावट आहे याची कबुली देण्याचा मूर्खपण ते करत नसत. समजा कुणी त्यांना सांगितलं की ते अस्सल नाही तर, त्यावर त्यांचे उत्तर ठरलेले असे, "मी ते जाणत नाही, माझ्या लेखी ते **रेन्वाचं** आहे. 'Nu Debout' न्यू दबू या **जिआकॉमेत्तीच्या** पेंटिंग्जच्या दोन बनावट चित्रकृती न्यूयॉर्कमधील दोन विक्रेत्यांना विकल्या होत्या. या चित्रांमध्ये चित्रकाराची तांत्रिक सफाई, कलात्मक गुणवत्ता नाही हे उघड दिसत असूनही एका विक्रेत्यानं जोरदार समर्थन केलं होतं : 'मला अजूनही वाटतं की मी आजवर पाहिलेल्या **जिआकॉमेत्तीच्या** सर्व चित्रांमधील हे सर्वोत्कृष्ट आहे.' पेंटिंग्ज विकत घेणाऱ्यांपैकी बऱ्याच जणांना **त्यातील कलात्मकतेचं काही देणं घेणं नसतं.** त्या चित्रावरील नामवंत **चित्रकाराच्या सहीला** त्यांच्या लेखी महत्त्व असतं, कारण ग्राहकाची **सामाजिक प्रतिष्ठा** त्यायोगे उंचावली जात असे.

एक खास बौद्धिक खेळी हीच प्रेरणा बनावट चित्रं रंगवणाऱ्या चित्रकाराची मुख्यत्वे असे. स्वत:च्याच कलाकृती रंगवून पदरी कडवटपणा आलेला चित्रकार कला जगतातील कृती घडाघड नकलू लागतो, नंतर पडदा बाजूला सारून आपण एक तत्वभ्रष्ट 'जिनियस' असल्याचं खुल्लंमखुल्ला जाहीर करतो आणि स्वत:ला कलातज्ज्ञ म्हणवणारे 'फ्रॉड' आहेत, बेअकली आहेत असं बिनदिक्कत सांगतो. परंतु Drewe **ड्रेवेचा** व्यूह वेगळा होता. लाखांची कमाई करू शकणाऱ्या मोजक्या चित्राकृतींच्या वाटेला न जाता, कुणाच्या ध्यान्यात येणार नाहीत अशा सामान्य चित्रकृतीच बहुसंख्येनं 'मार्केट'मध्ये टाकण्याकडे त्यानं लक्ष केंद्रित केलं होतं आणि यात यश संपादन करण्यासाठी चित्रकृतींची मूळ स्थानं बनवण्यापासून त्याला प्रारंभ करावा लागला होता.

कोर्टापुढं खटला चालू असताना प्रॉसेक्यूटर **बेव्हन** म्हणाला, 'पेंटिंग्जचा शेवटचा मालक ही 'फोर्जर'ची अवघड समस्या असते.' Drewe ड्रेवेच्या बनावट दस्तऐवजानं भरलेल्या खांद्याला लागणाऱ्या उंचीच्या पेटीतून १९५५ मधील **जिआकॉमेत्तीच्या** बनावट चित्रासाठी तयार करण्यात आलेला मूलस्थानाविषयीचा बनावट कागद बेव्हननं बाहेर काढून सांगितलं. "१९५० मध्ये पेंटिंग्ज कुणाच्या मालकीची आहेत हे तुम्ही दाखवू शकता– फक्त मृत व्यक्तींचा वापर करायचा. परंतु शेवटचा मालक बहुधा जिवंत असतो. 'जे सहज गळाला

लागू शकत होते असे जुने स्नेही व परिचित यांचा Drewe **ड्रेवेनं** याकामी उपयोग करून घेतला. आणि **म्यॅटची** बनावट चित्रं अस्सल म्हणून बाजारात आणली. त्यानं हाताशी धरलेल्या पैकी एक होता **पीटर हॅरीस.** दारू पिण्यात साथ देणारा. आयुष्यात एक पेंटिंगसुद्धा त्यानं कधी चुकून खरेदी केलेलं होतं. त्याच्या भिंतीवर डकवलेले होते लंडनमधील साऱ्या गुत्त्यांचे पोस्टर. तो मरणोन्मुख असताना (१९८९ मध्ये तो घशाच्या कर्करोगानं वारला) काही दत्तऐवजावर Drewe ड्रेवेनं त्याच्या सह्या घेतल्या होत्या. दुसरा होता डॅनी बर्गर (Berger) एक इस्त्रायली स्थलांतरित आणि 'लगेज सेल्समन' आणि कफल्लक. Drewe **ड्रेवेच्या** मार्गदर्शनाखाली, बर्गरनं 'ख्रिस्ती', 'सॉथे बी' व अन्य खाजगी विक्रेत्यांना बरीच चित्रं विकली होती.

परंतु **डॅनिएल स्टोक्स** (Stoakes) चं आयुष्य[Drewe]**ड्रेवेमुळे** जसं उद्ध्वस्त केलं गेलं तसं अन्य कुणाचं केलं गेलं नव्हतं. (त्याची निर्दोष मुक्तता झाली) दोघंही बालपणापासूनचे स्नेही. परंतु शाळेनंतर दोघांची गाठभेट नव्हती. **डॅनिएल** सांगतो, "माझ्या पत्नीपासून मी घटस्फोट घेतला हेता. घरं बदलत मी दिवस काढून होतो. जुन्या मित्रांच्या स्मृती जागवत होतो, आणि अनपेक्षितपणे मला **जॉनची** याद आली. एखादं फक्त फळ अलगद होती पडावं तसा मी त्याच्या हाती लागलो. एका लांबरुद स्पोटर्स् कारमधून तो मला भेटायला आला आणि इथं त्याच्या बुद्धीचातुर्याची कमाल दिसते – त्यानं एक थरारक कहाणी मला सुनावली: त्याची बायको त्याच्या मुलांना खतरा झालेली आहे. तिला सुधारण्यासाठी डॉक्टर आणण्याचे त्यानं प्रयत्न केले. ही कहाणी पुढं पुढं सरकत होती. तो बँकेतून पैसे काढू शकत नव्हता. तो अशा वेळी आला होता ज्या काळात मी बराच हळवा बनलो होतो. त्याच्याशी मी हातमिळवणी करावी या खातीर त्यानं आपलं बुद्धिचार्तुय पणाला लावलं. आपल्या मुलांसंबंधी कंठ दाटल्या सुरात तो फोनवर बोलत असे. 'त्यानं टाकलेल्या या गळाला **डॅनिएल** लागला. त्यानं एक भेटीत सांगितलं की **बेन जॉन्सनचं** एक पेंटिंग त्याच्या संग्रही आहे. म्हणाला, "आपण एका दगडात दोन पक्षी मारू शकतो. तुला पैशाची गरज आहे आणि माझ्यापाशी हे चित्र आहे. त्या चित्राच्या ऐतिहासिकतेच्या संदर्भात समस्या आहेत, काही अशा तशा त्रूटी. माझं नाव मी वापरू शकत नाही, परंतु माझ्या मुलांचा ताबा मिळवण्यासाठी मला पैशांची गरज आहे. मालक म्हणून तुझं नाव मी वापरू शकतो ? तुला थोडे टक्के त्यात मिळतील. त्या नवलकथेच्या रोमहर्षक गळाला मी लागलो. तो पत्रांचे कच्चे मसुदे पाठवत होता. मी माझ्या हस्ताक्षरात ते लिहून काढत होतो. त्याकरवी चित्राचा मालक असल्याचं भासवत होतो. मला वाटलं, हा खेळीचा एक भाग आहे. बनावट मूलस्थान म्हणजे काय याची कल्पना मला नव्हती. मान्य आहे, मी भोला सांब बनलो होतो. त्याच्यावर विश्वास ठेवण्याची मला गरज होती. ज्या अपेष्टांतून मी जात होतो त्याच अपेष्टांमधून जाणारा तो एक मित्र होता. मला पैशांची गरज आहे आणि या खेळात मला गोडी आहे हा माझा



अनुक्रमणिका

दुबळेपणा त्यानं अचूक हेरला होता. परंतु मित्रहीन जगातील एका जुन्या मित्राची ती एक कल्पना होती.'

या कुकर्मात Drewe **ड्रेवेला** कुणी साथीदार मिळेनासा झाला तेव्हा त्यानं एक नवीन प्राणी जन्माला घातला **लेन मार्टिन.** १९७० च्या प्रारंभापासून जर्मनीमधील Kiel किल विद्यापीठातील पदार्थविधानशास्त्राचा प्राध्यापक **एच् हाइनरिख मार्टिन** याच्याशी झालेला पत्रव्यवहार Drewe ड्रेवेनं जतन केलेला होता. त्यानं पत्रामधून मार्टिनची सही कोरली आणि त्यचं नाव बदलून टाकलं, आणि **'लेन मार्टिन'** जन्मला. Drewe ड्रेवेनं काय केलं? सॉलिसिटरकडचा मूळ दस्तऐवज घेतला, तो काळजीपूर्वक कातरला आणि डकवला, ओळीवरून सफेदी मारली, त्याचं छायाचित्रं काढलं, पुन्हा एकवार काढलं येणेप्रमाणं, अधिकृत दस्तऐवज तयार झाला : 'टु व्हूम इट मे कन्सर्न' **जिआकॉमेत्तीचं** पेंटिंग त्याच्या मालकाच्या संपूर्ण हक्कांनिशी विकण्यात येत असल्याचं हे पत्र शाबीत करतं या पत्रावर **लेन मार्टिन** या मालकाची सही. वस्तुत: लेन मार्टिन अस्तित्वातच नवहता.

नंतर, १९८९ मध्ये आपल्य धंद्याची व्याप्ती वाढवण्याच्या दृष्टीनं Drewe **ड्रेवेनं** पावलं उचलली. लंडनमधील **'इन्स्टीट्यूट ऑफ कंटेमपरेरी आर्ट'**नध्ये त्यानं प्रवेश मिळवला. २० व्या शतकातील चित्रकार, संग्राहक आणि क्युरेटर यांच्यामधील पत्रव्यवहाराचे संग्रहालय या संस्थेत होते आणि त्यावर सक्त पहारा असे. आपण एक संग्राहक असून संस्थेच्या इतिहासात आपणाला आस्था आहे असं त्यानं भासवलं आणि त्यानंतर फंड उभारण्यासाठी लौकरच होणाऱ्या लिलावासाठी **ल कार्बुसिए** व **जिआकॉमेत्ती** यांची दोन पेंटिंग्ज-**म्यॅट** सांगतो ही दोन्ही बनावट होती– भेट म्हणून देण्याचं संस्थेला आमिष दाखवलं त्याच्या बोलण्यावर विश्वासून संस्थेनं आपल्या फायली खुल्या केल्या. पोलिसांच्या मते, संस्थेचे लेटरहेड, आणि तिच्या अर्काइव्हजमधला बराचसा पत्रव्यवहार Drewe **ड्रेवे** मूळ स्थानाच्या संदर्भात लौकरच वापर करून बनावट चित्रं खपवणार होता.

याच सुमारास [Drewe] **ड्रेवे 'टेट'** या कलादालनामध्ये मध्ये शिरकाव करून घेण्याची प्रयत्नात होता. यासाठी [Bissere] बिस्सेरेची दोन पेंटिग्ज भेट म्हणून देऊ केली. म्युझियमला प्रारंभी ती पसंत पडली आणि आपल्या गॅलरीत ती लावण्यास संमतीही दिली. नंतर ती Bissere बिस्सेरेच्या मुलाला दाखवली तेव्हा त्यानं सांगितलं की त्याचे वडील वापरत असत ती कलासामग्री या चित्रासाठी वापरलेली दिसत नाही. **'टेट'** संभ्रमात पडली. तेवढ्यात Drewe **ड्रेवेनं** आपली ऑफर मागं घेतली आणि अर्काइव्हजमध्ये वर्गीकरण करण्याच्या कामासाठी ३२,००० पौंड देण्याचं आश्वासन दिलं. त्यानंतर लायब्ररीवर संशोधन करण्यास मिळावे म्हणून अर्ज केला. त्याच्या जाणकारीची खात्री पटल्यामुळे, त्याच्याकडून देणगी मिळणार आहे हे ध्यानी ठेवून म्युझियमनं त्याचा अर्ज विनाविलंब मंजूर केला. असाच अर्ज त्यानं **'व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट्स नॅशनल आर्ट गॅलरी'** मध्ये केला. अर्जदाराचा व्यवसायच्या पुढे 'पदार्थ विज्ञानशास्त्राचा प्राध्यापक' असं नमूद केलं. संदर्भ **डॉ. जॉन**

**कॉकेटचा** (Cockett) दिला आणि पत्ता दिला स्वत:चा. याबाबत संस्थेनं विचारणा केली असता Drewe **ड्रेवेनं** उत्तरादाखल लिहिलं, **'जॉन ड्रेवे** Drewe हा नेक माणूस आहे' आणि सही केली **'जॉन कॉकेट.'**

त्यानंतर लागलीच. **'नॅशनल आर्ट लायब्ररी'**च्या 'म्यॅन्युस्क्रिप्ट'च्या हस्तलिखितांच्या रूमालांच्या पसाऱ्यात, शस्त्रक्रिया करताना वापरतात ती कैची घेऊन Drewe कामाला लागला. बनावट **जिआकॉमेत्तीला** जीवन देण्यासाठी १९५५च्या एका कॅटलॉगची चिरफाड केली. हा कॅटलॉग लंडनमधील 'ओहाना गॅलरी (तूर्त बंद) येथे भरलेल्या प्रदर्शनाच्या वेळी काढलेला होता. त्यात छापण्यात आलेला 'Exhibition of Paintings, Sculpture and Stage Designs by Members of the Entertainment World' हा मजकूर Drewe **ड्रेवेनं** फिरवला, त्यात आपल्याला हवा तसा फेरबदल केला : 'With contributions from Members of the Entertainment World. ही शस्त्रक्रिया त्यानं यशस्वीरित्या पार पाडली. मूळ टाइपाशी तंतोतंत जुळणारा टाइप संगणकाच्या आधारे तयार करून 'टायटल पेज' त्यावर बदललेला मजकूर टाकून नव्यानं तयार केलं. म्यॅटच्या **जिआकॉमेत्तीबरोबर छगाल, डुबुफेट्स, निकोल्सन** आदी मान्यवर चित्रकारांच्या बनावट चित्रांची छायाचित्रंही त्यानं कॅटलॉगमध्ये घुसडली. तो नव्यानं काळजीपूर्वक शिवून त्याच्या जागी ठेऊन दिला.

त्यानंतर Drewe **ड्रेवेनं** विस्मय वाटावा असं धाडसी पाऊल उचललं. **'आर्ट रिसर्च असोशिएट्स'** या नावाची एक बनावट व्यावसायिक कंपनी काढली. लंडनमधील या कंपनीच्या दलालामार्फत' व्यावसायिक आर्काइव्हिस्ट म्हणून न्यूयॉर्कमधील विक्रेत्याशी संधान जुळवलं. या विक्रेत्याला **जिआकॉमेत्तीच्या** चित्राच्या अस्सलपणाविषयी तज्ज्ञाचं मत हवं होतं. वर्षा आधी त्यानं एक **जिआकॉमेत्ती १,७५,०००** पौंडाना विकतच घेतलं होतं आणि ते त्याला विकायचं होतं. पण 'Aberto et Annetter Giacometti Association' ची डायरेक्टर **लिसा पामर** हिच्याशी संपर्क साधला असता त्या चित्राच्या अस्सलपणाविषयी तिनं शंका व्यक्त केली हाती. स्कॉटलंड यार्ड एव्हाना Drewe **ड्रेवेचा** मागोवा घेऊ लागलं होतं. न्यूयॉर्कमध्ये हे पेंटिंग लिलाव करण्यासाठी देण्यात आलं होतं. परंतु **पामरनं** जोरदार हरकत घेतल्यामुळं ते बाजूला काढण्यात आलं होतं.

विक्रेता वस्तुनिष्ठ मत मिळवण्यासाठी शोधाशोध करू लागला. दलालानं 'आर्ट रिसर्च असोशिएट्स'च्या प्रॉफेसर[Drewe] **ड्रेवेचं** नाव त्याला सुचवलं. महिन्याभरापूर्वी [Drewe] **ड्रेवेनं** पेंटिंग बारकाईनं तपासलेलं होतं. त्यावर त्यानं रिपोर्ट तयार केला होता. त्याचा समारोप करताना त्यानं म्हटलं हों. 'या पेंटिंगच्या मूळ स्थानाविषयी प्रश्न उपस्थित होण्याचं काही कारण नाही.' दलालनं त्याची **'नॅशनल आर्ट लायब्ररी'** मध्ये विक्रेत्याशी गाठ घालून दिली. दोघांनीही मिळून ओहाना **गॅलरीचा कॅटलॉग**– अर्थात बनावट– नीट अभ्यासला. त्यात **जिआकॉमेत्तींच्या** प्रतिकृती होत्या, शिवाय अत्याधुनिक नामवंतांच्या उत्कृष्ट कलाकृती-देखील त्यात होत्या. त्यातील बऱ्याचशा बनावट होत्या.

**'मूळ स्थाना'** विषयीचा पुरावा भक्कम वाटावा अशी पत्रंही होती. **हॅरिसची** पत्रं होती. हॅरिस अर्थात् सोयिस्कररित्या मृत होता. या शिवाय त्याच्या आधीच्या मालकांचाही पत्रव्यवहार होता त्यातं अस्तित्वात नसलेल्या **लेन मार्टिनही** होता. **जिआकॉमेत्तीच्या** स्टुडिओमधून चित्रकृती कुणा कुणाच्या हाती गेली त्यासंबंधीचे 'इनव्हॉयसीस' अधिकृतपणाला बळकटी देत होते. पेंटिंग बनावट आहे असं **पामर** ठामपणे सांगत असतानाही, Sotheby ही कलावस्तुंची लिलाव करणारी संस्था चालढकल करत असतानाही, स्कॉटलंड यार्ड Drewe **ड्रेवेच्या** मागावर असतानाही विक्रेत्याची खात्री पटली की पेंटिंग अस्सल आहे. एवढा भरभक्कम पुरावा समोर असताना त्याचं असं मत झालं नसतं तरच नवल ! नियोजित कामकाज आटोपल्यानंतर Drewe **ड्रेवेनं** त्याला भोजनासाठी एका महागड्या हॉटेलात नेलं, त्याच्यासमोर बढाई मारली की त्याची बायको Itzhak Perlman ची 'फर्स्ट कझिन' आहे. आणि दुसऱ्या महायुद्धात नाझीच्या हाती पडलेल्या चित्रकृतींचा शोध घेण्याच्या कामी बराचसा वेळ तो खर्ची घालतो. त्यानं केलेल्या मदतीचा मोबदला म्हणून विक्रेत्यानं त्याला ६०० पौंड दिले. 'हा एका लफंग्याबरोबरचा व्यवहार होता' असे उद्‌गार विक्रेत्यानं काढले, पण ते तदनंतर काही काळानं Drewe **ड्रेवेची** बनावटगिरी उघडकीला आल्यानंतर.

[ Drewe] **ड्रेवेच्या** 'स्कॅम' ची खासियत होती provenancing (चित्राचे मूलस्थान व त्यानंतरची वाटचाल) मध्ये प्रोसेक्युटर बेव्हन सांगतो, 'कुणी फोर्जर' एवढ्या पातळीवर जाऊ शकतो हा विचार लोकांच्या मनात डोकावत नाही. हा 'फुल टाइम जॉब' होता Drewe **ड्रेवे** चित्रकारांच्या कुटुंबियांशी गप्पागोष्टी मारत असे, त्यांचे घरगुती तपशील मिळवण्यासाठी ज्या आधारे जुन्या काळची पत्रं तो लिहू शकत होता– उदाहरणार्थ, १९५० मध्ये de Stael नं त्याच्या मैत्रिणीला लिहिलेलं– provenance चा एक भाग म्हणून. **'टेट'** चा माजी प्रमुख आणि **बेन निकल्सनचा** जावई ॲलन बोवनेस **म्यॅटचे** दोन बनावट निकोल्सन पाहून चमकला होता, ती चित्रं चांगली होती म्हणून नव्हे, वस्तुत: ती अतिशय सुमार होती, तर provenancing नं निर्दोष होतं.

Sotheby सोथबीच्या 'इंप्रेशनिस्ट आणि मॉडर्न आर्ट विभागा'चा डायरेक्टर **मेलानी क्लारे** Melanie clare सांगते, 'जॉन Drewe ड्रेवेच्या तोडीची अत्याधुनिकता अन्य कुणापाशी असल्याचं माझ्या अनुभवास आलेलं नाही. तो माणूस विलक्षणच होता.' चित्रं ऐऱ्यागैऱ्याकडची नव्हती. **जिआकॉमेत्तीचं** एक महत्त्वाचं चित्र आय् सी. ए. च्या डायरेक्टरच्या मालकीचं होतं. सोथबीने **म्यॅटची** १४ बनावट चित्रं विकली होती ही बाबा लक्षणीय होती.

खरोखरीच **'व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट'** आणि **'टेट'** येथील बरेचसे रेकॉर्ड Drewe **ड्रेवेनं** बदलले होते. नव्यानं तयार केले होते. अनेक चित्रकाराचे दोन्ही म्युझियमचे

डायरेक्टर मान्य करतात की त्यांच्या संग्रहापैकी कितीसं भ्रष्ट झालेलं आहे याची कल्पनाही ते करू शकत नाहीत. या स्कॅन्डलचे पडसाद अमेरिकेतही उमटले.

Drewe **ड्रेवेच्या** स्कॅन्डलनं पेंटिंगची स्वतंत्ररित्या विक्री करणाऱ्यांच्या मध्ये संतापाची लाट उसळली तशी अलिकडच्या काळात उसळलेली ऐकीवात नव्हती. त्यांचा रोख होता तो लिलाव करणाऱ्या गृहांवर. त्यांचा दावा होता की या गृहांनी **म्यॅटची १४** चित्रं, ती बनावट आहेत हे माहीत असूनही जाणूनबुजून हलवली, केवळ नफ्यात वाढ व्हावी या इच्छेपोटी तसं नसतं तर Vinyl नं रंग आणि के वाय जेली यांचा वापर करून तयार केलेली चित्रे प्रसिद्ध चित्रकारांची आहेत यावर शिक्कामोर्तब त्यांनी केला असता? लिलाव गृहाचे याला उत्तर असे की इतरांप्रमाणे तेही ठकवले गेले होते.

**मेलानी क्लारे** ठामपणे सांगते, 'ही चित्रं' सेल मध्ये टाकण्यात आलेली नव्हती आणि आमच्याकडून दुर्लक्ष झालं. ख्यातनाम तज्ज्ञांनी अस्सलपणाचा निर्वाळा दिला होता. आणि या विवक्षित चित्रकारांविषयीचा ज्यांचा अनुभव दांडगा आहे त्यांनीही शंका प्रदर्शित केली नव्हती. आम्हाला शक्य होईल तेवढी काळजी आम्ही घेतली होती. लिलाव गृहाविषयीं-ची तक्रार म्हणजे विक्रेत्यांना द्राक्षे आंबट. **लिसा पामरनं** संशय व्यक्त केल्यानं आमच्या गृहानं **जिआकॉमेत्तीचं** चित्र लिलावातून बाजूला केलं होतं, ते चित्र अस्सल असल्याचे भरभक्कम पुरावे आमच्या समोर असतानाही. तुम्ही **'टेट गॅलरी'**च्या अर्काइव्हजमध्ये जाता आणि त्या काळात अत्यंत ख्यातनाम अशा गॅलरीची "स्टॉक बुक" तुम्ही चाळता आणि तुम्हाला चित्राचं कृष्णधवल प्रतिरुप तुम्हाला आढळून येतं. याहून हे तुम्ही अधिक काळजी ती काय घेणार? Drewe **ड्रेवेची** मजल कुठवर गेली होती हे तुम्ही कसे काय जोखणार? ख्रिस्ती या कलावस्तूंचा लिलाव करणाऱ्या संस्थेनं पवित्रा घेतला की त्यांनी provenances तपासले होते आणि गैर असं काही त्यांनी केलेलं नाही. याउपर काही भाष्य करण्यास त्यांनी नकार दिला.

**थॉमस होविंगच्या** मते लिलाव गृहे, नेहमीच अनेकदा हेतुपुरस्सर लबाडी करतात असं म्हणणं उचित नाही. वेळोवेळी त्यांचे चावे घेतले जातात कारण त्यांचा कारभार मोठ्या प्रमाणात चालतो. सर्वसामान्यपणे, प्रत्येक गोष्टीचा सच्चेपणा सिद्ध करण्याइतपत वेळ त्यांना नसतो. त्यांची उलाढालच एवढी असते की एखादा भयचकित व्हावा !

MOMA मोमाचा **लॉरी** पुस्ती जोडतो, "एखादा विक्रेता वा एखादे लिलाव-गृह जाणूनबुजून बनावट चित्रं पुरवतात असं जर ठामपणे समजण्यात आलं तर त्यांची विश्वासार्हता एवढी धोक्यात येईल की अंतिमत: एकूण प्रकरणच आत्मघातकी ठरेल."

**पीटर नाहुम** (Nahum) हा Sotheby सोथबीचा एक ज्येष्ठ डायरेक्टर ब्रिटिश चित्र विभागाचा गेली १७ वर्ष प्रमुख आणि ज्याच्याबद्दल अत्यंत आदर आहे असा एक चित्र विक्रेता Drewe **ड्रेवेनं** फसवलेल्यांपैकी हा पहिला. त्याची तक्रार आहे की बरेचसे स्वतंत्ररित्या धंदा करणारे विक्रेते आणि बरीचशी लिलाव-गृहे यांना खरोखरीच आस्था असते

ती शक्य होईल तेवढा नफा मिळवणं! परिणामी दोघंही स्वत:च्या भ्रष्टाचारांत सह-अपराधी आहेत. Sotheby सोथबीमध्ये वर्षभरात १०,००० पेंटिंग विकली आणि ४०,००० नजरेखालून घातली. खाजगी विक्रेता म्हणून वर्षाकाठी तो. ३०० ते ४०० पेंटिंग विकतो आणि त्यासाठी तो १,००,००० चित्रं नजरेखालून घालतो, विक्री मर्यादित असल्यामुळं ठकवलं जाण्याचा धोका कमी असतो, पण तो टाळता येणं एकूण कठीणच. अलिकडच्या काळात चांगल्या चित्रांच्या 'मार्केट' मध्ये मंदी आहे त्यामुळे बऱ्याचशा लिलाव-गृहांनी तज्ज्ञांना काढून टाकलेलं आहे. आजकाळ दुर्दैवाची गोष्ट म्हणजे, तज्ज्ञ कूर्मगतीनं काम करतात. वर्षभरात १,००,००० चित्रांवर तुम्ही काही जाणकारी मत देऊ शकत नाही. तुम्ही तुमचा पेशा नीट करू शकत नाही आणि पैसेही कमावू शकत नाही.

लंडनमधील **लेस्ली वॅडिंग्टन** हा विक्रेता सांगतो, Drewe **ड्रेवेबद्दलच्या** चर्चेहून ही समस्या मोठी आहे. खरा प्रश्न आहे, ख्रिस्ती आणि सोथबी Sotheby येथे तज्ज्ञ कोण आहे? विक्री करणं आणि म्हाताऱ्या बायांबरोबर गप्पागोष्टी करणं यातच ते तज्ज्ञ आहेत?... जर का लिलाव-गृहाचं कलाक्षेत्रावर वर्चस्व आहे तर Where is the expertise going to be? आपण ज्यांना प्रत्यक्ष पहात आहोत त्याचे मूल्य काय आहे याचे Visible ज्ञान असलेला असा एकही त्यांच्यापाशी नाही?

८० च्या अखेरीस **नाहुमचा** Drewe ड्रेवेशी प्रथम परिचय झाला. त्याला ठाऊक नव्हतं की Drewe ड्रेवे गेली काही वर्ष आपल्या माणसांकरवी त्याला **बेन निकल्सन** आणि **लॉरेन्स लॉरी** यांची चित्रं विकू पाहात होता. ती चांगली नव्हती आणि महागडीही होती, आणि मी काही त्यांच्याकडे लक्ष दिलं नाही. परंतु नंतर आमची परिस्थिती अतिशय डबघईला आली. बरेचसे पैसे आम्ही गमावले. आमचा खर्च आम्ही कसाबसा भागवण्याचा प्रयत्न करत होतो. धंदा नव्हता. साक्षात् नरकपुरी १९८४ मध्ये Drewe ड्रेवेचा शेजारी **क्लाईव्ह बेलमन ग्रॅहम सदरलँडचं ''क्रुसिफिक्शन''** घेऊन आला. भिक्कार होतं ते. परंतु **नाहुमला** सांगण्यात आलं की 'ख्रिस्ती'मध्ये अलिकडेच सदरलँडची अशीच दोन चित्रं प्रत्येकी २४,००० आणि ३२,००० पौंडाना विकण्यात आली होती. या सदरलँडच्या चित्रासोबत ते अस्सल असल्याची पत्रे होती, धर्मोपदेशकांची, द ऑर्डर ऑफ सर्व्हाइट मेरी– ही फोर्जरी होती हे पुढं उघडकीला येणार होतं. **नाहुमनं** चित्र खरेदी केलं आणि लंडनमधील **'ख्रिस्ती'**मध्ये लिलावासाठी पाठवून दिलं. अखेरीस त्यानं **निकल्सनची** चित्रंही खरेदी केली ती काही महान पेंटिंग नव्हती, परंतुची चमकदार होती, रंगतदार होती, मार्केटच्या रुचीला साजेशी. आकलनास कठीण अशी चित्रं मार्केटला नको असतात. 'या पेंटिंगसोबतही खातरजमा करून देणारी कागदपत्रं होती. शिवाय **निकल्सनचा** जाने माने तज्ज्ञ ॲलन बोवनेस Bowness ह्यांचंही पत्र त्यात जोडलेलं होतं. बऱ्याचदा provenance अगदी काळजीपूर्वक तपासला जातो. परंतु, माल लौकरात लौकर उचलला जाण्याची गरज असल्यानं काही वेळेला त्या चित्रांचं बारकाईनं निरीक्षण करणं तज्ज्ञांना परवडण्याजोगं नसतं.



अनुक्रमणिका

परिणामी, तयार होतं बिनकसबी धंदेवाईकपणा आणि शोध लावल्याची इर्षा यांचं विषारी मिश्रण.

**वॅडिंग्टन** सांगतो, ड्यूबूफेटस् Dubuffets म्हणजे एक जोक होता. एखाद दुसरा **निकल्सन** बऱ्यापैकी दिसत होता. मला वाटलं होतं, बनावट कृती तिसऱ्या दर्जाच्या होत्या मी दडपून दिलं होतं हे आता सांगतोय. मी जेव्हा ती पाहिली तेव्हा मी काळजीत होतो, पण ती बनावट आहेत असं मात्र मी बोललो नाही. **नाहुमच्या** मते निरपराध्यांपैकी कुणीही निरपराधी नव्हता!

परंतु धोक्याचा इशारा दिला वा 'फ्रॉड' असल्याचा भरभक्कम पुरावा सादर केला तरीही एखादं पेंटिंग विकलं जाणार नाही याची हमी देता येत नाही. १९९४ मध्ये, ड्यूबूफेटची Dubuffet ची मुलगी आपल्या वडिलांच्या gouaches गुआशेसची १८ छायाचित्रे घेऊन वॅडिंग्टनला भेटली. यात चित्रकाराचा 'ट्रेड मार्क' असलेल्या गाई होत्या. 'वॅडिंग्टन सांगतो', यापैकी काहींच्या बाबतीत मी संभ्रमीत होतो. मला वाटलं, ती बनावट आहेत. परंतु provenance उत्तम होता. माझ्या मनात विचार आला बहुधा Dubuffet ड्यूबूफेटची प्रतिभा क्षीण झाली असतानाची ही चित्रं असावीत. नंतर त्याच्या नजरेत आलं की चित्रांवर Jean Dubuffet अशी सही केलेली होती. परंतु त्याला ठाऊक होतं की चित्रकार नेहमीच स्वत:ची सही J. Duff Dubuffet अशी करत असे. नंतर त्याच्या निदर्शनास आलं की तीन की चार छायाचित्रावर नाव नोंदवलेले होतं. 'लॉरेन्स'ला वा 'लॉरेन्स ॲलोंवे'ला, १९५० मध्य 'इन्स्टिट्यूट ऑफ कंटेपररी आर्ट' चा क्युरेटर. परंतु Dubuffet ड्यूबूफेट सामाजिक रीतीभातीविषयी अतिशय काटेकोर होता आणि त्यानं Monseiur Alloway असं लिहिलं असतं. संशय अधिक बळकट करण्यास कारणीभूत झालं ते त्यावरील वर्ष १९५५ Dubuffet नं गाई रंगवण्याचं १९५४ च्या प्रारंभीच थांबवलेलं होतं.

Jean Dubuffet' Foundation ला सावधगिरीचा इशारा देण्यात आला. परंतु विक्रेताला लौकरच समजलं की इशारा देऊनही, फाउंन्डेशनच्या डायरेक्टरनं मूळ चित्रं न पाहाताच ती अस्सल असल्याचं सर्टिफिकेट देऊन टाकलं होतं. कारण तिच्या प्रियकरानं एक स्वत:साठी १६,००० डॉल्रला विकत घेतलं होतं. **ट्रेनटिनिअनची** घोडचूक बहुधा ताठरपणाचा परिपाक असावा, वा स्वत:ची चूक झाकण्याचा सावध पवित्रा असावा. न्यूर्यार्कमधील 'पेस गॅलरी'चं यापूर्वीच चार चित्रं खरीदली होती. **वॅडिंग्टन** सांगतो', प्रत्येकजण नफा मिळवत होता. शिवाय सूचति करतो की बनावट चित्रांचा ओघ थांबवण्याची इच्छा फारशी नव्हती. **ट्रेनटिनिअननं** त्यानंतर आपल्या पदाचा राजीनामा दिला. तिचं म्हणणं : त्यांच्या अस्सलपणावर मी शिक्कामोर्तब केलं, तेव्हा माझा विश्वास होता की ती Dubuffet ड्यूबूफेटची आहेत. तिचा दावा होता की त्या चित्रांची तिनं बारकाईनं छाननी केली होती. शाई चांगली होती. निष्पत्ती निर्दोष होती. सर्व दृष्टीनं छाननी समाधानकारक होती.

आपल्यापाशी आता जे पुरावे आहेत ते निश्चितच दर्शवत असते की त्या चित्रकृती बनावट आहेत, तर माझ्या चुकीबद्दल मी दिलगीर आहे.

आणखीन एक उदाहरण **जिआकॉमेत्तीचं** १९५५ मधील एक चित्र Nu Debout न्यू डबूत हे चित्र अमेरिकत विक्रेताकडे जाण्याआधी दोन स्वतंत्र विक्रेत्याच्या हातातून गेलेलं होतं. **लिसा पामरनं** या चित्राच्या अस्सलपणाविषयी शंका उपस्थित केल्यानंतर अमेरिकांनी ते चित्र खाजगीरित्या छाननी करण्यासाठी Engena Ordonez दाखवलं. Engena ही Conservator होती आणि MOMA मध्ये तिनं काम केलेलं होतं. **म्यॅटनं** ते चित्र ओढून काढलेलं होतं आणि तेही इमल्शन पेंट मध्ये. या रंगाचा शोध ६० च्या मध्यावर लागला होता. म्हणजे मूळ चित्र रंगवलं गेलं होतं त्याआधी एक तप. Ordonez अहवाल यातुरमातुर होता. ती सांगते की रंगांची छाननी करण्यासाठीच तिची मदत घेण्यात आली होती. आणि त्यांचे results समाधानकारक होते. परंतु माध्यम मात्र तसं नव्हतं, ते पेंटिंग 'फोर्जरी' आहे अशी शंका ते बळावू शकत होतं. माझ्या अहवालात मी म्हटलं आहे जे मला करायला सांगण्यात आलं होतं. एखाद्या पेंटिंगविषयी मला जे वाटतं आणि मला जे माहिती आहे ते सर्वस्वी भिन्न असं आहे.' तिला विचारण्यात आलं की चित्राच्या खरेपणाविषयी Conservator ला शंका आली परंतु ते चित्र विकलं गेलं तेव्हा तिनं हरकत घेतली नाही, याचाच अर्थ गुन्ह्याला तिचा हातभार यावर तिचं उत्तर 'चांगला प्रश्न आहे हा.'

**लॉरीचं** म्हणणं 'जेव्हा एखादा 'फोर्जर' ड्रेवे Drewe एवढं यश संपादन करतो, तेव्हा केवळ एखादी व्यक्ती केवळ एखादा विक्रेता भ्रष्टाचारी नसतात. संपूर्ण यंत्रणेचं हे अपयश आहे.

१९९४ च्या अखेरीस **ड्रेवेपूर्व** जीवनाचा साधेपणा आणि सुरक्षितता यासाठी **म्यॅट** हळहळू त्यामागे लागत होता. **ड्रेवेच्या** फोनची त्याला धास्ती वाटू लागली होती. त्याला आठवतं, 'त्याचा आवाज आपला चालूच. त्यानंतर मला हवी असायची कडक दारू. बनावट चित्रांचे बनावट मालक उभे करण्यासाठी ड्रेवे ज्या प्रकारे एखाद्याच्या कमकुवतपणाचा गैरफायदा घेत होता, मृत आणि अल्प परिचितांचा वापर करता होता ही बाबही **म्यॅटच्या** मनात घृणा उत्पन्न करत होती. त्याच्या काही बनावट चित्रांच्या provenance साठी ड्रेवेनं त्याच्या मरणोन्मुख वडिलांच्या नावाचा वापर केला होता. त्यानं स्वत:च्या आईच्या मृत्यूपत्राचा काही भाग अशा कामी उपयोगात आणत होता. **म्यॅटला** धास्तीही वाटू लागली होती, **ड्रेवेनं** दोन वेळा स्वत:ची हत्यारं त्याला दाखवली होती. आणि जवळजवळ नऊ वर्षानंतर स्वत:च्या शैलीत चित्र रंगवण्यासाठी **म्यॅट** उत्सुक झाला होता.

सहनशक्तीचा अंत पहाणारी घटना घडली **'ख्रिस्ती'**च्या लिलावाच्या वेळी. **म्यॅट** ड्रेवेबरोबर उपस्थित होता. त्यानं पाहिलं की त्यानं रंगवलेला एक Dubuffet बरेच पैसे देऊन खरेदी करण्यात आला होता. **म्यॅट** सांगतो, 'हे अगदी व्यथित करणारं होतं. ती माझी स्वत:ची चित्रकृती असावयास हवी होती.

दरम्यानच्या काळात, ड्रेवे **गाऊड्समिडकडून** बाहेर पडला होता. परंतु आपल्या फोर्जरीचे दोषारोप सिद्ध करता येतील असे पुरावे तो तिथंच सोडून गेला होता. तिनं पोलिसांशी संपर्क साधला आणि ड्रेवेकडून आलेली अशी तीन पत्रं तिच्या एका स्नेह्याच्या हवाली केली. परिचित असलेल्या आणखीन एकानं इतर कागदपत्रं **गाऊड्मिडसकडून** उचलून लंडनमधील स्वत:च्या घरी नेऊन ठेवली. १९९५ च्या जानेवारीच्या मध्यावर ड्रेवेनं **म्यॅटला** बोलावून सांगितलं की **गाऊड्समिडकडे** कागदपत्रं आहेत आणि त्याआधारे ती त्यांना 'ब्लॅकमेल' करू पाहत आहे. 'मला हे परवडण्याजोगं नाही. ते घर जाळून राख करीन.'

**गाऊड्समिड्च्या** मते, **ड्रेवेला** एव्हाना कळून चुकलं होतं की त्याचे काही कागदपत्रं तिच्या परिचिताच्या घरी आहेत. **ड्रेवेनं** तिच्याशी वारंवार संपर्क साधला. सतत भुणभुण लावली, दरवाजांना किती कुलपं आहेत आणि इशारा घंटी तिथं कुठं आहे का? एव्हाना, **गाऊड्समिडनं** पुरावा स्वत:च्या घरी आणून ठेवला. त्यानंतरच्या रात्री तिच्या परिचिताला ड्रेवेसारखी दिसणारी एक व्यक्ती तळघरात एका भाडेकरूच्या दृष्टीला पडली. त्यानंतर काही तासांनी, घर आगीच्या ज्वाळांनी वेढलं गेलं. अगदी वरच्या माळ्यावर भाड्यानं राहणाऱ्या २५ वर्षांच्या हंगेरियन बाईनं ज्वालांमधून खाली उडी घेतली, जखमी झाली, त्यातच तिचा अंत झाला. **गाऊड्समिडचं** निवेदन आणि भाडेकरूनचं वर्णन या आधारे **ड्रेवेला** अटक करण्यात आली आणि त्याला ओळख परडेमध्ये उभं करण्यात आलं. परंतु **ड्रेवेनं** एव्हाना आपल्या मिशा भादरल्या होत्या, केस काळे होते आणि चष्मा लावलेला नव्हता. तरुण भाडेकरू त्याला ओळखू शकला नाही. पोलिसांना, नाईलाजानं त्याला सोडून द्यावं लागलं.

त्यानंतर तीन महिन्यांनी, **म्यॅटचा** कबुलीजबाब आणि **गाऊड्समिडचा** पुरावा याआधारे पोलिसांनी **ड्रेवेच्या** घरावर छापा घातला आणि त्याला पुन्हा अटक केली. फसवणूक आणि फोर्जरी हे आरोप त्याच्यावर ठेवण्यात आले. चार दिवस कसून पूछताछ केल्यानंतरही, **ड्रेवेनं** गुन्हा अमान्य केला. चित्रं अस्सल होती आणि त्यानं लिलावात खरेदी केलेल्या काही चित्रांची डागडुजी करण्यासाठी मजुरीवर घेतला गेलेला **म्यॅट** हा एक असामी होती एवढंच, हीच गोष्ट तो पुन:पुन्हा सुनवत होता.

२२ वर्षांचा दांडगा अनुभव असलेला डिटेक्टिव्ह कॉन्स्टेबेल इन्स्पेक्टर मिकी व्होलपे Volpe सांगतो. 'कठपुतळ्या नाचवणारा म्हणून तो सर्वज्ञात होता. सर्व सूत्रं हाळवण्यातच त्याची स्वशक्ती खर्ची पडत होती. परिणामी त्यानं जे वास्तव रचलं होतं त्यातच तो गुरफटला गेला होता. त्या बाहेरील वास्तवाचं त्याचं भान सुटलेलं होतं. आपण कुणालाही कुशलतेनं हाताळू शकू असं समजणारा एक शाब्दिक पुंड (Verbal bully) होता : या माणसाबद्दलच्या तुमच्या ज्ञानात अधिकाधिक भर पडत जाते तेव्हा तुमच्या ध्यानी येतं त्यांनी विणलेलं लांडीलबाडीचं प्रचंड जाळं.... माझ्या आजवरच्या नोकरीत एवढ्या धूर्त व्यक्तित्वाचा माणूस मला कुणी आढळेला नव्हता.' **ड्रेवेची** जामीनावर सुटका झाली आणि तत्काळ तो फरारी झाला.



अनुक्रमणिका

तो फरारी होता त्या काळात आपल्या केसबद्दल त्यानं फेरविचार केला होता हे नि:संशय, कारण दोन महिन्यांनी त्याला जेव्हा पुन्हा अटक करण्यात आली. त्याची आई दक्षिण किनाऱ्यावरील त्याच्या छपून राहण्याच्या ठिकाणी त्याला जाऊन भेटली होती– तेव्हा पूर्ण निरपराधाकडून त्याची कहाणी भक्कम बचावाच्या चौकशीकडे सरकली होती. त्यांनी 'फ्रॉड' मान्य केलं आणि आता त्यानं दावा केला की स्कॉटलंड यार्ड, संरक्षण मंत्रालय आणि किमान सात देशाची सरकार यांनी मिळून रचलेल्या अतिव्याप्त कारस्थानात एक fall guy 'मामा' म्हणून त्याला गोवण्यात आलं आहे; पेंटिंग्ज केवळ २०० च नव्हती, तर ४,००० हून अधिक होती, ती सारी विकण्यात आली होती गुप्त शस्त्रसाठ्याच्या खरेदीला आर्थिक मदत व्हावी यासाठी आणि ब्रिटिश शस्त्रास्त्रांचे उत्पादक आणि इराण, इराक आणि सिएरा लेओन Leone यांच्यामधील दलालाला त्यानं सहाय्य केलं हातं, **म्यॅट** हा खरंतर 'भूकेकंगाल चित्रकार' नव्हता तर उग्रवादी 'न्युओ-नाझी ग्रुप'च्या 'कॉम्बॅटनट' साठी कार्यरत होता आणि अगणित बनावट provenance साठी ज्याला कोर्टापुढं खेचण्यात आलं तो **पीटर हॅरीस** वस्तुत: दक्षिण आफ्रिकन गुप्तहेर खात्याचा एजंट व शस्त्रास्त्रांचा दलाल होता. स्वत:च्या आयुष्यातील १५ वर्षांचा मागमूस नसलेल्या गूढ कालखंडात स्पष्टीकरण देताना त्यानं दावा केला की तो त्या काळात ब्रिटिश सरकारसाठी गुप्तपणे काम करत होता.' संरक्षणविषयक तंत्रविज्ञानाच्या विवाक्षित्त भागाच्या (Item) विकासासाठी मी अतिशय कार्यमग्न होतो. पेंटिंग्जची विक्री काही pretty devastating उद्ध्वस्त, नष्ट बावींशी (things) संबंधित आहे. त्यात अंतर्भूत आहे. १९९१ मध्ये 'बॅलिस्टिक मिसायल गायडन्स सिस्टिम' इराणला खरेदी करायला लावण्यात माझा हातभार लागलेला आहे. हे सिद्ध करण्यासाठी माझ्यापाशी कागदपत्रे आहेत. याला पुष्टी देणारा पुरावा सादर करण्याची त्यात वारंवार सांगूनही, **ड्रेवेला** एकही पुरावा सादर करता आला नाही. प्रोसेक्युशननं घेतलेला पवित्रा अशा आंतरराष्ट्रीय कपटकारस्थान म्हणून रंगवण्यात आलेली **ड्रेवेची** कथा म्हणजे एका भन्नाट आणि Consummate (परिपूर्ण) बदमाश Con चित्रकाराचे कपोलकल्पित आहे.

गेल्या ९८ च्या सप्टेंबरमध्ये खटला चालू असताना, art - for arms defence संरक्षणासाठी शस्त्रे – त्यासाठी कला या अनुषंगानं आपल्या वकिलानं बाजू मांडण्यास नकार दिल्यामुळे **ड्रेवेनं** त्याला हाकलून दिलं आणि आपली बाजू स्वत: मांडली. कोर्टरूम एखाद्या आर्ट गॅलरी प्रमाणे भासत होती, **म्यॅटची** नऊ बनावट चित्रं भिंतीवर लटकत होती. तीन महिन्यात खटला संपेल अशी अपेक्षा होती पण तो सहा महिने चालला. **म्यॅट** साक्षीदाराच्या पिंजऱ्यात बसला होता. **ड्रेवेच्या** तोंडावरच त्यानं त्याला 'मनोरुग्ण' 'खोटारडा' म्हणून संबोधलं. खटल्याच्या अखेरीस प्रॉसेक्युटर बेव्हननं **ड्रेवेनं** जी वेगवेगळी नावं धारण केली होती. त्यावरून त्याची खिल्ली उडवली : 'सत्य असे आहे की तू मिस्टर ड्रेवे आहेस, मिस्टर कॉकेटचे दोन नमुने (Sorts) आहेस, तू आहेस मिस्टर सुस्समान Sussman तू आहेस मिस्टर ग्रीन, मिस्टर आखूड, आणि तू आहेस मिस्टर मार्टिन आणि संशोधक मिस्टर बेयार्ड आणि मिस्टर कव्हर डेल (Cover Dale) आहेस की नाही?' सहा तासात

ज्यूरीनं निर्णय घेतला, त्याला दोषी ठरवला. ड्रेवेनं स्वतःच्या निष्ठासाठी आवाहन केलं.

**ड्रेवेच्या** यशानं काही धडा दिला आहे का? दिला असलाच तर त्याचे स्वरुप स्थूलमानाने पुढीलप्रमाणे राहील. उच्च दर्जा व तरलता या दोघांमुळे कला जगताला जे वलय प्राप्त होते त्यातून खोटी सुरक्षितता निर्माण होते. दुय्यम अशा गुणांचे जे संघराज्य आहे. त्याला सरतेशेवटी कला जगत बळी पडते. लिलाव गृहांचे विक्रेते, त्यांचे तज्ज्ञ यांनी ज्याना ठकविले होते, असे विक्रेते, म्यॅट (MYATT) याची गचाळ चित्रे, **ड्रेवेची** ओढून ताणून तयार केलेली अस्मिता आणि तिचे शांतीपाठ, आणि त्यांच्या विक्रेत्यांचे कींव करावे असे अज्ञान इत्यादी गोष्टी या तुल्यबळ ठरणे शक्य नव्हते. परंतु सरतेशेवटी कला जगताची बाजारपेठ आणि तिची रचना पद्धती याची जी अनेक स्तरावरची तटबंदी आहे. (विक्रेते, गॅलरीज, लिलाव गृहे, म्युझियम, दप्तरखाने, जागतिक दर्जाचे तज्ज्ञ या सर्वांचा यात समावेश आहे) ती तशी फारच प्रचंड प्रमाणात भोके असलेली – एकसंध नसलेली तंटबंदी होती असे सिद्ध झाले होते.

परंतु एखादं चित्रं जर कलात्मक आनंद देत आणि तिचं बनावट जातकुळी उघडकीला येण्याआधी आवडलं जातं, आणि पैसा गमावणारा एखादा संग्राहक तोटा सहन करण्याइतपत बहुधा सधन अशी एकमेव व्यक्ती असते, तर मग समस्या आहेच कुठं? १९४७ मध्ये Vermeer एका चित्राच्या फोर्जरीबद्दल Van Meegeren वर खटला चालू असताना तो म्हणाला होता : 'कालपावेतो या चित्राच मोल कित्येक लाख guilders (गिल्डर्स या डच नाण्याचं) होतं, आणि जगभरचे तज्ज्ञ आणि कलाप्रेमी पैसे खर्चून ते पाहाण्यासाठी येतात. आज, ते कवडीमोलाचं आहे आणि ते फुकटात पाहाण्यासाठी कुणी वाट वाकडी करून ते बघायला जात नाही. चित्रं तर बदलेलं नाही. मग बदललं काय?'

## २. अहंविषेश:गिरी संरचना (AN ANATOMY OF SNOBBERY)

विनोदी या विषयासंबधी निबंध लिहला असताना तो जितका विनोदशून्य ठरेल. तसेच अहंविषेश:गिरी संबधी उन्मेखून निबंध लिहणे हे आहे. विनोद या विषयासंबधी मी अगोदरच लिहले आहे. परंतु अहंविषेश: या विषयाने मला गेले अनेक वर्षे मोहीत केले आहे. विशेषत: मी इंग्लंडमध्ये येऊन स्थाईक झाल्यानंतर, त्या विषयासंबधीच्या आकर्षणात प्रकर्षाने भर पडली. तथापि कालांतराने मला हळूहळू अशी जाणीव झाली, व मग खात्री झाली की अहंविषेश:गिरी हे मूर्खपणाचे एक द्योतक, वा मानवी कमकुवतपणा नसून, आधुनिक मानवाच्या मानसिकतेत असलेले काहीतरी मूलभूत द्रव्य आहे. विद्यमान सभ्यतेत अनुस्यूत असलेल्या सामाजिक आणि सांस्कृतिक मूल्यातील विसंवाद व या सभ्यतेत आढळणारी सर्वसामान्य अशी रोगट प्रवृत्ती यांना परावर्तन करणारे अहंविषेश:गिरी हे लक्षण आहे.



अनुक्रमणिका

हिटलरचा अभ्युदय होऊन, त्याने सत्ताग्रास करण्याअगोदर वायमार (WEIMAR) प्रजासत्ताक या नावाने महाशूर असलेली राजवट जर्मनीत होती. लैंगिक बाबतीत कोणासही काहीही करावयास परवानगी देणारी ती राज्यव्यवस्था. या दिवसात डाव्या विचारसरणीची पुस्तके व पुस्तिका प्रसिद्ध करणारी एक प्रकाशन संस्था होती. त्यात काम करणारी एक तरुणी **मेरी बी,** ही माझ्या चांगल्या परिचयाची होती. अतिशय देखणी व चतुर पण अत्यंत सैल कासोट्याची असण्याबद्दल कुप्रसिद्ध. तिच्याबद्दल एक विनोद नेहमीच चघळून सांगितला जात असे. **मेरी बी,** ही ज्या कोणा लेखकाच्या पुस्तकांच्या वीस हजाराहून अधिक प्रती विकल्या गेल्या आहेत अशा लेखकाबरोबर समागम करीत असे. असा जो कोणी लेखक असे, त्याचे वय कितीही असो, वा लिंग कोणतेही असो. समागम करण्यासाठी अट एकच. 'वीस हजाराहून अधिक प्रती' विकल्या जाणे. मी त्यावेळी एकही पुस्तक लिहिले नसल्या-कारणाने, **मेरी बी** बरोबर समागम करण्यास मला संधीच मिळाली नसती ! हे अर्थातच स्पष्ट व उघड आहे. परंतु असे होते तरी आमची मैत्री चांगलीच घनिष्ट होती. एक दिवस मी तिला विचारले, ही जी 'अफवा' आहे. तिच्यात काही सत्याचा अंश आहे का? **मेरी बी** ने मला अत्यंत गंभीरपणे जबाब दिला ती 'अफवा' वस्तुस्थितीची यथायोग्य निदर्शक आहे. त्यानंतर आपण हे असे कां वागतो? याचे स्पष्टीकरण तिने दिले. वाङ्मयीन क्षेत्रातील अहंविषेश:गिरीचे आत्यंतिक टोकाचे ते उदाहरण आहे. असे मला त्यावेळी तरी वाटले होते.

जर्मनीतील पूर्व प्रशिया या विभागातील सामंत कुटुंबात तिचा जन्म झाला होता. हे कुटुंब ख्रिश्चन धर्मातील लुथिरीयन पंथाचे अत्यंत कडवे व कर्मठ अनुभावी होते. आपणास इच्छा आहे त्यानुसार आपण आपले जीवन व्यतित करावे या हेतूने ती आपल्या या कर्मठ घरातून वयाच्या विसाव्या वर्षी पळून गेली. ती सुस्वरूप होतीच. शिवाय अनेक तरुणांनी तिला आपल्याकडे आकर्षित करून घेतले होते. या अशा तरुणांबरोबर एकापोठापाठ एक अशा प्रकारे अनेक तरुणांबरोबर तिने समागम केला. परंतु आपण ते काही करीत आहोत ते 'पाप' आहे, या विचारांनी तिला पछाडल्यामुळे या संबधातून जे काही लैंगिक सुख मिळणार होते. त्याचा विचका होतो आहे, असे तिच्या लक्षात आले. तिच्या वयाच्या एकविसाव्या वर्षी एका लेखकाने तिला फुसलावून गटविले. वस्तुस्थिती अशी होती की, तिला या लेखकाच्या शरीराची ठेवण वा त्याचे एकंदर व्यक्तित्व याचे आकर्षक अजिबात नव्हते. असे होते तरीही त्याच्या भुलावणीस ती बळी (?) पडली होती. परंतु लेखकाबरोबर समागम केल्यानंतर तिला आर्श्चयजनक अनुभव आला. तोवरच्या गतआयुष्यात आपण अनेक प्रकारच्या वेगवेगळ्या व्यक्तींबरोबर समागम केला, पण त्यावेळी आपण जो लैंगिक अनुभव घेत होतो त्याच्यात आपण 'पाप' करीत आहोत म्हणून त्या अनुभवात अपराधीपणाची भावना अंतर्भूत होती. असे होते तरी या न-देखण्या लेखकांशी समागम करताना, आपणास आजवर ज्या हव्याहव्याशा वाटणाऱ्या ज्या लैंगिक अनुभवाने गुंगारा दिला होता, तो अनुभव कोठच्याही

प्रकारची अपराधीपणाची भावना आपल्या मनात न येता आपल्याला प्राप्त झाला आहे हा अनुभव ती घेत होती. **मेरी बी** च्या आयुष्यातील ही जी घटना व हा जो विशिष्ट अनुभव होता तो तिच्या 'वीस हजाराहून अधिक प्रती'च्या लेखकांशी समागम या मनोगंडाची सुरवात होती. या मनोगंडाच्या उत्पत्तीचे स्पष्टीकरण तिचे तिला सांपडले होते. आपल्या करोल व करड्या पित्याबरोबर झालेल्या एका कल्पित संभाषणाचे स्वरूप त्या स्पष्टीकरणाला होते. "...... परंतु बाबा आता हे बघा, एखाद्या प्रसिद्ध व्यक्तीबरोबर समागम करणे ही घचोर गोष्ट नाही– इतिहासाबरोबर समागम करण्यासारखेच ते आहे. मारी वालीवेस्का, नेपोलियनला वश झाली म्हणून तिला कोण दोष देईल, प्रसिद्ध व्यक्तीबरोबर आपण जे जे काही करतो, त्यात जे काही 'पाप' अनुस्यूत असेल, ते 'पाप' त्या सर्वच घटना ऐतिहासिक आख्यायिका ठरल्याकारणाने, ती कृत्ये पापमुक्तच होतात."

तिच्या या मनोगंडापोटी, **मेरी** मृत्युमुखी पडली. मिशेल कोलझोव हे एकेकाळी **प्रवदा** या रशियन दैनिकाचे फार प्रख्यात वार्ताहर होते. हा मनुष्य रूपाने अतिसामान्य आणि कोणाच्याही खिजगणितीत येणार नाही असा छोटा माणूस. त्याचे लिखाण वीस हजारच काय पण वीस लाख लोक वाचीत होते. **मेरी** त्याची 'मैत्रीण' झाली. इ. स. १९३८ साली रशियात स्टॅलिनच्या हुकुमावरून जे हत्याकांड झाले त्यात कोलझाव 'नापत्ता' झाले आणि **मेरी**ही त्यांच्याबरोबर नाहीशी झाली. अहंविषेशं:गिरीचे जे मानसशास्त्र आहे त्यातील अधिक करून जटिल व न समजणाऱ्या पैलूवर मेरीच्या उदाहरणावरून प्रकाश पडण्यास मदत होणार असल्याकारणांने मेरीच्या उदाहरणाकडे मी पुन्हा एकदा येणार आहे.

२

माझी एक मैत्रीण. आपण तिला **ब्रेंडा** या नांवाने संबोधूया. तिच्या एका चहात्याने तिच्या वाढदिवसानिमित्त, **पिकॅसो** या जगतविख्यात चित्रकाराने केलेले एक रेखाटन भेट दिले. हे रेखाटन एका अगदी साध्या चौकटीत बसविलेले होते. **पिकॅसो** यांच्या कलाआयुष्यातील 'अभिजात' या नावाने ओळखला जाणारा जो कालखंड आहे त्याचे कौतुकास्पद, विलोभनीय पण साधे असे ते उदाहरण होते. या रेखाटनात एक ग्रीक तरुण आपल्या हातात एका तरुण मुलीला उचलून घेऊन जात आहे असे दाखविण्यात आले होते. या चित्रातील या दोन्ही व्यक्तींची शरीरे बंदिस्त करणाऱ्या रेषा या इतक्या एकमेकात गेलेल्या होत्या की एकाच शरीरात असलेल्या **सयामिझ** जुळ्यांच्या शारीरिक अवयवांचे स्वरूप त्यांना आलेले होते. थोडक्यात तो ग्रीक तरुण आणि ती मुलगी याना अलगपणे पहाताच येत नव्हते. हे रेखाटन पहाताना मनाला भुरळ पडे आणि एकंदरीत त्या रेखाटनाचा परिणाम फारच सुसंवादी होता. परंतु हे रेखाटन एखाद्या लिथोग्रॅफसारखे दिसत होते. शिवाय त्यावर कोणताही अनुक्रम क्रमांक नव्हता. म्हणून **ब्रेंडाला** वाटले ती मूळ चित्राची प्रतिकृती असावी.

या कारणाने ती थोडीशी नाराज झाली होती. तिचा अपेक्षाभंग झाला होता. आपल्या घराच्या पहिल्या मजल्यावर जाण्याकरता जो जिना होता, त्याला लागून असलेल्या भिंतीवर तिने ते टांगून ठेवले. या नंतर अनेक आठवड्यांनी मी तिला भेटायला गेलो; त्यावेळी मला ते तिच्या दिवाणखान्यात जी शेकोटीची जागा होती त्याच्या वरच्या भिंतीवर मोठ्या दिमाखात टांगून ठेवलेले दिसले. ते पाहून मी तिला म्हटले, **'पिकॅसो'**च्या चित्राच्या प्रतिकृतीला बढती मिळालेली दिसते. हे उद्गार मी काढल्याबरोबर ती रागाने मला म्हणाली "ती प्रतिकृती नाही, खुद्द **पिकॅसोच्या** हाताने केले गेलेले अस्सल रेखाटन आहे हे सिद्ध झाले आहे ! किती छान आहे नाही का? त्या मुलीची नितंबावरून जाणारी ती रेषा बघ......" इत्यादी.

खरे सांगायचे झाले, तर ते रेखाटन अस्सलच होते. **ब्रेंडा**च्या एका मनस्वी निष्ठावान चहात्याने, पुटपुटल्यासारखे बोलून, अत्यंत लाजाळूपणे, आपल्या भेटीच्या थोरवीबद्दल फारसे काही न सांगता, तिला दिलेली वाढदिवसाची ती भेट होती. ते रेखाटनच होते. त्यात फक्त रेषा होत्या. पांढऱ्या कागदावर शरीराचा आकार व घाट दर्शविणाऱ्या काळ्या रेखा व्यतिरिक्त त्यात एरवी दुसरे काहीही नव्हते. म्हणूनच ते रेखाटन 'अस्सल' आहे. की ती लिथोग्राफ आहे का ती प्रतिकृती आहे हे ठरविण्यासाठी, त्या क्षेत्रातील मान्यवर तज्ज्ञाची आवश्यकता होती. किमानपक्षी अतिशय चांगल्या सूक्ष्मदर्शकाची जरुरी होती. एवम, **ब्रेंडा** अथवा तिला भेटायला आलेल्या कोणत्याही व्यक्तीला 'अंस्सल' व इतर प्रकारची 'नक्कल' यातील फरक सांगता आला नसता. असे होते तरीही त्या सर्वांनी असे गृहीत धरले – खरे म्हणजे आपण सर्वच तसे करतो – की 'अस्सल रेखाटन दिवाणखान्यातील मानाच्या जागी स्थानापत्र व्हावयास हवे. प्रतिकृती ही फारच झाले तर जिन्याजवळ भिंतीवर मध्यभागी हीच तिची खरी जागा आहे.

हा जो दृष्टिकोन आहे, तो तसा स्वाभाविक आहे, असे भासते. एखाद्या पब्लिक पंडिताप्रमाणे, तसे भासण्यामागच्या कारणांची यादी देण्याचा व त्यांचे विश्लेषण करण्याचा मी प्रयत्न करणार आहे. एखाद्या प्रतिकृतीपेक्षा अस्सल चित्र हे कितीतरी पटीने अर्थातच महाग असते. परंतु केवळ याच कारणाने एखाद्या चित्राला घरात कोठचे स्थान असावे हा निष्कर्ष कोणी काढला, तर आपण तो विचार व ती कल्पना ही अगदी रागारागाने त्याज्य ठरवू. असे करताना, आपण अशी बतावणी करतो की याबाबत केवळ सौंदर्य शास्त्रीय दृष्टिकोनातून केलेली निवड, हीच आपण मार्गदर्शक मानतो. यानंतर कोणी असा संशय व्यक्त करील की या प्रतिकृतीत काही ही त्रुटी आवश्यकपणे हजर असल्याकारणाने आपण त्यासंबधी तुच्छता व्यक्त करतो. उदा. व्हिक्टोरिया राणीच्या काळात प्रतिकृतींची छपाई निकृष्ट दर्जाची होत असे. दोन त्या प्रतिकृतीतील चित्रांच्या विषयाची निवड आपणास न आवडणारी असेल. परंतु आधुनिक काळातील छपाईबद्दल त्याचा दर्जा निकृष्ट प्रतीचा आहे असे विधान करता येणार नाही. आधुनिक मुद्रणकलेने आणि तंत्रविज्ञानाने अनेक चमत्कार सिद्ध करून

दाखविले आहेत. आधुनिक GANYMEDE तंत्रानेच्या मदतीने कमालीच्या सूक्ष्म थराच्या पाणरंगात छापलेल्या प्रतिकृती, या मूळ अस्सल चित्रापासून वेगळ्या काढून दाखविता येत नाहीत. कमालीच्या सूक्ष्म अशा रेषांनी केलेले एक अस्सल रेखाटन आणि त्याची प्रतिकृती यांत सौदर्यशास्त्राच्या दृष्टीने सर्वस्वी तंतोतंतता आधुनिक मुद्रण कलेच्या मदतीने साध्य होते.

आणि असे असले तरी या तंतोतंततेतला काही भाग, आपल्या सर्वांच्या फारच अरुचीचा असतो. एक अस्सल चित्र आणि त्याची आधुनिक तंत्रविज्ञानाच्या मदतीने शक्य कोटीत आलेली प्रतिकृती. या दोघांचाही आपल्यावर सौंदर्यदृष्ट्या परिणाम होतो. परंतु त्या दोन्ही चित्रानी केलेल्या परिणामात आपल्याला काहीही फरक दाखविता येत नाही. हे स्वत:शीच कबूल करायला देखिल निश्चितपणे धैर्य लागते. पराकोटीचे धैर्य यदाकदाचित् लागत नसेल. पण काही प्रमाणात धैर्य निश्चितच लागते. हे नाकारणे ही आत्मवंचना आहे.

कारखान्यातून प्रचंड प्रमाणात एकछापी उत्पादन होण्याच्या युगात आपण विद्यमान आहोत. एकछापी प्रचंड प्रमाणात उत्पादन केलेले फर्निचर, घराच्या सुट्या भागांची कारखान्यात निर्मिती होऊन मग त्या भागांची जोडाजोड करून उभारण्यात येणारी असंख्य एकछापी घरे, हे सारे आपण मुकाटपणे सहन करतो. पण हे केल्यानंतर एखाद्या महान चित्रकाराच्या चित्रांच्या अशा प्रकारच्या असंख्य प्रतिकृतींचे उत्पादन होणे, ही कल्पनाच आपणास असत्य वाटते. परंतु गंमत अशी आहे की, प्रचंड प्रमाणात निर्मिती होत असलेल्या गाण्यांच्या तबकड्या, छापखान्यातून बाहेर पडणारी असंख्य पुस्तके ग्रंथ व त्यांच्या लक्षावधी प्रती यांच्याविषयी आपल्या मनात कोणताही विरोधी सूर उमटत नाही. खरे म्हणजे या दोन्हीही गोष्टी एकछापी उत्पादन व्यवस्थेचा भाग आहे. असे असेल तरी ती उत्पादने आपणास असह्य वाटत नाहीत. कमी अधिक प्रमाणात दुसऱ्या श्रेणीत ज्याची गणना करावी लागेल अशा अस्सल चित्रापेक्षा (अर्थात हे प्रत्येक व्यक्तीच्या वार्षिक उत्पन्नानुसार बदलेल) आपण एका महान चित्रकाराच्या श्रेष्ठ श्रेणीतील चित्राच्या प्रतिकृतीला आपल्या दिवाण-खान्यातील भिंतीवर मानाचे स्थान कां देत नाही? उदाहरण घ्यायचे झाले तर पेपरबॅकमध्ये उपलब्ध असलेल्या शेक्सपिअरच्या साहित्यापेक्षा एका दुय्यम श्रेणीच्या तरुण कवीची निर्मिती हस्तलिखिताच्या स्वरूपात उपलब्ध आहे, म्हणून आपण ती वाचण्यासाठी अधिक पसंत करणार का?

असे दिसते आहे की आपल्या वाद-संवादाचा या ठिकाणी 'लोचा' झालेला आहे. तो असा काही वेगवेगळ्या भावनात व तार्किक युक्तिवादात रुतला आहे की तेथून तो बाहेर पडणे कठीण आहे. म्हणूनच **ब्रेंडाला** आपल्या निर्णयाबद्दल व त्यानंतरच्या वागणुकीबद्दल काय स्पष्टीकरण घ्यावयाचे होते, हे तिच्या शब्दातून कसे व्यक्त झाले याचा तपास घेऊ या. माझ्याशी तिचा या प्रश्नाबद्दल जो संवाद झाला तो असा होता :–

**ब्रेंडा :** मला खरोखरच हे समजत नाही हा सर्व गवगवा व बोलाचाली कशा करता आहे. मला हे रेखाटन खुद्द **पिकॉसोने** केलेले आहे हे कळल्यानंतर माझा त्या रेखाटनाकडे बघण्याच्या दृष्टिकोनात **अर्थातच** बदल झाला. पण याचा आणि अहंविषेश:गिरीशी अजिबात संबध नाही...... मला पूर्वी ते रेखाटन **पिकॉसोचेच** आहे हे सांगण्यात आले नव्हते. एवढेच यापेक्षा त्यात अधिक काहीही नाही.

**कोईस्लर :** तुझ्या दृष्टिकोनात बदल झाला आहे, हे नक्की. पण तू दिवाणखान्यातील भिंतीवर जे टांगले आहेस त्यात काही बदल झालेला नाही.

**ब्रेंडा :** त्यात अर्थातच काहीही बदल झालेला नाही. परंतु मी त्या रेखाटनाकडे अगदी सर्वस्वी वेगळ्या **दृष्टीने** पहाते.

**कोईस्लर :** मला एवढेच समाजावून घ्यावयाचे आहे की, त्या रेखाटनाकडे पहाण्याचा तुझा दृष्टिकोन सर्वसामान्यपणे कोठच्या गोष्टीनी ठरविला जातो वा मर्यादित केला जातो.

**ब्रेंडा :** त्या रेखाटनतले गुण व श्रेणी.

**कोईस्लर :** आणि होय पण त्याची गुणात्मकता ठरविण्याचे निष्कष कोणते?

**ब्रेंडा :** हे बघ तू असे तात्यापंतोजी होण्याचे कारण नाही. चित्रातील रंग, रचना, मांडणी, संतुलन, सुसंवाद ताकद आणखी तुझ्या मनात जे काही असेल ते.

**कोईस्लर :** म्हणजे तू त्या रेखाटनाकडे, पहात होतीस तेव्हा तुला अत्यंत विशुद्ध अशा सौंदर्यशास्त्रीय मूल्यमापन पद्धतीने मार्गदर्शन केले होते. होय अर्थातच तू ज्या गुणांचा उल्लेख केला आहेस. त्यांच्यावर ते अवलंबून होते, हे ओघानेच आले असे नाही का?

**ब्रेंडा :** अगदी बरोबर. मी त्यांचेच मार्गदर्शन स्वीकारार्ह मानतो. मी त्यांच्यावर अवलंबून असते.

**कोईस्लर :** असे पहा. त्या रेखाटनात काहीही बदल झालेला नाही. तसेच त्याच्या गुणवत्तेत काहीही फरक पडलेला नाही. मग तुझा जो दृष्टिकोन आहे त्यात बदल कसा झाला.

**ब्रेंडा :** मूर्खा, मी तुला या पूर्वीच सांगितले की त्या रेखाटनाकडे पहाण्याच्या माझ्या दृष्टिकोनात अर्थातच बदल झाला आहे. याचे कारण लक्षावधी प्रतिकृतीतले ते रेखाटन नसून ते खुद्द **पिकॉसोने** केलेले अस्सल रेखाटन आहे. तुला एवढे साधे दिसत नाही का?

**कोईस्लर :** नाही, मला दिसणे शक्य नाही. तुझ्या बोलण्यात अंतर्विरोध आहे. चित्र दुर्मिळ असणे आणि ते अस्तित्वात केव्हा व कसे आले याबद्दल ज्ञान असणे, या दोन्ही कारणामुळे, त्या चित्राच्या ठिकाणी जे गुण आहेत, त्यात बदल होत नाही आपण असे म्हणूया की त्या चित्राबद्दल प्रथम जे मत होते. त्यात बदल होण्याचे काहीच कारण नाही. तुझे पहिले मत हे जर विशुद्ध सौंदर्य निकषावर खरोख व आधारलेले असले– निदान तुझी तशी श्रद्धा आहे – तर त्यात बद्दल होण्याचे काहीही कारण नाही. परंतु ते तसे नाहीये. तू जे **पहातेस** त्यावर तुझे मत आधारलेले नाही. केवळ योगायोगाने हाती आलेल्या माहितीवर ते

आधारलेले आहे. आता तुला मिळालेली माहिती खरी असेल वा नसेल परंतु तो भाग आपण ज्या मुद्याची चर्चा करीत आहोत, तिच्याशी ती माहिती निगडित नाही.

**ब्रेंडा :** साफ चूक ! माझ्याकडेच **पिकॉसोने** काढलेले जे चित्र आहे, ते अस्सल नाही असा आरोप करण्याचे **धारिष्ट** तू दाखवतोस? तसेच ते चित्र खुद्द **पिकॉसोने** काढलेले आहे की नाही, हे त्या मुद्याशी संबधित नाही असे बोलण्याचे **धारिष्ट** तू कसे दाखवितोस?

आणि हा वादविवाद अशाच प्रकारे कायम चालूच राहील. त्याला अंत नाही. तथापि एक गोष्ट या ठिकाणी ध्यानात ठेवणे आवश्यक आहे. **ब्रेंडा** ही मूर्ख नाही. तिच्या मनात गोंधळ आहे एवढेच. केवळ सौंदर्यवाचक विचारानेच, एखाद्या कलावस्तूकडे पहाण्याचा आपला निर्णय व मत ठरविले जाते. अशी तिची श्रद्धा आहे. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की तिच्या मतावर व निर्णयावर काही सर्वस्वी वेगळ्या प्रकारच्या कारणामुळे निर्णायक प्रभाव पडलेला आहे. तिच्या मनातील गोंधळ दोन वेगळ्या गोष्टींची गल्लत झाल्याकारणाने आहे. ते चित्र अशा प्रकारे अस्तित्वात आले याबद्दलचे तिचे ज्ञान व त्याचा संदर्भ, हे चित्र पहाताना तिला अलग ठेवताच येत नाही. आणि समजा तिला असे कळले असते, की ते काहीही असो, ते चित्र ही एक प्रतिकृतीच आहे, तर या बदललेल्या संदर्भात तिच्या या चित्राकडे पहाण्याच्या दृष्टिकोनात बदल झाला असता. या शिवाय हे चित्र कोणी, केव्हा व कसे काढले ही माहिती वा प्रश्न, त्या चित्राचे सौंदर्यशास्त्रदृष्टया मूल्य किती आहे या प्रश्नाशी अजिबात संबधित नाही. याबद्दल ती खरोखर रागावलेली असते. याचे कारण असे आहे की की आपणा सर्वांच्याच मनात, एखादी कलाकृती मग ती साहित्यातील असो वा कलाक्षेत्रातील असो, ती कलाकृती निर्माण कशी झाली तिचा खरोखरीचा निर्माता कोण होता आणि ती कलाकृती खरोखरच अस्स्ल आहे का? हे सारे प्रश्न त्या कलाकृतीच्या मूल्यमापनात नेहमीच हजर असतात. हे प्रश्न त्या कलाकृतीबाबतच्या आपल्या दृष्टिकोनाशी इतक्या जवळकीने आणि आपणास ते ओळखताही येणार नाहीत अशा पद्धतीने इतके एकजीव झालेले असतात की त्यांची फारकत करणे, हे जवळ जवळ अशक्य कोटीतले आहे असे आपणास आढळून येते. एवंच एका क्षेत्रात प्रस्तुत असणारी मूल्ये, दुसऱ्या एका वेगळ्याच मूल्य पद्धतीवर **ब्रेंडा** अजणाता प्रक्षेपित करीत होती.

पण याचा अर्थ **ब्रेंडा** ही 'अहंविषेश:' होती का? अहंविषेश:गिरीची आपण जी व्याख्या करू, त्यावर ते अवलंबून आहे. तसे केले म्हणजे मग, त्या वादाची तड लागेल अशी आशा आपण करू या. एक कामचलाऊ परिकल्पना म्हणून मी पुढील व्याख्या करतो. एका 'दिलेल्या क्षेत्रात' त्या क्षेत्राशी प्रस्तुत नसलेल्या मूल्यांचा त्या दिलेल्या क्षेत्रातील गोष्टीबाबत निर्णय घेताना अजाणतेपणे वापर करणे ही जी प्रक्रिया आहे, तिचा अहंविषेश:गिरी हे जे घटित आहे त्याबाबतीतले सारतत्त्व आहे. ही प्रतिकृती अस्सल चित्राइतकीच सुंदर आहे. परंतु अस्सल चित्र पहाण्याचा जो अनुभव आहे तो अधिक रोमांचकारी असतो. हे असे

वाटण्याची जी कारणे आहेत त्याचा सौंदर्याशी काहीही संबध नाही असे विधान **ब्रेंडाने** केले असते. मग येथे सूचित केलेल्या मापदंडानुसार **ब्रेंडा** ही अहंविषेश: ठरली नसती. आपल्या अनुभवात जे दोन घटक अनुस्यूत आहेत, त्यातील फरक करता येत नाही. तसेच आपले पूर्वग्रहदूषित असे जे सौंदर्य निकष आहेत, त्यांचा त्या चित्राशी संबध नसण्याचे कारण तिला जाणता येत नाही किंवा आपण जो निष्कर्ष काढला आहे तो पूर्वग्रहदूषित आहे, हे तिला समजत नाही. या सर्व कारणामुळे ती अजाणता अहंविषेश: ठरते.

एका अगदी स्पष्ट असलेल्या मुद्याबाबत मी काथ्याकूट करीत आहे याची जाणीव मला आहे. पण दुसऱ्या एका संबधित पण वेगळ्या प्रश्नाकडे आपण वळलो म्हणजे मग हा मुद्दा तितकासा स्पष्ट नसणारा होणार आहे.

३

इ. स. १९४८ सालची गोष्ट, जुन्या कलाकृतीची डागडुजी करणारे एका जर्मन कलावंत त्यांचे नाव **डिट्रिच फे** (DIETRICH FEY) **जुन्या सेंट मारीअन** चर्चची डागडुजी व पुनर्बांधणी करण्याच्या कामावर त्यांची नेमणूक झाली होती. त्यांनी असे जाहीर केले की त्यांच्या कामगारांना तेराव्या शतकातील काही भिंतीचित्रांच्या (WALL PAINITINGS) खुणा आढळून आल्या आहेत. चर्चच्या भिंतीला जो चुना पूर्वी फासण्यात आला होता. त्याच्या खाली या खुणा त्यांना आढळून आल्या होत्या. या जुन्या चित्रांची डागडुजी करण्याचे काम **फे** यांचे मदतनीस **लोथार मालस्कात** यांच्यावर सोपविण्यात आले होते. त्यांना हे काम पुरे करण्यास दोन वर्षे लागली. इ. स. १९५० साली जर्मन लोकशाही संघराज्याचे **चॅनसलेर आडनोअर** (ADENAUER) यांच्या अध्यक्षतेखाली एक समारंभ झाला. या समारंभास युरोपमधील सर्व विभागातून आलेले कला तज्ज्ञ हजर होते. तेराव्या शतकातील चित्रे डागडुजी करून पूर्ववत् आणण्याच्या कामाची सांगता साजरी करण्याचा तो समारंभ होता. त्या सर्व कला-तज्ज्ञांचे जे मत होते त्यात एकही मत विरोधी नव्हते – त्याला **चॅनसलेर आडनोअर** यांनी मुखर केले; आणि सांगितले की, "या चर्चच्या भिंती भूषविणारे तेराव्या शतकातील एकवीस गॉथिस संत हा एक अमोल ठेवा आहे आणि एकेकाळी गमावून बसलेल्या अत्यंत उच्च प्रतीच्या कलाकृतींचा हा लागलेला **शोध** हे आपल्या कल्पनेपलिकडचे आश्चर्य आहे."

या भिंतीचित्राबाबत त्या ठिकाणी हजर असलेल्या कला-तज्ज्ञानी आणि नंतरही ती भिंती-चित्रे अस्सल नाहीत अशी शंका कधीही व्यक्त केली नाही. खुद्द **श्री. मालस्कात** यांनीच दोन वर्षांनी जाहीर केले की हा एक बनाव (FRAUD) आहे. ल्यूबेक पोलिस कचेरीत ते स्वत:हून हजर झाले. त्यांनी त्या ठिकाणी असे निवेदन केले की, "माझे वरिष्ठ **श्री. फे** यांच्या हुकुमावरून आपणच ती सर्व भिंती-चित्रे तयार केली. त्या कलाकृती सर्वस्वी

माझ्या आहेत. आपण ही बनावटगिरी केली यासाठी माझ्यावर खटला करा.'' अशी विनंतीही त्यानी केली. हे सारे झाले तरी प्रमुख जर्मन कलासमीक्षकांनी आपले पूर्वीचे मत बदलले नाही. ही भिंती-चित्रे तेराव्या शतकातलीच अस्सल व खरी चित्रे आहेत. **श्री. मालस्कात** केवळ स्वस्त व झटपट लोकप्रियता मिळविण्यासाठी ती आपण स्वत: काढली आहेत असे सांगत आहेत असे त्या प्रमुख कलासमीक्षकांनी ठासून सांगितले. या सर्व प्रकरणाची तपासणी करण्यासाठी एक सरकारी समिती नियुक्त करण्यात आली. या समितीने ती तथाकथित डागडुजी केलेली चित्रे, ही बनावट आहेत असा निष्कर्ष काढला. परंतु हा निष्कर्ष **श्री. मालस्कात** यांनी आणखी एका कबुली जबाब दिल्यानंतर काढण्यात आला होता. हे या ठिकाणी लक्षात ठेवले पाहिजे. **श्री. मालस्कात** यांनी असे कबूल केले की **रेंब्रा, वाटो तुलोज-लोत्रेक, पिकॅस्सो, हेन्री रुसो, कोरो, छगाल, ब्लामिक,** आणि याच्यासारख्या दुसऱ्याही अनेक चित्रकारांनी काढलेल्या चित्रांच्या **शेकडो** प्रतिकृती तयार करून, त्यांनी त्या अस्सल म्हणून खपविलेल्या आहेत. यापैकी काही प्रतिकृती **श्री. फे** यांच्या घराची झडती झाली, त्यावेळी पोलिसांच्या हाती सापडल्या होत्या. झालेल्या **गुन्हाचा प्रत्यक्ष पुरावाच** पोलिसांच्या हाती पडला नसता, तर त्या प्रमुख जर्मन कलासमीक्षकांनी आपण कसे चांगलेच चकलो होतो हे कधीही मान्य केले नसते.

प्रमुख कलासमीक्षक चकले हा माझा मुद्दा नाही. या पूर्वीही अशा प्रकारची बनावट चित्रे तयार करून, लोकांना फसविण्यात आलेले आहे. **श्री. मालस्कात** यांनी केलेली फसवणूक हे त्या असंख्य उदाहरणातील अगदी अलिकडेच उदाहरण **फेरमिर** (VERMEER) या जगतविख्यात चित्रकाराच्या अस्सल चित्रावरून तयार केलेल्या **फॉन मगरिन** (VAN MEGEEREN) यांच्या प्रतिकृती हे या अशाच प्रकारच्या फसवेगिरीतील एक अत्यंत नामवंत कल्पनाही करता येणार नाही असे उदाहरण. या सर्व बनावातून एक अत्यंत त्रासदायक प्रश्न उपस्थित होतो, तो म्हणजे ल्युबेक येथील संत आता अस्सल नसून ते नक्कल आहेत हे ठरल्याकारणाने ते कमी 'सुंदर' झाले आहेत का? ती भिंती चित्रे हा पराकोटीची कलात्मक असलेला अमोल ठेवा आहे हे विधान रद्दबाबतल ठरणार होते का? अस्सल आणि नक्कल यातील फरक अत्यंत नामवंत कलातज्ज्ञांनाही जर टिपता आला नाही, तर मग कलावस्तुसंग्राहालयास भेट देणाऱ्या सामान्य प्रेक्षकाला या दोन्ही प्रकारच्या चित्राकडून मिळणारा सौंदर्य अनुभव सारखाच असावयास हवा. कलावस्तु संग्रहालयाच्या क्युरेटरने, **फेरमिअरच्या** ऐवजी **फॉन मगरिन** यांचे नाव टाकले की काम भागेल.

हे अशा प्रकारचे जे प्रतिपादन आहे, त्याला अनेक उत्तरे आहेत. परंतु त्यात शिरण्यापूर्वी सैतानाचे वकीलपत्र मी घेतले असल्याकारणाने तेच काम पुढे चालू ठेवतो. सर्वस्वी एका वेगळ्या क्षेत्रातील फसवेगिरीचे उदाहरण आपण घेऊ या. **मॅकफरसन** यांचे OSSIAN ओस्सीयन हे उदाहरण पाश्चिमात्य साहित्य जगतात चांगलेच कुप्रसिद्ध आहे. या

फसवेगिरीतील प्रमुख व महत्त्वाच्या घटनांचा गोषवारा असा आहे. **जेम्स मॅकफरसन** (१७३६-९६) हे स्कॉट कवी आणि साहसी कृत्ये करण्यास नेहमीच उत्सुक असलेली व्यक्ती. त्यानी असे जाहीर केले की **स्कॉटलंडमध्ये हायलँडस** म्हणून ओळखल्या जाणाऱ्या भागात ते हिंडत असताना, त्यांना GAELIC **गेलिक** भाषेतील पुराण्या हस्तलिखितांचा शोध लागला. स्कॉटिश साहित्याबद्दल उत्साही असलेल्या रसिकांनी लगेच वर्गणी काढून पैसे जमा केले. **मॅकफरसन** यांनी आपले या क्षेत्रातील संशोधन चालू ठेवले यासाठी त्यांच्या हवाली ते पैसे करण्यात आले. इ. स. १७६१ मध्ये FINGAL; AN ANCIENT EPIC POEM IN SIX BOOKS, TOGETHER WITH OTHER POEMS COMPOSED BY OSSIAN THE SON OF FINGAL फिनगाल एक पुरातन **सहा खंडातील महाकाव्य आणि इतर कविता ओस्सीअन** यांचा मुलगा फिनगाल यांनी रचलेले) तिसऱ्या शतकात ओस्सीयन नांवाचा एक हिरो होऊन गेला अशी आख्यायिका आहे. तो सेल्ट्रिक (CELTIC) भाषेतील साहित्यिकही होता. फिनगालच्या पाठोपाठ TEMORA **तेमोरा** हे आणखी एक महाकाव्य प्रसिद्ध झाले. त्यानंतर THE WORKS OF OSSIAN या नावाने **ओस्सीअन** यांच्या समग्र साहित्यांचे खंडही प्रसिद्ध झाले. **मॅकफरसन** यांनी प्रसिद्ध केलेले साहित्य हे अस्सल आहे का? याबद्दल इंग्लंडमध्ये शंका व्यक्त करण्यात आली. विषेशत: **डॉ. जॉनसन** यांनी पुढाकार घेऊन, ते काव्य 'अस्सल' नाही हे सिद्ध केले होते. यावर **मॅकफरसन** यांनी डॉ. जॉनसन यांना द्वंद्वयुद्धाचे आव्हानही दिले. (**डॉ. जानसन** यांनी त्या युद्धासाठी एक चांगला सोटाही खरेदी केला होता) **मॅकफरसन** अनेक प्रकारची कोणालाही न पटणारी कारणे देऊन, आपण प्रकाशित केलेली **गेलिक** भाषेतील हस्तलिखिते ही अस्सल आहेत असे ठोसपणे सांगितले होते. **मॅकफरसन** यांनी आपल्या अखेरच्या दिवसापर्यंत ती हस्तलिखिते अस्सल नाहीत हे कबूल केले नाही. **'ओस्सीयन** हस्तलिखितातील' बहुतेक कविता या **मॅकफरसन** यांच्याच होत्या हे इ. स. १८०० च्या सुमारास निर्विवादपणे प्रस्थापित झाले. तथापि मॅकफरसन यांनी जुन्या **सेल्ट्रिक** दंतकथा, लोककथा यांच्यातील काही तुकड्यांचा जरूर उपयोग केला होता हेही दिसून आले होते.

परंतु या ठिकाणी देखिल पुन्हा तोच प्रश्न उपस्थित होतो. फिनगाल यांचे चिरंजीव **ओस्सीयन** यांनी ते काव्य रचलेले नाही, ते **मॅकफरसन** यांनीच रचलेले आहे या कारणास्तव, त्या काव्यातील काव्यगुणात फरक पडतो का? ओस्सीयन हस्तलिखितांचे अनेक भाषात भाषांतर झालेले आहे. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीला, युरोपमधील वाङ्मय व कला या क्षेत्रातील वातावरणावर **'ओस्सीयन हस्तलिखितांचा'** जबरदस्त प्रभाव होता. एनसायक्लोपिडीया ब्रिटानिआ या ज्ञानकोशाने **मॅकफरसन** यांचे मूल्यमापन करून समारोप करताना म्हटले आहे.

*"**मॅकफरसन** यांच्या काव्यरचनेचा उगम नाना प्रकारच्या स्त्रोतात आहे.... अस्सल सेल्ट्रिक कविताची संहिता या स्वरूपात त्याना काहीही स्थान नाही. परंतु असे असले तरी त्यांनी अशी एक साहित्यकृती निर्माण केली की ..... युरोपमधील रोमँटिक चळवळ प्रत्यक्ष सिद्ध होण्यात या काव्याने जितके काम केले, तितके ते कोठच्याही ग्रंथाने केलेले नाही.... विशेष करून जर्मन साहित्याचा यात समावेश आहे...... हर्डर आणि गटे..... यांचा त्या काव्याच्या साक्षेपी चहात्यात समावेश आहे. या दोघांनाही **मॅकफरसन** यांच्या काव्याचे जबरदस्त कौतुक होते."*

ही अशा प्रकारच्या उदाहरणांची मालिका न संपणारी असल्याकारणाने ही मालिका आणखी लांबविता येईल. उदा. पुराणकालीन फर्निचर, रोमन काळातील पुतळे व पुस्तके, ग्रीक कालीन (TANGARA) बाहुल्या आणि इटालीतील मॅडोनाज या सर्वांच्या प्रतिकृती तयार झाल्या आहेत. नकला करण्यात आल्या आहेत. ही अशी फसवेगिरी सदा सर्व काळ चालूच असते. या अशा नकली वस्तूंची किंमत त्यांचे सौंदर्य लक्षात घेऊन किंवा आपल्या डोळ्यांना त्या किती सुखदायक अनुभव देतात यावरून ठरत नाही. त्या क्षेत्रातील तज्ज्ञांचे तसेच वारंवार घेतल्या गेलेल्या अनिश्चित स्वरूपाचे व दैवावर हवाला ठेवणाऱ्याला निर्णयानुसार ती किंमत ठरते. एखाद्या नामवंत व महान चित्रकाराच्या अस्सल पण त्या मानाने दुय्यम दर्जाच्या चित्राला, त्याच्या अप्रसिद्ध शिष्याच्या त्या महान चित्रकारातल्या कला ढंगातील कला गुणांच्या दृष्टीने कितीतरी वरच्या श्रेणीत असलेल्या चित्रापेक्षा मानाचे स्थान दिले जाते. चित्रकला-दुकानदार महान चित्रकारांच्या अस्सल चित्राकडे एक चांगली आर्थिक गुंतवणूक या स्वरूपात पहातात असे नाही, आपण सारेच तसे करतो. - **यात खुद्द माझाही अंतर्भाव आहे.** मग याचा अर्थ असा आहे की आपण सर्वजण या 'अहंविषेशगिरी' या रोगाचे बळी आहोत. विचाराधीन असलेल्या वस्तूच्या अंगभूत सौंदर्यापेक्षा, एखादी स्वाक्षरी, तज्ज्ञाने दिलेले शिफारस पत्र, टपाल खात्याचा एखाद्या विशिष्ट काळातील छाप, आपणा सर्वांना अधिक महत्त्वाचा वाटतो असेच ते आहे का? **शेक्सपिअर** आणि **जोहनान सबास्टियन बारव** यांच्या काही कलाकृती अस्सल आहेत की नाही? याबद्दल अजूनही वाद चालूच आहे. त्यांचे काय? या क्षेत्रातील तज्ज्ञ व विद्वान या दोघांच्यात त्या दिग्गजांच्या निर्मितीतील तांत्रिकबाबीसंबंधी न संपणारे वादविवाद अजूनही होत असतात. परंतु **शेक्सपिअर व बारव** यांच्या साहित्य व संगीत या क्षेत्रातील कलाकृतीतील नाट्य, काव्य व संगीत हे गुण या वाद-विवादावर अवलंबून आहेत का?

**४**

येथवर मी 'सैतानाचा वकील' म्हणून काम केले. मी यानंतर त्याच्या प्रतिवादींचे जे म्हणणे असेल ते सादर करण्याचे ठरविले आहे. त्यांच्या प्रतिपादनाचे सार पुढील

विधानाकरवी सांगता येईल. कला आणि वाङ्मय या क्षेत्रातील कोणत्याही कलाकृतीची समीक्षा व आस्वाद ही एकसंघ व एकाचवेळी घडणारी प्रक्रिया नसते. या दोन एकमेकांपासून स्वतंत्र पण एकाच वेळी होणाऱ्या प्रक्रिया त्यात अंतर्भूत असतात. शिवाय या दोन्ही प्रक्रिया परस्परात विकृती (DISTORTION) निर्माण करण्याची प्रवृत्ती प्रकट करतात. या सर्व मानसिक कृतीच्या परिणामातून वाङ्मय व कला या क्षेत्रातील कलाकृतीबद्दलचा निर्णय आकार घेतो.

समजा, आपण एक पुराणकालीन इजिप्शियन FRESCO फ्रेस्को पहात आहोत. (भिंतीवरचे प्लास्टर थोडेसे ओले असताना भिंतीवर पाणरंगात काढलेल्या चित्रास फ्रेस्को हे नाव आहे) त्या चित्राकडे नुसते पाहून त्या कृतीतून आनंदाची प्राप्ती होत नाही. पण तो फ्रेस्को ज्या काळात रंगविला गेला होता, त्या काळातील कलाक्षेत्रातील मूल्यांची ज्यावेळी आपण अजाणतेपणे त्या काळातील सामाजिक मूल्यांशी पुन्हा एकदा जोडा-जोड करतो तेव्हाच त्या चित्रातील सौंदर्याचा साक्षात्कार आपणास होतो व तेच चित्र आपणास आनंददायी वाटू लागते. उदा. आपणास हे ज्ञात आहे की इजिप्शियन कलावंतांना त्रिमिती-चित्रीकरण करण्याची कला अवगत नव्हती. आपणास हेही ठाऊक असते की काही विशिष्ट इजिप्शियन भित्तीचित्रात ज्या व्यक्ति रेखाटल्या गेल्या आहेत, त्यांचा आकार व उंची, ही त्या व्यक्तीच्या सामाजिक स्थानानुसार ठरत असते. आपण इतर इजिप्शियन चित्राशिवाय चित्रांकडे पाहतो तेव्हा असेच काहीसे घडते. आपण प्रत्येक चित्राकडे अशा दुहेरी चौकटीतून पाहतो. त्यापैकी एक चौकट चांगली भक्कम असते. ती त्या चित्राला आपल्या अवती-भोवतीच्या परिसरापासून अलग करते. जो एकंदर पैस असतो, त्यात एक भोक तयार झाल्यासारखे होते. आपल्या मनात अजाणतेपणे जी एक संदर्भ चौकट निर्माण झालेली असते, ती देखिल 'काल' प्रवाहात एक भोक निर्माण करते; ही चौकट ते चित्र 'काला'च्या व संस्कृतीच्या पर्यावरणात बसवून टाकते. आपल्या ज्ञानेंद्रियाकडून दिल्या जाणाऱ्या शुद्ध संवेदनांच्या आधाराने आपण सौंदर्यशास्त्रीय निर्णय घेतो असे ज्या ज्या वेळी आपणास वाटते, तेव्हा प्रत्यक्षात वेगळेच घडत असते. वस्तुस्थिती अशी आहे की, आपण या दुसऱ्या संदर्भ चौकटीच्या अनुषंगाने वा त्या चौकटीचा संदर्भ लक्षात घेऊन अगर त्या चौकटीने निर्माण केलेल्या 'मानसिक कक्षा'चा (MENTAL FIELD) चा प्रभाव लक्षात घेऊन आपण वस्तुत: निर्णय घेत असतो.

चित्रकला, अगर वाङ्मय अगर संगीत अशा भिन्न भिन्न कलाक्षेत्रातील कोणतीही कलाकृती असो तिचा आस्वाद (व तिच्यावरचा आक्षेप) त्या कलाकृतीचा कालखंड लक्षात घेऊनच घेतला जातो. पण हे सारे करताना आपण ते अगदी अजाणतेपणे करतो. आपण कलाकृतीचे मूल्यमापन करताना शास्त्रपूत ठरलेले मापदंड (Absolute Criteria) वापरीत आहोत अशी आपली भोळसट श्रद्धा असते. परंतु वस्तुस्थिती अशी असते की सापेक्ष असे

मापदंड व कलामूल्ये यांचा वापर ते मूल्यमापन करताना केलेला असतो. समजा आपण **फेरमिअर** या थोर चित्रकाराच्या चित्राची 'नक्कल' प्रथमच पाहात आहोत. ते 'अस्सल' आहे यावर आपला विश्वास असतो. आपण त्या चित्रासंबंधी विचार करू लागतो आणि आपण त्याचे मूल्यमापन करतो. कालांतराने आपणास हे ज्ञात होते की ते चित्र 'अस्सल' नसून ती 'नक्कल' आहे. असे झाले की त्या चित्राबाबतच्या आपल्या सौंदर्य-अनुभवात वस्तुतः आमूलाग्र बदल होतो. गंमत अशी आहे की, 'एकाच' चित्राकडे पहात असताना, असे पराकोटीचे वेगवेगळे असे सौंदर्य-अनुभव आपणास येतात. याचे कारण असे असते की दुसऱ्यावेळी आपण ते चित्र जेव्हा पाहातो तेव्हाची आपली संदर्भ चौकट, आपण ते चित्र जेव्हा प्रथम पाहिलेले असते त्यापेक्षा वेगळी असते. अशाच प्रकारचे मापदंड आपण त्या अस्सल चित्राची नक्कल करणाऱ्या चित्राकाराकडे पाहताना वापरतो. उदा. ही 'नक्कल' करणारा चित्रकार सतराव्या शतकातील 'डच' चित्रकलाढंगाचे जे तंत्र आहे त्याची अगदी सर्वोत्कृष्ट नक्कल करीत. परंतु ही 'नक्कल' सिद्ध करणाऱ्या चित्रकाराच्या अवती-भोवतीच्या वास्तवतेचे आलोकन वेगळे असते. त्याचे दृक् संघटनही वेगळे असते. हे असे असल्याकारणाने, त्याला उत्फूर्तपणे **फेरमिअर** या महान चित्रकाराप्रमाणे चित्रे काढण्यास सुरवात करता येणार नाही. याशिवाय आणखीही एक कारण आहे. 'नक्कल' करणारा चित्रकार हा चित्रकारापेक्षा एका वेगळ्याच कालखंडात काम करीत असतो. **फेरमिअरने** मूळ चित्र रंगविल्यानंतरच्या काळात अनेक घडामोडी घडलेल्या असतात. या सर्वच घडामोडींचा साठलेला एकत्र अनुभव, 'नक्कल' करणाराच्या मनात काहीना काही प्रमाणात नोंदविला गेलेला असतो. हा सारा अनुभव त्याला आपल्या मनातून पुसून पाटी स्वच्छ करता येत नाही. तसे करायचे झाले तर त्याला खास व कृत्रिम वाटतील असे प्रत्यनच करावयास हवेत. आपण असे समजू या की यदाकदाचित् दैवी-शक्तीच्या आधारे. या नक्कलकाराने आपल्या दृष्टिकोनाला सतराव्या शतकातील त्या महान चित्रकाराच्या दृष्टिकोनाचे स्वरूप प्राप्त करून दिले. तर मग त्याला आपल्या चहात्यांच्या दृष्टिकोनातही तसाच बदल घडवून आणण्यासाठी जनता-संमोहनचा (MASS - HYPNOSIS) वापर करावा लागेल.

आपणाला आपल्या अनुभवात व ज्ञानात भर टाकता येते. पण आपणास त्यातून काहीच वजा करता येत नाही. पिकॉसोसारखा चित्रकार 'पर्स्पेक्टिव्ह'च्या नियमाकडे दुर्लक्ष करून आगेकूच करावयाचे ठरवितो. तेव्हा त्याचा अर्थ असा असतो की तो एक विशिष्ट अवस्था पार करून गेला आहे. आणि एका विशिष्ट तंत्राच्या पलिकडे जात आहे. इजिप्शियन चित्रकाराच्या बाबतीत हा प्रश्न उपस्थितच झाला नसता. याचे कारण त्याने तो कलाढंग कधीही आत्मसात केलेला नसतो. उत्क्रांती ही 'न-परतणारी' प्रक्रिया आहे. एखाद्या कालखंडाची काही विशिष्ट संस्कृती असते. ही संस्कृती त्या कालखंडाच्या अगोदरच्या कालखंडातील संस्कृतीच्या दिशेने जात आहे. असे भासेलही. चक्रव्यूहामध्ये (SPIRAL)



अनुक्रमणिका

अनेक वर्तुळे असतात. त्यातल्या बाहेरच्या वर्तुळावरील एखादा बिंदू आतल्या एखाद्या वर्तुळातील बिंदूप्रमाणे जाताना दिसतो तसेच ते आहे. उदा. आधुनिक काळातील मागस व्यक्ती, ही अष्मयुगातील मागस व्यक्तीपेक्षा खासच वेगळी असणार. विद्यमान काळातील अभिजात कलाकृतीत, व वाङ्मयीन साहित्यकृती ही अभिजात (CLASSICAL) काळातील अभिजात कलाकृतीपेक्षा वेगळी असणारच. अर्थात ज्या कोणाचे मानसिक संतुलन बिघडलेले आहे, त्यानांच आपला भूतकाळ शस्त्रक्रिया केल्यासारख्या कापून काढता येतो, इतर कोणालाही ते शक्य नसते.

तथापि आपण गतकालातील कलाकृतीसंबधी जेव्हा विचार करतो, तेव्हा आपणासही अशा प्रकारची मानसिक वजाबाकी करण्याची प्रक्रिया करणे भाग असते. यासाठी त्या कलाकृतीच्या विशिष्ट कालखंडातील वातावरण व अनुभव या दोघांशी आपली मने जुळवून घ्यावी लागतात. म्हणजेच आपला आधुनिक अनुभव विसरून, त्या विशिष्ट काळातील सांस्कृतिक चैतन्यात (SPIRIT) शिरकाव करावा लागतो. आपली मने रितीकरून गतकाळात उतरावे लागेल. आपण ही कृती करीत असतो तेव्हा साहाजिकच आपण कोणी श्रेष्ठ आहोत असे स्वत:स अजाणतेपणे मानतो. गतकालातील त्या कलाकृतीत असलेला ओबडधोबड तंत्र, आलोकनातला भोळसटपणा, त्याकाळी प्रचलित असलेल्या भ्रमक समजुती, ज्ञानाच्या मर्यादा वस्तुस्थितीबाबतच्या चुका या साऱ्याकडे आपण डोळेझाक करून आपण त्या कलाकृतींकडे क्षमा:शील दृष्टीने पहातो. म्हणजेच आपण अनेक बाबतीत सूट देतो. थोडक्यात आपण थोड्याशा प्रामाणिकपणे अंतर्मुख होऊन विचार केला, तर नेहमीच असे दृष्टोत्पत्तीस येईल की, गतकालातील अभिजात कलाकृतीबद्दल आपल्याला वाटणाऱ्या कौतुकात, आपण कोणी श्रेष्ठ आहोत या भावनेच्या काही छटा जरूर आहेत. गतकाळातील हे आवाज ऐकताना आपण रमून जातो. पण त्यातील निदान काही भाग आपण काहीशा अजाणतेपणी घेतलेली आश्रयदात्याची (त्याकाळात हे त्या कलावंताना माहीत होते. किती चतुर व हुषार होते ते !) जी भूमिका असते, त्यातून निर्माण झालेला असतो. थोडक्यात आपण ज्या वर्तुळाच्या कक्षेवर उभे असतो, त्याच्याही एका आतल्या वर्तुळात कक्षेवर येऊन आपण उतरतो. डान्टे या इटालियन महाकवीने, आपल्या काव्यात वर्णन केलेल्या भयावह स्वर्गाकडे आपण अचंब्याने पाहतो. आणि त्यांचे आश्चर्यही वाटते. परंतु हे करीत असताना, आपण एक मृदु, मऊ व पुराणकालीन पोक्ततेने वाकल्यासारखे आहोत असे दिसते.

हा एक प्रकारचा दुपेडी सौंदर्य विचार आहे. त्यात वावगे काहीही नाही. तसा तो वैधच आहे. परंतु काही वेळेला असे होते की, कलाकृतीपेक्षा ती संदर्भ चौकट आपणास अधिक महत्त्वाची वाटू लागते. गतकालाकडे प्रेमाने व आत्मीयतेने पहाण्यातून ज्या रोमांचकारी अनुभवाचा प्रत्यय येतो तो सौंदर्य अनुभवावर प्रभुत्व मिळवितो. असे जेव्हा होते त्या क्षणी त्या दुपेडी सौंदर्य विचाराची अवनती अहंविषेश:गिरीत होते. याचा परिणाम, समीक्षात्मक

स्वरूपाचे जे मूल्यमापन असते, त्यात सर्वत्र गोंघळ पसरण्यात होतो. गोंधळ याचा अर्थ जे मृत आहेत, त्यांची लायकी नसते, त्यापेक्षाही ते वरच्या श्रेणीतले आहेत असे मानले जाते, आणि जे विद्यमान व लायक आहेत त्यांच्याकडे तुच्छतेने पाहिले जाते. जे जे काही 'अभिजात' 'जुनेपुराणे' 'आदिम' अगर नुसतेच जुने आहे, त्याबद्दल कोणताही मापदंड न वापरता, त्या सर्व गोष्टींबद्दल आदरभाव दाखविण्यात येतो. या प्रवृत्तीचे आत्यंतिक टोक, एका विशिष्ट प्रकारच्या वागणुकीतून आविष्कृत होते. सघन लोक आपल्या दिवाण-खान्यातल्या भिंतीवर चित्रे टांगतात अथवा आधार देण्याच्या टेक्यावर ती असतात. हे लोक या चित्रांचे टेके, आणि त्यांच्या चौकटी चांगल्याच मलिन दिसाव्यात यासाठी प्रयत्नशील असतात. ही चित्रे कालौघात मलिन झाल्याकारणाने, त्यांच्यावर पुटे चढली आहेत असे ती पहाणारास वाटावे हा हेतू ते करण्यामागे असतो. म्हणून आपण या प्रवृत्तीस 'पुटे-अहंविषेश:गिरी' (PATINA SNOBBERY) हे नाव देऊया.

या पूर्वीच ज्या प्रक्रियेचा उल्लेख येऊन गेला आहे तिच्यात एखाद्या कलाकृतीच्या मूल्यमापनाबाबत ही जी विकृती घुसते त्याकडे ही प्रक्रिया घेऊन जाते. वस्तुत: प्रत्यक्ष अनुभव एका विशिष्ट क्षेत्रात असला तरी त्याच्या मूल्यमापनासाठी एक मापदंड असतो. या क्षेत्राशी मानसिक दृष्ट्या संबधित असे पण सर्वस्वी वेगळे असे दुसरे क्षेत्र असते. या दुसऱ्या क्षेत्रातील अनुभवाचे मूल्यमापन करण्यासाठी खरे म्हणजे वेगळा मापदंड वापरावयास हवा. तसे न होता पहिल्या क्षेत्रातील मापदंड वापरण्यात येतो. पहिल्या ठिकाणी प्रस्तुत असलेली मूल्ये या दुसऱ्या क्षेत्रात प्रक्षेपित केली जातात. एवंच चुकीचे अप्रस्तुत असे मापदंड वापरून, मूल्यमापन करणे हे अहंविषेश:गिरीचे सारतत्त्व आहे. अहंविषेश: व्यक्ती सौंदर्य मापण्याकरता तापमापकाचा (THERMOMETER) उपयोग करील. अगर वजन किती आहे हे पहाण्यासाठी घड्याळाचा वापर करील !

५

माझ्या एका मित्राच्या तेरा वर्षाच्या मुलीला **ग्रीनवीच** वस्तुसंग्रहालयास भेट देण्यासाठी नेण्यात आले होते. तिने त्या वस्तुसंग्रहालयात पाहिलेली सर्वात सुंदर वस्तु कोणती हा प्रश्न तिला विचारण्यात आला. कसलेही आढेवेढे न घेता तिने उत्तर दिले 'नेल्सनचा सदरा' तिला जेव्हा असे विचारण्यात आले की त्याच्यात सुंदर असे काय आहे? याचे तिने स्पष्टीकरण दिले 'तो रक्ताने माखलेला सदरा छानच होता. कल्पना करा खऱ्या सदऱ्यावर खरे रक्त' तेही एका खऱ्या इतिहास प्रसिद्ध व्यक्तीचे'

एखाद्या संताने वापरलेल्या वस्तूंची वार्षिक मिरवणूक, प्रसिद्ध खुनीला फाशी देण्यासाठी वापरण्यात आलेल्या दोराचा तुकडा, अथवा टॉलस्टॉय कुटुंबाचे लाँड्रीचे बिल इत्यादी गोष्टीतून जशी 'जादू' भावते तशाच 'जादू'चा अनुभव घेतल्यागत त्या मुलीचे वागणे होते.

त्या मुलीला आपण काहीतरी रोमांचकारी असा जगावेगळा अनुभव घेत आहोत असे वाटत होते. त्याचा उगमही त्या 'जादू'तच होता. आदीम समाजाची मानसिकता पुढील प्रकारची असते. आदीम व्यक्तीला वाटते, एखाद्या व्यक्तीच्या सान्निध्यात असलेली वस्तू ही केवळ त्या व्यक्तीची आठवण नसते. त्या व्यक्तीच्या शरीराचा काही अंश त्या वस्तूत आहे आणि म्हणून ती 'भारलेली' आहे. त्या अंशातून काहीतरी 'जादू' बाहेर येईल अशी तिची ठाम समजूत असते.

एका वृत्तपत्रीय स्तंभ लेखकाने अलिकडेच पुढील विधान केले होते ''राजघराण्याशी नाते संबध असलेल्या एका सरदाराच्या बागेत निर्माण झालेल्या पिच या फळात दात रोवताना आपल्यापैकी बहुतेकांना खास आनंद व सुख प्राप्त होते याबद्दल माझी खात्री आहे.''

आदीम समाजात ज्या प्रकारची 'जादू' निष्ठा विद्यमान होती, ती अजूनही तगून आहे. लॉकेटमध्ये ठेवण्यात येणारा केसाचा पुंजका, आयुष्यातील पहिल्या नृत्यसमारंभात वापरलेला पंखा, आपल्या फलटणीचे चिन्ह असलेले बिल्ले, आजीने स्वत:च्या लग्नात घातलेला पोषाख इत्यादी गोष्टी 'भारलेल्या' आहेत असे अजूनही कुठेतरी अजाणता वाटत असते. एखादे मूळ हस्तलिखित, स्वाक्षरी असलेले फर्निचर, **डिकन्स** वापरत असलेली लेखणी आणि **गॅलिलिओची** दुर्बिण, या देखिल त्याच प्रकारच्या प्रवृत्तीची प्रतिके आहेत. फक्त त्याना जरा वरच्या थरावरची प्रतिष्ठा असते एवढेच. 'गुरू'ने वापरलेल्या वस्तूत काहीतरी 'जादू' होती व त्या वस्तूचा तो गुण अजूनही कायम आहे आणि तो आपणाकडे प्रेरित होईल अशी श्रद्धा असते. नेल्सनच्या सदऱ्यावरचे नेल्सनेचे रक्त पाहून त्या मुलीला जो रोमांचकारी आनंद झाला तीच भावना अशा प्रकारच्या त्या वस्तूमुळे आपणाकडे येऊन पोचते. एखाद्या महान कलावंताच्या काळ्या होत चाललेल्या चरे पडलेल्या कॅनव्हासकडे पहाताना आपल्या दृष्टिकोनात जो फरक पडतो त्याचा सौंदर्याशी, सौंदर्यशास्त्रीय विचारांशी, वा आणखीन जे काही मनात येईल त्याच्याशी संबध नसतो. आपल्या अबोध मनात, त्या वस्तूबद्दल सहानभूतिपूर्ण जादूची जी किमया आहे, तिची ती कृती आहे. एखादी वस्तू ही मुळातील अस्सल आहे की नाही हे काही बाबतीत निदान सामान्य माणसांना क्वचितच ठरविता येते. त्या विषयातील तज्ज्ञानाच तो निर्णय घेता येतो. असे असूनही आपण त्या गोष्टीच्या अस्सलपणाला फार महत्त्व देतो. आदीम समाजात एखादी वस्तू 'भारलेली असणे' तिच्यात जादू आहे असे वाटणे प्रचलित असते. या सारख्या भावनांतूनच गोष्टींच्या 'अस्सलपणाला' नको इतके महत्त्व देण्याचा विचार निर्माण होतो. प्रत्येक प्रामाणिक दुकानदार असे कबूल करील की 'अस्सल' आणि 'नक्कल' सीमारेषावर घुटमळणाऱ्या अनेक कलावस्तू इतक्या वारंवार आढळून येतात की तो नियमच आहे असे मानावयास



अनुक्रमणिका

हरकत नाही. याशिवाय गतकाळात एक सर्व-साधारण असा नियम होता की 'गुरू' आपल्या हाती असलेल्या कलाकृतीवर आपल्या चेल्याना हात चालवायला देत असे. विषेशतः फारच मोठ्या कलाकृतीवर 'गुरू' काम करीत असले; तर मग हे हटकून घडत असे. आम्हा मर्त्यमानवापैकी बहुतेक सगळ्यांना यात उच्च प्रकारची अभिरुची व जाण असलेल्यांचाही समावेश आहे. 'अस्सल' कलाकृती व अस्सल समजली जाणारी कलाकृती आणि एखाद्या विशिष्ट कलाढंगातील कलाकृती या तिन्हीत फरक दाखविता येणार नाही. अनेक कालखंड असे असतात की त्या विशिष्ट प्रकारचे कलाढंग. चांगलेच प्रस्थापित झालेले असतात. त्या कलाढंगाची शैली व तिचे अनुयायी हेही चांगलेच प्रस्थापित झालेले असल्याकारणाने त्या कलाढंगाची शैली ही त्या काळात चांगलीच रिघलेली असते. म्हणूनच या शैलीचे जे कोणी समर्थ अनुयायी असतात त्यांच्या कलाकृतीतील कलागुणांची प्रतवारी लावणे हे काम कितीतरीच कठीण आहे. तो कलाढंग आणि त्याची शैली, यांत जे कोणी तज्ज्ञ असतील, त्यांनाच ते काम करता येण्यासारखे आहे. हे आपल्या पचनी न-पडणारे कटु सत्य आहे. कला-वस्तु-संग्रहालयाला भेट देणारे जे सर्व सामान्य रसिक आहेत त्यांना मार्गदर्शन त्यांचे डोळे करीत नाहीत. त्यांना मार्गदर्शन होते, ते एखाद्या महान कलावंताच्या नावाच्या जादूचे अगर एखाद्या कालखंडाच्या नावात असलेल्या जादूचे. त्याचबरोबर जादूने भारलेल्या वस्तूंची (FETISH) आपण अबोधपणे पूजा बांधतो. या दोन्ही कारणांनी सौंदर्यवाचक अनुभवात इतका गोंधळ उत्पन्न होतो. हा आता सर्वसामान्य नियमच झाला आहे, असे म्हणावयास हरकत नाही. गतकाळातील कलेकडे पहाण्याच्या आपल्या दृष्टिकोनात हा गोंधळ एक प्रमुख घटक बनला आहे.

६

"प्रिन्स चार्लस् यांचे सर्व दात शाबूत आहेत. त्यांचा एक दात पडला अशी अफवा होती. या अफवेमुळे गेल्या रात्री झुंबड उडाली."

– वृत्तपत्रातील एक बातमी

"शूर क्रिलाँ तूं जीव दे. आम्ही अरक्यू येथे लढलो आणि तू तेथे नव्हतास." चौथ्या हेन्रीला क्रिल्लांने काय उत्तर दिले हे मी विसरलो आहे. पण माझी अशी खात्री आहे की तो आपल्या राहिलेल्या आयुष्यभर आपण ही एक मोठा ऐतिहासिक संधी गमावली म्हणून तो स्वतःला शिव्या-शाप देत असेल. मी या प्रवृत्तीला 'क्रिलाँ'गंड असे नाव देतो. त्याची सैल अशी व्याख्या पुढीलप्रमाणे करता येईल. इतिहास घडत असताना त्यात सहभागी होण्याची किमानपक्षी त्या ठिकाणी हजर असण्याची ऊर्मी- म्हणजे **क्रिल्लाँ** गंड. काही थोडे महत्त्वाकांक्षी आणि मत्सरी लोकच या गंडाला बळी पडतात असे प्रथमदर्शनी वाटेल परंतु ही ऊर्मी वाटते तितकी वरवरची नाही. ती चांगलीच सखोल गेलेली आहे अशी माझी श्रद्धा आहे. कमी-अधिक प्रमाणात अनेक लोकांना या ऊर्मीने झपाटलेले असते.



अनुक्रमणिका

या पूर्वी उल्लेख येऊन गेलेली **मेरी बी.** हे एक अगदी पराकोटीचे उदाहरण **'क्रिल्लॉ'** गंडाने 'इतिहासाबरोबर शय्या सोबत' असे स्वरूप त्या ठिकाणी धारण केले होते. या क्रिलॉं गंडाचा आणखी एक प्रकार आहे. तो पराकोटीला पोचलेला नसला, तरी तो प्रकार सर्वत्र आढळतो. प्रसिद्ध आणि ऐतिहासिक व्यक्तीना भेटणे, असे स्वरूप क्रिल्लॉं गंड या प्रकारात धारण करतो. बोजड अशी सामाजिक दाखवेगिरी व दंभ, यांच्याकडून या गंडाला चालना मिळालेली आहे असे वरवर पहाता दिसते. 'मी त्या प्रसिद्ध 'क्ष' ला भेटलो आहे' अशा बढती मारण्याची प्रेरणा या गंडाने पछाडलेल्यांना मिळालेली असते. अर्थात हे नाकारता कामा नये, खऱ्याखुऱ्या वास्तव जीवनात, तो 'क्ष' कसा दिसतो हे जाणून घेण्याची खरी जिज्ञासा त्या व्यक्तीच्या मनात असलेही. पूर्वी अमेरिकन अध्यक्ष लोकांना दर्शन देऊन, त्याच्याबरोबर हस्तांदोलन करीत असत. लक्षावधी लोक 'व्हाईट हाऊस' या अमेरिकन अध्यक्षांच्या घरी या संधीचा लाभ घेण्यासाठी एकच गर्दी करीत. आता ही प्रथा थांबविण्यात आली आहे. हे सारे लोक दंभ व जिज्ञास यांनी प्रेरित होऊन जितके जात असत, त्यापेक्षा अधिक करून, इतिहासाबरोबर हस्तांदोलन करण्याच्या हेतूने ते जात होते. राज्यारोहणाचा प्रसंग, देशाला भेट देणारा परदेशी मुत्सद्दी वा पाहुणा, अगर ज्वालामुखीचा स्फोट यांचे निसटते तरी दर्शन व्हावे यासाठी पडतील ते कष्ट व त्रास सोसून असंख्य माणसे जातात. इतिहास घडत असताना आपण त्याचे साक्षीदार आहोत, अगर आपण त्या ठिकाणी हजर होतो, या हेतूने किमानपक्षी ते लोक कांहीसे प्रेरित झालेले असतात. आपल्या काळातील जगाला वळण लावणाऱ्या घटनात दूरान्वयाने अथवा निष्क्रियपणे देखील त्या घटनात आपण सहभागी असावे, ही इच्छा त्या प्रेरणेमागे असते. आपण त्या ठिकाणी गेलो नाही, तर 'आपण कशाला तरी मुकणार आहोत' आपण समकालीन असूनही त्या संधीचा पुरेपूर फायदा उठविण्यात अपयशी झालो, आपल्या काळातील घटनांचे साक्षीदार होणे, आपणास जमले नाही ही भीतीदेखील त्या प्रेरणेमागे दडलेली असते.

क्रिलॉं गंडाने पछाडलेले अनेक प्रकारचे दिलचस्प असे सामाजिक अहंविषेश: निर्माण होतात. इतिहासात महशूर असलेल्यांना दाराच्या फटीतून पहाणारे (PEEPING TONS), 'आपण हजर असलेच पाहिजे' आणि आपल्या काळातील या ना त्या क्षेत्रात प्रभाव व छाप असणाऱ्या महत्त्वाच्या व्यक्तीना भेटलेच पाहिजे या इच्छेने पछाडलेले, इत्यादी प्रकारच्या व्यक्तींचा या सामाजिक अहंविषेश: मध्ये समावेश होतो. **डॉ. जॉनसन** यांचे चरित्रकार हे कदाचित इतिहास प्रसिद्ध असे अत्यंत महशूर व याबाबतीत सगळ्यांना मागे टाकणार अहंविषेश: असावेत. समाजातील प्रसिद्ध व्यक्तींचा पाठलाग करणारे, प्रयत्नपूर्वक स्वाक्षऱ्या जमविणारे, एखाद्या प्रसिद्ध व्यक्तीचे निसटते दर्शन व्हावे किंवा एखाद्या घटनेचे आपण साक्षीदार असावे, यासाठी रस्त्यावर रात्रभर तळ ठोकून बसणारे, इत्यादी प्रकारच्या लोकांचा

**बॉसवेल** हा आदर्श होता. क्रिल्लाँ गंड सामाजिक जीवनात सर्वत्रच पसरलेला असतो. आपण आपले मित्र, सहकारी व अवती भोवती असणाऱ्या व्यक्तींची जी निवड करतो त्यावरती त्या गंडाचा फार सखोल परिणाम असतो. कोणत्या ना कोणत्या प्रकारची कर्तबगारी ज्या व्यक्तींच्या खात्यावर जमा आहे अशाच व्यक्ती आपण पसंत करतो. मग आपणास ज्या गोष्टीत दिलचस्पी असते त्यापेक्षा ही कर्तबगारी कितीही वेगळ्या क्षेत्रातील असली, तरी तो विचार आपणास त्रासदायक वाटत नाही. या व्यक्ती आपआपल्या क्षेत्रात 'महत्त्वाच्या असावयास हव्यात. अथवा काळावर आपला ठसा उमटविणाऱ्या त्या असावयास हव्यात. असे असेल म्हणजे मग आपण त्यांना पसंत करतो. या अशा व्यक्ती राजकारणी म्हणून आपला ठसा मागे ठेवून जाणाऱ्या आहेत, चिनी भाषा व संस्कृती या क्षेत्रातील विद्वान आहेत अगर तपकिरीच्या डब्यांचा संग्रह करणाऱ्या आहेत या संबधीचा विचार त्यांच्यावर पसंतीचा शिक्का उठविताना येत नाही. इतकेच नव्हे तर या व्यक्तीकडे मानवी असे गुण असले तरी त्यांचाही विचार होत नाही. या व्यक्ती काय आहेत यावर या व्यक्तींचे सामाजिक बाजारपेठेतील मूल्य ठरत नाही. ते ठरते त्या कशाच्या प्रतिनिधी आहेत यावरून. एखादी व्यक्ती स्वत:शी प्रामाणिक असून भागत नाही. ती समाजात 'कोणीतरी' असलीच पाहिजे.

क्रिल्लाँ गंडाने पछाडले जाणे हे घटित इतके सर्वसाधारण आहे की अहंविषेष:गिरीची लागण होण्यापासून मुक्त असणारा समाज कल्पनेतही आणणे कठीण आहे. या जंतूची लागण न झालेल्या समाजात व्यक्तीचे मूल्यमापन, तिच्या अंगभूत गुणावरून केले जाईल. व्यक्तीचे समाजातील स्थान, तिच्यापाशी असणारी धनदौलत, अगर तिची व्यावसायिक कर्तबगारी इत्यादी गोष्टी विचारात घेऊन ते मूल्यमापन होणार नाही. परंतु, मग लगेच प्रश्न उपस्थित होतो, 'अंगभूत गुण' या शब्द प्रयोगाद्वारे आपणास नेमके काय सांगायचे आहे. या शब्दाचा नेमका अर्थ काय? शौर्य अगर शालीनता, विनोद अगर संतप्रकृती, अगर आपुलकी दर्शविणारा स्वभाव? यापैकी आपण नेमके काय सांगत आहोत. संदर्भ चौकट असल्याशिवाय आपणास मूल्यमापन करताच येणार नाही. एका विशिष्ट मापदंडाची निवड केल्यानंतरच आपणास कोणत्याही गोष्टीची प्रत ठरविता येते. शिवाय हा निवडलेला 'मापदंड' योग्य आहे की नाही हा प्रश्नही मग आपणास उपस्थित करता येत नाही. एखादा मुष्टियुद्धांचा चहाता, कवी टी. एस. इलिएटपेक्षा विश्वविख्यात मुष्टियोद्धा ही अधिक वरच्या पातळीवरची व्यक्ती आहे असे समजेल. एखादा संगीतप्रेमी, इंदिरा गांधीपेक्षा कुमार गंधर्व ही अधिक महत्त्वाची व्यक्ती आहे असे मानतो. याचा अर्थ असा होत नाही ही निवड करणाऱ्या व्यक्ती अहंविषेश:गिरी प्रकट करीत होत्या. प्रीतिभोजने आयोजित करणाऱ्या एखाद्या श्रीमंत स्त्रीचे उदाहरण घेऊ या. या बाई संगीताबाबत ठार बहिऱ्या आहेत. या बाई कुमार गंधर्वांचे गाणे आपणास किती जिवापलिकडे प्रिय आहे, असे म्हणत त्यांनी आपण आयोजित करीत

असलेल्या प्रीति-भोजनास हजर राहावे अशी मनिषा ती बाळगून असते. ही बाई मात्र अहंविषेश:गिरी प्रकट करणारी आहे. याचे कारण एखादा विशिष्ट गुण घेऊन व्यक्तीचे मूल्यमापन आहे, असा बहाणा ती स्त्री करीत असते. पण, वास्तविकपणे वेगळाच मापदंड वापरून ती त्या व्यक्तीचे मूल्यमापन करते.

सर्व सामान्यपणे अगदी काही आगळ्या वेगळ्या, व न आढळणाऱ्या परिस्थितीत एखादा सामाजिक गट एक अखंड, चिरेबंदी (Monoithic) मूल्यांची उतरंड आपलीशी करीलही. अशा सामाजिक गटांना अहंविषेश:गिरीच्या रोगाची लागण होत नाही. याचे कारण त्यांच्या मूल्यमापनात ढवळाढवळ करण्यासाठी मूल्याबाबतची कोणतीही वेगळी फुटपट्टी उपलब्ध नसते. युद्धभूमीवर पहिल्या रांगेत उभे असलेले सैनिक, अगर एखाद्या धोकादायक कामगिरीवर निघालेले लोक, यांचा विचार करताना, शौर्य, आशावाद, कौशल्य आणि आपल्या सहकाऱ्याबरोबरचे कमालीचे सहकार्य, या सर्व गुणांचा समुच्चय असणारे मूल्य हे सर्वात श्रेष्ठ मूल्य असते. इतर सर्व मूल्ये त्या परिस्थितीत तात्पुरती हद्दपार करण्यात आलेली असतात. असे असल्याकारणाने सर्व सामान्यपरिस्थितीत व्यक्तीचा हुद्दा, तिचे सामाजिक स्थान या संदर्भ असलेल्या मूल्यांपासून त्या व्यक्तींची फारकत केली जाते. तुरुंगात दाखल केलेल्या लोकांच्या छावण्या, हवा पालटाकरिता स्थापन केलेली वसतीगृहे आणि मठ हे तसे बंदिस्त (CLOSED) समाज आहेत. हे असे समाज देखिल अखंड, चिरेबंदी स्वरूपाची मूल्यपद्धती विकसित करतात. अर्थातच या ठिकाणी गुणांचा जो समुच्चय आवश्यक असतो तो या अगोदरच्या उदाहरणादाखल घेतलेल्या समाजांना आवश्यक असलेल्या समुच्चयापेक्षा वेगळा असणारच. या अशा आत्यंतिक दबावाच्या परिस्थितीत बंदिस्त गटातील सभासद गटातील एकमेकांचे मूल्यमापन अगदी विशुद्धपणे, व्यक्तीचे अंग–भूत गुण अगर मानवताप्रेमी गुण यांच्या चौकटीतच केले जाते. सर्वसामान्यपणे जेणे करून मूल्यमापन पूर्वग्रहकालीन ठरेल, अशी सर्व प्रकारच्या कारणे दूर ठेवण्यात आलेली असतात.

सर्व सामान्य परिस्थतीत आणखी वेगळेच काही घडते. मानवी समाज हा परस्परांना वगळू पहाणाऱ्या मूल्यपद्धतीचा एक गोंधळ आहे. या मूल्यपद्धती एकमेकांना छेद देतात. वेळप्रसंगी त्यांच्यात संघर्षही होतात. आणि काही वेळा त्या समांतर (OVERLAP) आहेत असे दिसते. आपली अशी श्रद्धा असते की, आपण कलेचा जो आस्वाद घेतो, तो केवळ सौंदर्यशास्त्रीय मापदंडावर आधारित आहे. पण या लेखात असे दाखवून देण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे की कलेचा आस्वाद घेताना, सौंदर्यशास्त्राशी संबधित नसलेल्या मूल्यपद्धती जरूर हस्तक्षेप करतात. असे झाले म्हणजे सांस्कृतिक अहंविषेश:गिरीची प्रवृत्ती प्रकट करणाऱ्या व्यक्तीत आपले सर्वांचे रूपांतर होते. मानवी गुणांची आपण सामान्यपणे कदर करतो, त्यातही या प्रवृत्ती हस्तक्षेप करतात. असे करून, त्या आपले परिवर्तन अहंविषेश: व्यक्तीत करतात. या प्रवृत्तीची प्रकृती अगदी उघड आहे. तिचे वर्णन पुढील

शब्दात करता येईल. एखाद्या व्यक्तीकडे असलेल्या बहुमानदर्शक पदव्या तिची सत्ता, तिची संपत्ती, या गोष्टी पूजनीय आहेत अशा स्वरूपाचे प्रेम आपणाला त्याविषयी असते. असे कां वाटते याचा जे मानसशास्त्रीय स्रोत आहेत त्याचा मागोवा सहजपणे घेता येतो. या ठिकाणी प्रमुख अडचण आहे ती आपण आपल्या सामाजिक पसंतीला कोठचे मानवी गुण पायाभूत असावेत? या संबधी एकवाक्यता होऊन या प्रश्नाचे स्पष्ट उत्तर देणे शक्य नाही. शिवाय जे उत्तर असेल तेही तात्पुरत्या स्वरूपाचेच असेल. असे असले तरी एक गोष्ट नक्की आहे. आपण 'मित्र' निवडताना सारखेच मापदंड वापरतो, या मापदंडाबद्दल आपण जर प्रांजळ कबुली देणार असलो, तर पुढील गुण असलेल्या व्यक्तींची आपण बहुतांशाने निवड करतो असे सांगू. या व्यक्तीचा सहवास आपणास उल्हसित करतो. प्रोत्साहित करतो, आणि त्या-बरोबर विसावाही देतो. त्यांच्या अभिरुचीत आणि त्यांना ज्या गोष्टीत रस आहे त्यात आपण सहभागी होतो. त्यांची व आपली सामाजिक व सांस्कृतिक पार्श्वभूमी जवळ जवळ मिळती-जुळती असते. ज्या व्यक्ती निष्ठावान आणि समजदार आहेत, त्यांना असलेला मानमरातब, हुद्दा, पदव्या व सामाजिक प्रतिष्ठा हे सारे काढून घेतले असताही ज्या व्यक्ती आकर्षकच राहतात अशाच व्यक्तींची निवड आपण आपले मित्र म्हणून करतो. थोडक्यात या सर्व गोष्टी विचारात घेऊन आपण आपल्या अवतीभोवती असलेल्या व्यक्तींची निवड करतो. आपणास हे सारे कबूल करणे तसे कठीणच आहे. परंतु या साऱ्या वर्णनाची एक मेख आहे. या वर्णनात आपण जी गोष्ट गृहीत धरलेली आहे तो केवळ कल्पनाविलास आहे. कोणत्याही व्यक्तीपासून तिची सामाजिक पार्श्वभूमी व तिची संदर्भ चौकट कधीही हिरावून घेता येत नाही, अथवा त्या गोष्टी वगळून तिच्याकडे पहाता येत नाही. याचा उल्लेख या वर्णनात नाही. मेख आहे ती हीच.

आपणा सर्वांनाच परिचित असलेले उदाहरण घेऊ या. हे उदाहरण उत्साहवर्धक नाही. एका 'ओल्या' वाङ्मयीन पार्टीच्या वेळी माझा एका मंद, मध्यवयीन स्त्रीशी परिचय करून देण्यात आला. तिने मी लिहिलेल्या एका पुस्तकाबद्दल अगदीच अनउत्साही असे कौतुकाचे उद्गार काढले. मला तिचे नाव चांगले ऐकू आलेले नव्हते. मी तिला विचारले आपणही लेखक आहात का? ती म्हणाली, "छे हो, मी तयार कपडे विकणारी दुकानदार आहे." मला संधी मिळताच मी तिच्या जवळून निसटलो. सुटकेचा निश्वास सोडला. दुसऱ्या कोणाबारोबरतरी बोलण्यास सुरवात केली. त्या व्यक्तीने मला विचारले "अमुक अमुक भागांची राजकन्या तुला कशी काय वाटते?" राजकन्येच्या नांवाचा उल्लेख करताना, फ्रान्सच्या इतिहासात प्रसिद्ध असलेल्या एका घराण्याचे नाव घेण्यात आले होते? मी वळलो आणि पुन्हा एकदा त्या मंद बाईकडे नजर टाकली आणि काय चमत्कार ती स्त्री क्षणार्धात विलोभनीय बनली. **पिकॉसो** चित्राची प्रतिकृती हे **पिकॉसोचे** अस्सल चित्र ठरले होते ! त्या

चित्रात जसा काहीही बदल झाला नव्हता तसाच त्या स्त्रीतही बदल झालेला नव्हता. परंतु माझी संदर्भ चौकट बदलली होती. एका वेगळ्याच संदर्भात, एका वेगळ्याच प्रकाशात मला ती आता दिसू लागली होती. उदा. एका महाविख्यात राजघराण्यातील व्यक्ती, तयार कपडे विकण्याचे दुकान चालविते. हीच गोष्ट मोठी उल्लेखनीय होती. तेच तिच्या महाभयानक अशा जुजबी संभाषणाबद्दल म्हणता आले असते. आणखी अधिक चौकशी केल्यानंतर कळले, ती राजकन्या एकेकाळी फॅशनेबल कपडे तयार करणाराकडे एक 'मॉडेल' म्हणून काम करीत असे. काही निमित्त होऊन तिचे त्या राजघराण्यातील पुरुषाशी लग्न झाले होते व तेही फार दिवस टिकले नव्हते. एवंच ती स्त्री पुन्हा संदर्भ चौकटीत जाऊन दाखल झाली होती. चित्र पुन्हा एकदा जिन्या लगतच भिंतीवर गेले होते.

तथापि गंमत अशी आहे की दोनशे वर्षांपूर्वी हे असे दृष्टिकोनात होणारे बदल हे अहंविषेश:गिरीचे द्योतक आहेत असे कोणाला वाटले नसते. समाजात मूल्यांची जी उतरंड स्वीकारण्यात आली होती त्यात हे बदल होणे स्वाभाविक आहे असे मानण्यात आले असते. या उतरंडीनुसार सर्वसामान्य कुळात जन्माला आलेल्या व्यक्तीपेक्षा, राजघराण्यातील व्यक्तीला समाजात वरचे स्थान मिळणे हा तिचा हक्कच होता. प्रिन्स चार्लस्चे दात कसे आहेत याबद्दल भावनात्मक दिलचस्पी असणे हे आपल्या भावी राजाबद्दल असलेल्या स्वाभाविक व हृदय हलविणाऱ्या निष्ठेचे प्रतिक ठरले असते. सरंजामशाहीच्या युगात मूल्यांच्या बाबतीत युरोपमध्ये एकसंघ अशी उतरंड गृहीत धरण्यात येत असे व तसे करणे हे सर्वांनाच मान्य होते. या उतरंडीत थोर कुळात जन्म, समाजातील स्थान व हुद्दा हे सारे ईश्वराच्या कृपेने मिळालेले असल्याकारणाने त्यातून सर्वसामान्यपणे स्वीकृत झालेल्या मापदंडाची निर्मिती होते असे मानण्यात येत असे. परंतु कालांतराने बॅस्टीलचा तुरुंग जमीनदोस्त झाला असे मानण्यात येत असे. परंतु जाहीरनामा प्रसिद्ध झाला. त्यानंतर अर्थातच सैधांतिक पातळीवर तरी त्या मूल्यपद्धतीत बदल झाला होता. परंतु जुन्या मूल्यांच्या आकृतिबंध स्वरूपामुळे, आणि न्यायी दयाळू राजे देखण्या राजकन्या आणि स्त्री दाक्षिण्य दाखविणारे सरदार, आणि गुंड, पाळेगार अधीपती यांची प्रतिके जनमानसात अजूनही भुई धरून आहेत. आपल्या उदारमतवादी आणि लोकशाही दृष्टिकोनात ती सातत्याने हस्तक्षेप करीत असतात. आपल्या समाजाच्या कड्याखाली एक प्रकारचे मानसिक काळाबाजारी चलन, या स्वरूपात दाखवेगिरी, आणि परिस्थिती हुद्दा आणि परिणाम पदवी आणि वंशपरंपरा या गोष्टी अजूनही पूर्वी इतक्याच जिवंत राहिल्या आहेत.

अहंविषेश:गिरी अगणित स्वरूपात व प्रकारात आढळून येते. त्यातील प्रत्येक प्रकाराचा मूळ स्त्रोत एका विशिष्ट प्रकारच्या मूलभूत आकृतिबंधात आहे असे दाखविता येईल. एकमेकांना आच्छादणाऱ्या दोन वेगळ्या मूल्यपद्धती असलेला आकृतिबंध असे त्या मूलभूत आकृतिबंधाचे वर्णन करता येईल. यातील एका मूल्यपद्धतीला $प_१$ या नावाने संबोधू या. या

पद्धतीत आपण अशी बतावणी करतो की आपले मूल्यमापन व निष्कर्ष हे सौंदर्यशास्त्रीय मापदंड वैयक्तिक आकर्षण, अंगभूत असे मानवी गुण इत्यादी गोष्टीवर आधारित असतात. दुसरी पद्धती प२ आहे असे समजा. ही पद्धती प१ मध्ये हस्तक्षेप करते. तसे करून आपल्या प१ च्या मूल्यमापनात बिघाड उत्पन्न करून तिला विकृत स्वरूप प्राप्त करून देते. प२ पद्धतीत प्रतिकांची (FETISH) पूजा, क्रिलाँ गंड पदवी सत्ता इत्यादींचा समावेश आहे. आपल्या अहंविषेश:गिरीच्या व्याख्येत थोडा बदल करून, तिला अधिक आखीव व रेखीव, व अधिक नेमके स्वरूप देता येईल. "दोन वेगवेगळ्या व स्वतंत्र मूल्यपद्धती मानसिक दृष्ट्या एकजीव झाल्या की त्याचा परिणाम अहंविषेश:गिरीत होतो. या दोन्ही-मूल्यपद्धतींचा उगम व त्यांची प्रकृती ही सर्वस्वी वेगवेगळी आहे. त्या एकमेकापासून स्वतंत्र आहेत. परंतु व्यक्तीच्या मनात अगदी अटळपणे त्यांच्यात गुंतागुंत झालेली असते."

याचा अर्थ असा नाही प२ या हस्तक्षेप करणाऱ्या पद्धतीला, तिला स्वत:चे असे काहीही मूल्य नाही. खरे म्हणजे तिची जी भावनिक ताकद आहे तीच प१ ची मूल्ये विकृत बनविते. परंतु सखोल अशा आकृतिबंधात्मक स्त्रोतातून प२ ची निर्मिती वारंवार होते. 'उमराव' या शब्दाचा मुळातील अर्थ असा आहे की परंपरा आणि **खास** संगोपन यांनी आकारलेला अभिजन वर्ग. या अशा प्रकारच्या वातावरणातून निर्माण झालेली अभिरुची, चालचालणूक व वागण्याची रीत याबाबतचे सांस्कृतिक दृष्ट्या उच्च पातळीवर घेऊन जाणारे परिणाम, यांना काहीही किंमत नाही असे एखादी 'डोक्यावर उभे राहून' व्यवहार करणारी अहंविषेश: व्यक्तीच फक्त बतावणी करील. बॉस्टिल तुरुंग जमीनदोस्त होण्यापूर्वी युरोपियन संस्कृती ही बहुतांशाने सरंजामदारी व उमरावी होती. सर्व सामान्य व्यक्ती हा शब्द तसा संदिग्ध आहे. रांगडी चालचलणूक तशीच वागण्याची रीत, आणि सांस्कृतिक दृष्ट्या खालच्या पातळीवरची व निकृष्ट दर्जाची अभिरुची यांच्याशी एकरूप होणे हेच जंगली वास्तव, सर्वसामान्य व्यक्ती या शब्दाच्या संदिग्धेतून परावर्तित होते. फ्रान्स व भूतपूर्व सोव्हियट रशिया दोन्ही देश आमूलाग्र व पराकोटीच्या सामाजिक क्रांतीतून गेले आहेत. अमेरिका आणि ऑस्ट्रेलिया यांचा नामनिर्देष अगदी अलिकडच्या काळातील उदाहरणे घ्यावयाची झाल्यास करावा लागेल. या दोन्ही देशातील क्रांत्या अभिनव स्वरूपाच्या आहेत. या दोन्ही देशातील संस्कृती या सर्वसामान्य व्यक्तीवर खरोखरच आधारलेल्या असल्या तरी या देशातून उमरावी प्रवृत्ती अजूनही भुई धरून आहेत. त्यांचे स्वरूप सांस्कृतिक अस्थि-अवशेषांचे आहे. परंतु अखंड व सातत्याने प्रबळ अशी परंपरा टिकून राहिलेल्या देशात तशी परिस्थिती नाही. उदा. इंग्लंडमध्ये बोलताना वापरात येणारे शब्दप्रयोग, बोलण्यातला चढउतार, अभिरुची या सर्व गोष्टीतला धारदार असा वर्गीय नेमकेपणा अजूनही इंग्लंडमध्ये तग धरून आहे. उमरावी वर्गाच्या खालच्या थरातील व्यक्ती, आणि व्यापारी वर्गातील अत्यंत उच्च स्थानावरचे शेटजी यांचे एकमेव असे मिश्रण इंग्लंडमध्ये तयार झाले आहे. या

मिश्रणास उच्च ब्रिटिश मध्यमवर्गीय असे नांवही देण्यात आले. या देशातील राजकारण वाङ्मय आणि कला या क्षेत्रातील नेत्यांचा बहुतांशी पुरवठा याच वर्गातून अगदी अलिकडच्या काळापर्यंत होतच होता. इतकेच नव्हे तर इ. स. १९३० च्या आसपासच्या मार्क्सवादी लेखकांच्या बिनीच्या तुकडीतील (AVANT GARDE) लेखकांची नावे पहिली असता ते उच्च मध्यमवर्गीयातून आलेले होते असे आढळून येईल. एक महान सांस्कृतिक वारश्यावर आपण ज्याचा उल्लेख 'मूल्यातील हस्तक्षेप' असा केला आहे तो खरोखरीच आधारित आहे या दृष्टिकोनातून विचार करता. इंग्लंडमधील बुद्धिजीवी वर्गास, उमराव वर्गाबद्दल जे रोगट झपाटलेपण आहे, त्याकडे आपणास काहीसे क्षमाशील दृष्टीने पाहाता येईल. परंतु अशी सर्व प्रकारची सूट दिली तरी इंग्लिश समाजाचे अहंविषेश:गिरीला असलेली घृणास्पद काहीशी विनोदी, अस्वाभाविक, विकृत व राक्षसी जवळीक अजूनही आहे हा भाग शिल्लक राहतोच. समाजातील अभिजन वर्गाचे (मग तो वर्ग कितीही उताराला लागलेला असेना) आपण एक भाग आहोत, अगर किमानपक्षी आपली त्या वर्गाशी, आपण त्यांचेच आहोत अशी जानपछान आहे, अशा भोळसट इच्छेने प्रेरित होऊन, अजूनही तग धरून असलेली अहंविषेश:गिरी तेथे आहेच. नाट्यप्रयोग, बोलपटांचा पहिला प्रयोग, 'ओल्या पार्ट्या' या ठिकाणी 'आरिक्युजच्या लढाया' वारंवार होतच असतात. एखाद्या सामाजिक घटनेत, आपण एक तत्कालीन साक्षीदार म्हणून अगदी झोकून दिल्यागत सामील होतो असे सांगता येणार नाही ही भीती मनात असतेच. याचा पातळीवर क्रिलाँ गंड अवतीर्ण होतो. "शौर्यशाली एव्हलीन जीव दे : आम्हास ब्लॉहईम येथील मेजवानीच्या वेळी आमंत्रण होते व आम्ही तेथे जेवावयास गेलो होतो आणि तू तेथे नव्हतीस."

सामाजिक अहंविषेशगिरीच्या मागची अत्यंत उघड व विस्तृत अशा हेतूची मी आतापर्यंत नोंद घेतलेली नाही याची कल्पना मला आहे. या हेतूचं वर्णन पुढील शब्दात करता येईल. एखादा किताब प्राप्त झालेल्या अथवा धनवान किंवा कलाक्षेत्रातील अभिजन वर्गाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या उच्चपदस्य व सामर्थ्यवान व्यक्तींच्या परिवारात प्रवेश मिळवावयाचा, त्यांच्याकडून स्वीकृती प्राप्त करून घ्यावयाची. या अशा वागण्याने आपल्या असुरक्षित अहंभावाचा मोठमोठ्यानं आवाज करीत गवगवा करायचा. परंतु अहंविषेश:-गिरीबद्दल दिलेल्या या प्रकारच्या दृष्टिकरणामुळे आणखीनच प्रश्न निर्माण होतात. न्यूनगंडातून निर्माण होणाऱ्या त्रुटींची भरपाई करणे ही एक मूलभूत अशी मानसशास्त्रीय यंत्रणा आहे. अहंविषेश: व्यक्ती, ही अशा विशिष्ट मार्गाने त्रुटींची भरपाई कां करू इच्छिते? याचे स्पष्टीकरण या हेतूद्वारा मिळत नाही. **रूस्सेल लिनस** यांनी अहंविषेश: (SNOBS) या शीर्षकाचा एक मनोरंजक लेख लिहिला आहे. त्यात ते म्हणतात, "एका विस्तृत अर्थाने" आपल्या सामाजिक संबंधाबाबत अहंविषेश: व्यक्ती ही जवळजवळ असुरक्षितच असते, अशी त्या शब्दाची व्याख्याच आहे. आपल्या अहंभवाला मालिश करण्याचा एक मार्ग म्हणून

ती अहंविषेश:गिरी या मार्गाचा अवलंब करते. आता गंमत अशी आहे की अहंभावाबाबत अगदी कसलीही कमतरता वा त्रुटी नसलेली कमालीची सुरक्षितच अशी व्यक्ती सापडणे जवळजवळ अशक्य. थोडक्यात प्रत्येक व्यक्तीला कधी ना कधी आपल्या अहंभावाला मालिश करून घेण्याची वा अन्य मार्गाने बाहेरून मदत मिळविण्याची काही ना काही प्रमाणात निश्चित आवश्यकता असणारच. म्हणजेच कोणत्या ना कोणत्या प्रकारची अहंविषेश:गिरी व्यक्त न करणारी सापडणे जवळजवळ अशक्य. लेखक **रसेल लिन** यांचे हे विधान शब्दश: घेतले तर त्यावर आक्षेप घेण्यासारखे त्यात काहीही नाही. परंतु मानवी कृतीत, जसे अनेक प्रकारचे वैचित्र्य व विविधता आहे, तसेच कोणाही व्यक्तीच्या अहंभावाबाबत आहे. प्रत्येक व्यक्तीला आपल्या अहंभावाला मालिश करून घेण्यासाठी अनेक मार्ग उपलब्ध असतात. जुन्या काळातील ग्रीसमधील प्रख्यात व्यक्ती डेमास्थनिस हा जन्मत:च तोतरा होता. त्याने या त्रुटीची भरपाई आपले तोंड गोट्यानी भरून मग त्या स्थितीत स्वत:वर बोलण्याची सक्ती करून केली. अशा प्रकारे बोलण्याचा सराव त्याने इतके दिवस केला की तो जुन्या काळातील ग्रीसमधील पहिल्या क्रमांकाचा वक्ता झाला. दुसरे उदाहरण चक्रवर्ती नेपोलियन बादशहाचे. नेपोलियन हा उंचीने बुटकाच, व जन्मही सामान्य कुलात ! या त्रुटींची भरपाई, त्याने सर्व युरोप पादाक्रांत करून केली. एवंच आपल्यात त्रुटी वा कमतरता आहेत ही भावना महत्त्वाकांक्षेने प्रेरित करणारी शक्तिशाली प्रेरणा ठरलेली आहे. परंतु खरा प्रश्न वेगळाच आहे. कमतरता वा त्रुटी यांची भरपाई करण्याकरिता मिळालेली प्रेरणा एकच असते. परंतु एके ठिकाणी काहीतरी नवे निर्माण करून त्या त्रुटी व कमतरता यांचे समाधान होते. दुसऱ्या एखाद्या ठिकाणी वांझोट्या व घृणास्पद ठरेल अशा विकृत, राक्षसी, अस्वाभाविक, असंबंद्ध विनोदी मूर्खपणाकडे झुकणाऱ्या दृष्टिकोनात त्या प्रेरणेचे पर्यवसान होते. आपल्या अहंभावाला काही निश्चित अशा प्रकारे मालिश करून घेण्याची आवश्यकता बहुतेक लोकांना असते. परंतु अहंविषेश: व्यक्तीला आपल्या अहंभावाला मालिश करून घेण्यासाठी एका विशिष्ट तेलाची आवश्यकता असते. काप्री बेटावरील ब्लू ग्रोटो या सुशोभित मानव निर्मित गुहेकडे दृष्टिक्षेप टाकणाऱ्या आलिव्ह वृक्षाच्या बागेतील आलिव्ह फळातून काढलेले ते तेल असते, त्या तेलाचा वापर करून अहंविषेश: व्यक्तीला आपल्या अहंभावाला मालिश करून घेण्याची गरज असते.

मूल्यांच्या बाबतीत अयोग्य मापदंडाचा वापर केल्याकारणाने, अहंविषेश: व्यक्ती वांझोट्या कृती करण्यामागे लागते. त्यांच्या समाधानाची प्रकृती दुसऱ्या एखाद्या व्यक्तीकरवी 'कल्पनेत आपण अनुभव घेत आहोत' या प्रकारची असते. जे कोणी सत्ताधीश आहेत, त्यांच्या खांद्याला खांदा लावावा, आणि त्यांच्या प्रसिद्धीच्या झोतात वावरावे एवढीच त्यांची इच्छा असते. आपल्यापेक्षा श्रेष्ठ व्यक्तींच्या गटात तळातील स्थान घेण्याऐवजी आपल्या बरोबरीच्या व्यक्तींच्या गटात सर्वश्रेष्ठ स्थान मिळावे अशी मनिषा सत्तासंपादनच्या खऱ्या–

खुऱ्या प्रेरणेने प्रेरित झालेल्या व्यक्ती बाळगतात. अहंविषेश: व्यक्तींची प्रवृत्ती नेमकी याच्या उलट असते. अशा व्यक्तींची जी प्रकृती आहे, त्यानुसार एखाद्या गटाचा वा संघाचा भाग असणे तिला पसंत नसते. याउलट तिला ज्या गटाचा वा व्यक्तींचा हेवा वाटतो, त्या गटातील अगदी खालच्या थरावरचे स्थान तिला पसंत असते. अगर त्या गटातील वा संघातील लोकांनी आपणास त्यांच्या अवतीभोवती वावरण्यास परवानगी घ्यावी एवढीच माफक मनिषा अशा व्यक्तीची असते. अशी व्यक्ती एखाद्या खालच्या श्रेणीतल्या हॉटेलमध्ये चांगली हवेशीर व स्नाहगृह असलेल्या खोलीत राहणार नाही. याउलट ती एखाद्या पंच–तारांकित हॉटेलमध्ये अंधाऱ्या कुबट खोलीत राहणे पसंत करील. आपल्या शरीराला आराम–दायक वाटणाऱ्या चैनीच्या गोष्टी आपणाला प्राप्त व्हाव्यात असे न वाटता त्या व्यक्तीला आपण 'ताज' मध्ये रहात आहोत या विचाराने ती समाधान पावते. या व्यक्तीला ज्या सामाजिक गोष्टीतून आनंद मिळतो त्याचे स्वरूपही असेच विकृत असते. ही व्यक्ती प्रेम, मैत्री, आनंदी वातावरण या पाठीमागे लागत नाही. याउलट समाजातील निवडक अशा अभिजन वर्गातील लोकांच्या सहवासात रहाण्याची आपणास परवानगी मिळाली या कल्पनेने त्या व्यक्तीला कल्पित समाधान लाभते. कलाक्षेत्रातील अहंविषेश: व्यक्तीला चित्रे प्रत्यक्ष पहाण्यापेक्षाही त्या चित्रांचा कॅटलॉग पाहून आनंद मिळतो. किर्केगार्ड या तत्वज्ञाचे लिखाण वाचून अशा प्रकारच्या बौद्धिक क्षेत्रातील व्यक्तीवर छाप पडत नाही. याउलट आपण स्वत: किर्केगार्डचे लिखाण वाचीत आहोत या विचाराची छापच तिच्यावर अधिक पडते. मूल्या–बाबत ही जी विकृती (PERVERSION) आलेली असते. त्याने त्या व्यक्तीच्या जीवशास्त्रीय सहजप्रवृत्तीवर उदा. तिची अभिरुची, एखाद्या सुवासाला असलेली पसंती, अगर लैंगिकते–बद्दलची तिची प्रवृत्ती यांच्यावर परिणाम होण्याचा संभव आहे. एवंच अहंविषेश: व्यक्तीच्या विचाराधीन जी गोष्ट असते, त्यापासून त्या व्यक्तीला समाधान मिळत नाही. त्या गोष्टी ज्या दुय्यम स्वरूपाच्या गोष्टीशी संलग्न आहेत त्यापासून तिला ते समाधान प्राप्त होते. खरे म्हणजे हे समाधान खोटे व नकली असते. त्यांच्या प्रेरणा उत्स्फूर्त नसतात. अनुकरण करण्याच्या प्रवृत्तीतून त्या आलेल्या असतात. त्यांचे कष्ट वांझोटे असतात. त्यांचे समाधान फक्त कल्पनेतच असते. त्यांना जे काही विजय मिळतात. मी आत्मवंचना असते. घरात दूरचित्रवाणी संच नसतानाही आपल्या घरावर दाखवेगिरीसाठी उभारण्यात आलेल्या दूर-चित्रवाणी– तबकडी ही या अहंविषेश: व्यक्तीचे उत्तम प्रतिक आहे.

७

इ. स. १९५० सालच्या आसपासच्या काळात समाजात पहिले पाऊल टाकणाऱ्या श्रीमंत तरुणीचे जीवन अनेक लोकाना कल्पना नसेल इतके खडतर होते, याबद्दल अजिबात शंका नाही. संस्कृती ही खरोखरच श्रेष्ठ गोष्ट आहे आणि आपण स्पष्टच बोलू या, ती तशी

थोडीशी कंटाळवाणीच आहे. सर्व दिवस ह्याबाबत कामी लावणे शक्यच नाही. (अशा प्रकारचे उद्गार अलिकडे एका श्रीमंत तरुणीने काढल्याचे आमच्या कानावर आले आहे)

हाऊसवाईफ (गृहिणी एप्रिल १९५४)

अहंविषेश: गिरीच्या निरनिराळ्या प्रकारांची सुची तयार करणे हे काम चांगले व लक्षणीय ठरावे इतके कंटाळवाणे आहे. तथापि त्यामागे अपरिचित अशा काही प्रकाराचा मी उल्लेख करणार आहे.

उदा. ब्रिटिश उच्च वर्गात आजही प्रचलित असलेल्या संभाषणीय भाषेत 'हुशारी' (CLEVERNESS) हा शब्द तसा दुष्कीर्त आहे. या वर्गातील स्त्रिया "माझे स्पेलिंग फार वाईट आहे. ते सुधारण्याची सुतराम शक्यता नाही." 'बेरीज वजाबाकी असली गणिते मला करता येत नाहीत.' 'भूगोल आणि तसले विषय माझे फारच कच्चे, मला त्यात गतीच नाही' अशी विधाने अभिमानाने आणि आनंदाने करतात. एक काळ असा होता की, लेखनिक हे 'ज्ञानी' होते. त्यांना वेतनही फारसे मिळत नव्हते. त्याही पूर्वी लेखनिकांचे काम गुलाम करीत. उच्चवर्गातील लोकांना ही वेठबिगार उपलब्ध असल्याने त्याना आपले उमरावी धंद्यापाठीमागे धावता येत होते. उच्च थरातील जो वर्ग आता अस्थिअवषेश (fossilized) स्वरूपाचा झालेला आहे त्या थरात अजूनही 'ज्ञान' 'हुशारी' 'अक्कलहुशारी' या अशा प्रकारच्या गोष्टीकडे घृणेने पाहिले जाते. शेकडो वर्षापूर्वी प्रचलित असलेल्या मनोवृत्तीचा या विद्यमान काळातील तो थेट प्रतिध्वनी आहे.

इंग्लडमधील पब्लिक-स्कूलमध्ये मानवविद्या या ज्ञानशाखेवर जेवढा भर देण्यात येतो. तेवढेच दुर्लक्ष विज्ञानाकडे होते. या परिस्थितीमुळे इंग्लंडमधील बौद्धिक क्षेत्रातील मूल्यामध्ये अधिक तरलपणे विकृती तयार होते. पब्लिक स्कूलमध्ये असे जे होते त्या परंपरांच्या मुळांचा मागोवा गतइतिहासात घेणे हेही तितकेच सोपे आहे. या सर्वाचा परिणाम एक विरोधाभास निर्माण होण्यात होतो. एखाद्या तिसऱ्या दर्जाच्या कवीचे वा चित्रकाराचे नाव यापूर्वी आपण कधी ऐकले नव्हते हे जर कबूल करण्याचा प्रसंग आला तर त्यामुळे लोकांची मानखंडना होते. परंतु आपल्या मुलांकडे जनुकशास्त्रानुसार कोणते गुण येतात. त्यांच्यावर कोणत्या कोणत्या जीवशास्त्रीय नियमांचे नियंत्रण आहे अथवा घरातील विजेचे दिवे कसे काम करतात याबद्दल आपण अज्ञानी आहोत हे कबूल करण्यात अभिमान वाटतो. यंत्राना भरलेल्या आपल्या पर्यावरणाशी आधुनिक माणसाचे संबंध हे आता आदिवासी-वनवासी यांच्या बौद्धिक पातळीवर येऊन पोहोचले आहेत. आधुनिक मनुष्य मोटारगाडी चालू करतो. पण ती कशी चालते हे त्याला माहीत नसते. तो शेगडीतला गॅस चालू करतो पण त्याचे ज्वलन का होते, तो झोपेची गोळी घेतो व त्याला झोप लागते. पण हे सारे असे का होते हे त्याला माहीत नसते. परंतु अस्तित्ववाद व कलेतील अमूर्त कल्पना, आणि **कोलाज**

(COLLAGE) याविषयी आत्मसंतुष्टतेने बोलतो.

ही सर्व वस्तुस्थिती इंग्लमधील सामाजिक उतरंडीत परावर्तित झालेले दिसते. उदा. मानवी विद्येशी संबंधित असलेले व्यवसाय-कलाक्षेत्र व साहित्यक्षेत्र यांना जे व्यवसाय विज्ञानाशी आणि इंजिनियरिंगशी संबंधित आहेत त्यांच्यापेक्षा समाजात वरचे स्थान आहे. मध्य युरोपमध्ये श्रीयुत इंजिनिअर आणि फ्रान्समध्ये श्री तंत्रवैज्ञानिक हे अभिजन समजले जातात. इंग्लंडमध्ये इंजिनिअर या व्यक्तींचे स्थान कामगार वर्ग आणि मध्यमवर्ग या दोन वर्गात कोठेतरी हेलावत असते. ब्रिटिश उद्योगधंद्यांची जर्मन आणि अमेरिकन उद्योगधंद्याबरोबर होत असलेल्या स्पर्धेत सातत्याने एकसारखी जी पीछेहाट होत आहे ती येथे वर्णन केलेल्या अहंविषेश:गिरीचा किती परिणाम आहे याचा तपास मनोरंजक ठरेल. त्याचे कारण अशा अहंविषेश:गिरीचा परिणाम समाजातील कार्यक्षम व्यक्ती कोणता धंदा निवडतात यावर होतच असतो. ही जी विकृती आहे त्याला दुसरीही बाजू आहे. विज्ञानाच्या पाठोपाठ आणखी एका गोष्टीवर भर देण्यात येऊ लागला. ती गोष्ट म्हणजे सर्व घटितातील ज्या गोष्टींचे मोजमाप घेता येते त्यावर दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणात भर देण्यात येतो. आपण एखाद्या गोष्टीचे गुण व त्याची श्रेणी, त्याची प्रत ही आता तिचे मोजमाप घेऊन सांगण्यास शिकलो आहोत. त्यासाठी अनेक प्रकारची पदार्थविज्ञान शास्त्रीय उपकरणे व मोजमोप वापरली जातात. उदा. रंग आणि आवाज याचे रूपांतर आपणास आता कंपन-कंप्रता. (VIBRATIONAL FREQUEWCY) यात करता येऊ लागले आहे. ही कंपन-कंप्रता साध्या सरळ आकड्यांच्या द्वारा व्यक्त करता येते. याच प्रमाणे दुसऱ्याही अनेक गोष्टींच्या वा वस्तूंचा अंगी असलेल्या गुणांचे मोजमाप घेऊन त्यांचे आकड्यात रूपांतर करून ते गुण व्यक्त केले जातात. या वस्तूंच्या ठिकाणी असलेली ऊर्जा व त्यांच्या हालचालींचा वेग, इत्यादी गोष्टी संख्यात्मक समीकरणांच्याद्वारे व्यक्त केल्या जातात. परंतु या प्रक्रियेचे पर्यवसान एका धोकादायक मानसिक सवयीत होते. गुणांचे **स्पष्टीकरण** मोजमापांच्या द्वारे केले जातेच. गुण या **संकल्पनेची** जागा आता मोजमाप व्यक्त करणाऱ्या संख्या **घेणार आहेत.** अमेरिकन शब्दप्रयोग वापरून सांगावयाचे झाल्यास व्यक्तीचे मूल्य बँकेत त्यांच्या नावावर किती पैसे आहेत यावरून ठरते. एखाद्या चित्रकाराची प्रत व दर्जा हा बाजारात त्याच्या कलाकृतींचा 'भाव' काय आहे यावर ठरते. शेअर-बाजारात जसे चढ-उतार होतात. त्याप्रमाणे एखाद्या ग्रंथाची व पुस्तकाची लायकी त्याच्या किती प्रती खपल्या यातून व्यक्त होते. आकाशवाणी व दूरचित्रवाणी यावर गाणारे गायक हे कोणत्या प्रतीचे आहेत. हे त्यांचे गाणे ऐकणाऱ्यांच्या संख्येवरून ठरविले जाते. गुणांचे मोजमाप घेण्यासाठी हा संख्यात्मक मापदंडाचा वापर ही या मूल्यांच्यातील अत्यंत भयावह विकृती आहे. तो मानसिक गोंधळाचा एक प्रकार आहे एवढेच. हा असा गोंधळ अहंविषेश: व्यक्तीच्या मनात असल्याकारणाने तो एखाद्या चित्राचे

सौंदयशास्त्रीय मूल्य ते किती जुने आहे आणि त्याची जातकुळी (PROVENANCE) काय हे लक्षात घेऊन करतो.

आणखी एका प्रकारची अहंविषेश:गिरी आहे. ती हुशारीबद्दलच्या नापसंतीतून निर्माण होते. यासाठी अहंविशेष: व्यक्ती वागण्याचा एक विशिष्ट ढंग विकसित करते. 'गोष्टीवेल्हाळ व्यक्तित्वा'ची उभारणी करणे हा त्यामागचा हेतू असतो असे त्या अहंविषेश:गिरीचे वर्णन करता येईल. कोणत्याही गोष्टीची चर्चा त्या गोष्टीत रस घेऊन तिच्याबद्दल उत्साह दाखवून, संभाषण करणे हा प्रकार काही समाजात गैर समजला जातो. संभाषणात असलेल्या विषयाला एका 'गोष्टी'चे स्वरूप देऊन, मूळ संभाषणाची दिशा बदलून, गंभीरपणे चर्चा करण्याचा धोका टाळणे, हा मार्ग संभाषणकलेचा एक चांगला प्रकार समजला जातो. अशा समाजात वागणुकीच्या वेगवेगळ्या ढंगाचे तण फोफावतात. यामुळे बौद्धिक आदान-प्रदानाचा गळाच दाबला जातो. त्या अशा परिस्थितीत दुसऱ्यावर छाप टाकण्यासाठी चक्रमपणा दाखवणे अथवा काहीशी वेडाची झांक असलेला मुखवटा धारण करणे, हा अगदी सुरक्षित मार्ग समजला जातो. या अशा प्रकारच्या समाजात साधेपणा आणि विषयाला जाऊन भिडणे याचा काहीही उपयोग होत नाही. आपणापाशी व्यक्तिमत्त्व आहे / असावे ही अहंविषेश: व्यक्तीची महत्त्वाकांक्षा नसते. पण आपण 'व्यक्तित्व' बनलो आहोत ही तिची महत्त्वाकांक्षा असते. काही महान विचारवंतानाही या जंतूची लागण झाल्याचे आढळून येते. बर्नाड शॉ प्रकट करीत असलेली विदुषकगिरी, इंग्लिश प्राध्यापक आविष्कृत करीत असलेली 'प्राध्यापकगिरी', एखाद्या उच्चपदस्थ व्यक्तीने प्रत्यनपूर्वक साध्य केलेला तोतरेपणा, चक्रमपणा हा हवाहवासा गुण वाटलेल्या सर्व गोष्टी, मनाचा विकास व मनाची मशागत यापेक्षा वागणुकीचे ढंग विकसित करणे हे अधिक पसंतीचे समजले जाण्याची लक्षणे आहेत.

उलटी केलेली अहंविषेश:गिरी (INVERTED SNOCBERY) हे घटीतही तितक्याच उघडपणे आढळून येते. कोणत्याही समाजात त्या समाजाला सर्वसामान्यपणे मान्य केलेली एखादी मूल्यश्रेणी असते. ही श्रेणी नुसती उलटी केली, की मग त्यातून शालीनता दाखविणारे पेहलवान, प्रसिद्धी पराङ्गमुखांची दाखवेगिरी, आपली नखेदेखील घाणेरडी आहेत असे सांगणारे डॅन्ड्री, आणि अज्ञानाविषयी प्रेम दाखविणाऱ्या व्यक्ती अशासारखी उलटी केलेली अहंविषेश:गिरी आविष्कृत करणाऱ्या व्यक्ती निर्माण होतात. प्रख्यात फ्रेंच कादंबरीकार प्रुस्त याच्या कादंबऱ्यातील नायक अतिसंवदेनाक्षम आणि अतिमुखर आहेत. त्यांची तुलना हिमिंग्वे यांच्या मुक्या आणि अबोल नायकांशी केली म्हणजे मग वाङ्मयीन क्षेत्रातील अहंविषेश:गिरीची कथा व व्याप्ती यांची व्याख्या ही एका उलट्या केलेल्या मापदंडाच्या मदतीने आपण केली आहे असे होते.

सरतेशेवटी 'सर्वज्ञ अहंविषेश:' व्यक्तीसारख्या दु:खीकष्टी व्यक्तींचा उल्लेख केलाच पाहिजे. गंमत अशी आहे की या अशा व्यक्तीला अहंविषेश:गिरी ही वाईट गोष्ट आहे याचे



अनुक्रमणिका

ज्ञान आहे. हे ज्ञान भोळसट अगर खऱ्याखुऱ्या अस्सल अहंविषेश: व्यक्तीला नसते. परंतु अहंविषेश: या आल्हाददायक विषप्राशनाशिवाय अगर त्या अत्यावश्यक कुबडी शिवाय (यातील निवड त्या व्यक्तीवर अवलंबून आहे) आपणास जगणे केवळ अशक्य आहे. असे अगदी हताशपणे मर्मभेदी दृष्टीतून ती कबूल करीत असतो. हे अशा प्रकारचे सर्वज्ञ अहंविषेश: स्वत:चाच धिक्कार करणारे असतात. पण त्याजबरोबर त्यांना अहंविषेश:गिरीच्या रोगातून बरे करणे केवळ अशक्य आहे. अशा सर्वज्ञ अहंविषेश: व्यक्ती विद्यमान काळातील इंग्लिश लेखक आणि कलावंत यांच्या आढळून येतात.

८

अहंविषेश:गिरी हे विष हे खरोखरच इतके आनंददायी आहे का? मी मागे एके ठिकाणी नमूद केले होते की ला फोनतेन यांच्या **दी फॉक्स आणि दी ग्रेप्स** (कोल्हा आणि (आंबट द्राक्षे) या गोष्टीचा उत्तरार्ध लिहिण्याची मला नेहमीच इच्छा होत असे. गरीब बिचारा कोल्हा. मित्रमंडळीकडून चेष्टा होत होती. आपल्या पराभवाची जाणीवही त्याला होती. तो न्यूनगंडाने पछाडला जातो; व त्यातून सुटका करून घेण्यासाठी या न्यूनगंडावर उपाय म्हणून एकच मार्ग आहे हेही त्याला माहीत होते. रात्री मागून रात्री जात होत्या. त्याच्या टोळीतले त्याचे मित्र चांगल्या गलेलठ्ठ कोंबड्या चोरून मजा मारीत होते. हा गरीब कोल्हा मात्र अगदी गुप्तपणे झाडावर कसे चढावे याचे धडे गिरवीत होता. अनेक आठवडे चिकाटीने प्रयत्न केल्यानंतर सरतेशेवटी तो त्या द्राक्षांकडे जाऊन पोहोचण्यात यशस्वी झाला. पण हायरे दैवी ! महाभयानक स्वरूपाची निराशा त्याची वाट पहात बसली होती. तोवर ती हवीहवीशी वाटणारे द्राक्षे आंबटच असतात. अगदी प्रथमपासून ती आंबटच आहेत अशी बतावणी त्याने केली होती. परंतु आता त्याच्यावर विश्वास कोण ठेवील? बाहेरून चांगली रसरशीत दिसणारी सुंदर द्राक्षे ही लुसलुशीत नसून चांगलीच टणक व अम्लधर्मी चवीची आहेत यावर त्याचाच विश्वास बसणे कठीण होते. या द्राक्षांनी तो पछाडून जातो. तो द्राक्षांचे मांडव एकसारखे चढतच असतो. धापा टाकीत, घाम गाळीत. आपण या द्राक्षांच्या जवळ जाऊन पोहोचण्याचा पराक्रम करून पुरुषार्थ गाजवीत आहोत हे स्वत:लाच सिद्ध करून देण्याच्या एकमेव उद्देशाने, तो ती महाभयानक फळे खाण्याचे चालूच ठेवतो. हा फलाहार केल्या– कारणाने तो दिवसेंदिवस खंगत जातो. त्याचा मानसिक तोल बिघडतो आणि सरतेशेवटी गॅस्ट्रीक अल्सर होऊन त्याला मरण येते.

अधिक बुद्धिवान अशा अहंविषेश: व्यक्ती आणि आपल्या करीयरच्या पाठीमागे व्यक्तीची शोकांतिका चित्रित करणे एवढाच या कहाणीचा अर्थ आहे. निवडक अभिजन मंडळीत अथवा त्या थरात आपण सरतेशेवटी प्रवेश मिळविला. आपण त्यासाठी भगिरथ प्रयत्न केले. पण हे अभिजन शिळेपाके आणि कोणत्याही प्रकारची स्फूर्ती न देणारे आहेत हे अधिक

बुद्धिवान व्यक्तीला चांगले माहीत असते. परंतु या शुष्क द्राक्ष-मळ्यावर गुजराण करणे आपणास भाग आहे असे त्या व्यक्तीला वाटते. याचे कारण हा द्राक्षमळा आपल्या आवाक्यातला आहे हे त्याला सिद्ध करावयाचे असते. हाच न्याय प्रत्येक क्षेत्रात पछाडल्यासारखे यशाच्या शोधात असलेल्या व्यक्तींना लागू आहे. मग ते चित्रपटसृष्टीतील कलाकार असोत, उद्योगधंद्यांच्या क्षेत्रातील उच्चपदस्थ असोत. करीअरपाठीमागे लागलेल्या तरुणी असोत, अथवा समाजातील सभा-समारंभात आपण त्याचे यजमान आहोत अशा थाटात वावरणाऱ्या विदुषी वा श्रीमंत स्त्रिया असोत. या सर्वांच्या बाबतीत ते खरे आहे. त्यांच्या मनात त्यांना हव्याहव्याशा वाटत असलेल्या यश सोपानाची पहिली पायरी चढून पार केल्यानंतर त्यांना असे आढळून येते की, तोवर हवेहवेसे वाटणारे फळ हे त्यांनी कल्पना केली होती. तेवढे अद्भुत अजिबात नाही. तथापि असे असले तरी घाम-गाळत प्रयत्नांची पराकाष्ठा करीत ते कडूफळ चावीत चघळीत, आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत जगण्याच्या सक्तीत ते आपले आयुष्य व्यतित करतात.

आजच्या या विद्यमान परिस्थितीत आपण कोणत्याही क्षेत्राकडे दृष्टिक्षेप टाकला, तर आंबट द्राक्षावर ताव मारणाऱ्या, खंगलेल्या कोल्ह्यांनी सारा प्रदेश व्यापलेला आहे असे दिसून येईल. फक्त अतिसामान्य आणि तितक्याशा उच्चभ्रू नसलेल्या कोल्ह्यांना ससे आणि कोंबड्या पकडण्यात दिलचस्पी असते. याचा परिणाम सामुहिक बद्धकोष्टतेत झाला आहे. एका प्रचंड व आजवर कधीही न अनुभवलेल्या श्रेणीचे मानसिक स्वरूपाचे संतुलन बिघडण्यात त्याचा परिणाम होतो. या सर्वांचा एकत्रित परिणाम म्हणून सभ्यतेच्या सर्व क्षेत्रात सर्वसामान्य स्वरूपाच्या मूल्यांच्या बाबतीतल्या विकृतीत परावर्तित होण्यात होतो.

एवंच नैतिकेबाबतचा एक पेचप्रसंग आणि त्याची सोबत करणारा नैतिक आणि बौद्धिक गोंधळ याचे परावर्तन म्हणजे अहंविषेश:गिरी हे घटित आहे असे दिसून येते. मूल्याबाबत मान्यवर व पक्के असे मापदंड उपलब्ध नाहीत अशा परिस्थितीत चुकीच्या गोष्टीकरिता, चुकीच्या श्रेणीचा वापर होणे अनिवार्य आहे. गोंधळात टाकणाऱ्या या जगात मनुष्यप्राणी चाचपडत आपला मार्ग काढीत असतो. असे तो करीत असताना, त्याच्याकडे मार्ग–दर्शनासाठी नेहमीच चुकीच्या दिशा दर्शविणारे होकायंत्र असते. मोजमाप घेण्याकरता फुटपट्टी असते. परंतु मिडास राजाच्या हातातील जादूची काठीचा गुणधर्म नेमका उलटा केल्यागत असतो. म्हणजे ती काठी फिरवली की गोष्टीचे सोने होत नाही. उलट ती ज्याला ज्याला स्पर्श करील त्याची माती होते. थोडक्यात पडछायात्मक उद्दिष्टयांचा शोध घेण्यात मानवप्राणी गुंतून पडला आहे. या प्रयत्नातून अतिभौतिक काळोखात पडाछायात्मक समाधानाचा पुरवठा त्याला होतो एवढेच.

---



अनुक्रमणिका

# लोकशाहीची काळी बाजू : एथनिक आणि राजकीय शुद्धीकरणाची आधुनिक परंपरा

- विठ्ठल गोठणकर

[ लोकशाहीची काळी बाजू : एथनिक आणि राजकीय शुद्धीकरणाची परंपरा हा लेख प्रा. **मायकेल मान** (MICHAEL MANN) यांच्या प्रबंधावरून तयार करण्यात आलेला आहे. अमेरिकेतील युनिव्हर्सिटी ऑफ मिनसोटा येथे १ ते ३ मे १९९८ च्या दरम्यान (दि सोशल सायन्स रिचर्स कौन्सिल वर्कशॉप) समाजशास्त्र संशोधन मंडळाची कार्यशाळा झाली. त्याचा विषय (डेमाक्रसी, युज ऑफ फोर्स ग्लोबल चेंज) लोकशाही, दंडसत्तेचा वापर आणि जागतिक बदल हा होता. या कार्यशाळेत प्रा. मायकेल मान यांनी हा प्रबंध प्रथम सादर केला.

या लेखात आलेल्या तीन प्रमुख शब्दांचे स्पष्टीकरण येणेप्रमाणे

ORGANIC/ORGANICISM या लेखात या शब्दाला 'धरतीवाद' 'धरतीपूत्र' असा शब्दप्रयोग केलेला आहे. अधिक चांगला शब्द कोणाला सुचल्यावर त्याचे मन:पूर्वक स्वागत होईल.

या शब्दाचा इंग्रजी राजकीय शब्दकोशात व्याख्या नव्हे पण वर्णन खालील प्रमाणे देण्यात आलेले आहे.

काही संमिश्र घटक - नेमकेपणाने सांगावयाचे झाल्यास सामाजिक घटक - हे organic आहेत, अगर पुरेश्या organic वस्तु वा गोष्टीसारखे आहेत. ते organic जीवनक्रमाच्या नियमानुसार त्यांना समजावून घेता येते. Holism (साकल्यवाद) ही तत्वज्ञानातील एक विचारधारा आहे. त्याचे एक स्वरूप अशा प्रकारे धरतीवाद हा सिद्धांत सामान्यपणे मांडण्यात येतो. याचे कारण असे की, सामाजिक घटक, हे सजीव प्राण्यासारखे आहेत. सजीव प्राण्याच्या शरीराचा एक एक अवयव घेऊन, त्या अवयवांचे वर्णन, गुण व कार्य समजावून घेतले तरी तो सजीव प्राणी यर्थार्थपणे समजावून घेता येत नाही. परंतु हे वेगवेगळे अवयव ज्या शरीराचा भाग आहेत, त्याच्याशी त्या अवयवांचा एकमेकांशी काय संबंध आहे. त्याचे स्पष्टीकरण देणाऱ्या संघटना तत्वाला आवाहन करून तो सजीव प्राणी योग्य प्रकारे समजावून घेता येतो. हीच गोष्ट सामाजिक घटकांच्या बाबतीतही आहे. त्या सर्व घटकांचा साकल्याने विचार करावा लागतो. धरतीवाद्यांचा दृष्टीकोन हा काही वेळा अंगभूतपणे सनातनी असतो. अशी समजूत होण्याचे कारण असे आहे की, या दृष्टीकोनानुसार सामाजिक घटक हे नाजुक प्राकृतीचे आहेत. त्यांना सहजपणे समाजवून घेता येत नाही. परंतु त्यांच्यात

फारसा हस्तक्षेप केला नाही, तर ते घटक जीवंत राहण्याचा आणि वेळप्रसंगी बहरण्याचा संभव अधिक. तथापी जे लोक हे मान्य करतात, ते क्रांतीचाही पुरस्कार करतात. या श्रद्धे मागचे कारण असे की ज्यावेळी एखादा समाज **राम** म्हणतो, त्याचवेळी दुसरा एखाद्या समाजाचा जन्म होण्यास तो कारणीभुत होतो.

**GENOCIDE** - या शब्दासाठी वंश-उच्छेद या शब्द योजलेला आहे. या शब्दातून या शब्दाचा मूळ अर्थ प्रतित होत नाही हे खरे आहे. जाती- अशा सारख्या दुसऱ्या शब्दांच्या बाबत हीच अडचण आहे. ही संकल्पना प्रथम **राफेल लामकीन** (RAPHEL LAMKIN) यांनी मांडली, याचा अर्थ, निरनिराळ्या वंशाची (RACE हा शब्द आता जीवनशास्त्रात पार बदनाम झालेला शब्द आहे) स्वाभाविक प्रकृती काय असते (या ठिकाणी प्रत्येक वंशाची प्रकृती वेगळी असते हा सिद्धांत गृहीत धरलेला आहे) हे विचारात घेऊन, व त्यापासून प्रेरणा घेऊन एखाद्या वंशाचा बुद्धीपुरस्सर नायनाट करणे असा आहे. या सिद्धांतानुसार काही 'वंश' हे वरच्या श्रेणीतील आणि काही खालच्या श्रेणीतील. खालच्या श्रेणीत असलेल्या वंशाचा उच्छेद केलाच पाहिजे, कारण त्या 'खाल'च्या आहेत व त्या एकंदर समाजाची श्रेणी आपल्या स्वत:च्या अस्तित्वाने खालच्या पातळीवर आणतात. अशा प्रकारचे तर्कशास्त्र व युक्तिवाद त्या सिद्धांतात अनुस्यूत आहे. संयुक्त राष्ट्र संघाच्या सर्व साधारण सभेने १९४८ एक ठराव करून या प्रकारचे कृत्य, हे आंतरराष्ट्रीय कायद्याखाली 'गुन्हा' या वर्गात अंर्तभूत केलेले आहे.

**राज्यवाद** - etatisme एतातीझम - statism हा शब्द फ्रेंच भाषेत इ. स. १९२० पासून वापरात येऊ लागला. भांडवलशाही समाजात जी अर्थव्यवस्था व जो जीवनमार्ग विद्यमान आहे, त्या व्यवस्थेत राज्यातील मध्यवर्ती सत्तेने प्रत्यक्ष हस्तक्षेप करणे, या अर्थाने या शब्दाचा वापर सुरुवातीच्या काळात झाला, हा हस्तक्षेप उद्योगधंदे वा इतर संपत्तीचे राष्ट्रीयकरण करणे, मजूरीच्या दरावर नियंत्रण ठेवणे, वस्तुंचे भाव एका विशिष्ट पातळीवर स्थिर राहावेत यासाठी प्रशासकीय हस्तक्षेप करणे आणि सामाजिक कल्याणासंबंधी कायदे करणे, या सारख्या इतरही अनेक मार्गांचा राज्याने केलेल्या त्या हस्तक्षेपात समावेश असतो. एका अधिक व्यापक दृष्टीकोनातून पहाता राजकीय परीवर्तनासाठी एक आवश्यक अट या स्वरूपाने राज्याला ही अशा प्रकारची सत्ता असणे आवश्यक आहे, असे **राज्यवाद** या शब्दातून दर्शविले जाते. ]

विसाव्या शतकात वंशउच्छेदामुळे (GENOCIDE) अनिच्छेने मृत्यू पत्कराव्या लागलेल्या लोकांच्या यादीत सुमारे सहा कोटी लोकांचा समावेश आहे. या यादीतील लोकांची संख्या एकसारखी वाढत होती व वाढतेच आहे. असे आहे तरी विद्वान आणि सामान्य माणसेही अधिक आल्हाददायक विषयावर आपले लक्ष केंद्रीत करणे पसंत करतात. विसाव्या शतकाच्या आर्थिक, सामाजिक आणि राजकीय प्रगती या खऱ्या संरचनात्मक

प्रवृत्ती आहेत. या प्रवृत्तींना वंशउच्छेदाने दुर्दैवाने खिळ घातली असा त्यांचा दृष्टीकोन आहे. अर्थात या मंडळींनी या दुर्दैवी घटनेचा विचार केला तरच, **खुनी** असा हा वंशउच्छेद वा एथनिक आणि राजकीय शुद्धीकरण हे **मूलत:** आणि आवश्यकपणे आधुनिकता विरोधी प्रवृत्ती आहे, ती आदीमानवी अवस्थेकडे घेऊन जाणारी पुच्छप्रगती आहे; अशाही दृष्टीकोनातून त्याकडे पाहिले जाईल. समाजात मागासलेले अगर समाजाने काठावर लोटलेले अनेक वर्ग असतात. या अशा वर्गांना चतुर, कारस्थानी आणि धोकेबाज राजकारणी आपल्या स्वार्थासाठी खेळवितात आणि या मागासलेल्या व काठावरच्या लोकांकडून ही पाशवी कृत्ये करून घेतात. राजकारणी, परपिडक, ते पूर्वीच्या युगोस्लावियातील महाभयानक सर्ब (वा क्रोट) अगर कमालीचे अप्रगत असे हुतु (अगर तुतसिझ) या सर्वांना दोष द्या. या सर्वांच्या या महाभयानक कृत्यांशी आम्हा आधुनिक पाश्चिमात्य लोकशाहीवाद्यांचा असलाच तर हा फारच थोडा संबंध आहे. या दृष्टीकोनाला एक पर्यायी दृष्टीकोन आहे. या दृष्टीकोनाचे मूळ धार्मिक स्वरूपाच्या विचारात सामान्यपणे आढळून येते. या दृष्टीकोनानुसार - EVIL - दुष्ट कृत्ये करण्याची प्रवृत्ती आणि ती करण्याची कुवत ही एक विश्वव्यापी अशी सार्वत्रिक मानवी प्रवृत्ती आहे. मग ते मानव सुसंस्कृत असोत वा कमालीचे अप्रगत असे मानव असोत. या दृष्टीकोनात जरुर तथ्य आहे. तथापी दुष्ट (EVIL) गोष्टी करण्याची प्रवृत्ती या काही विशिष्ट परिस्थितीत, **प्रत्यक्ष घटना** बनतात. वंशउच्छेदी प्रवृत्तीबद्दल बोलावयाचे झाल्यास, ही प्रवृत्ती जितकी आधुनिक समाजात आढळते, **तितकी ती आदीम-समाजात** (PRIMITIVE) **आढळत नाही. ती विशेष करून आधुनिक समाजात आढळते.**

जर्मनीतील नात्झींनी आपल्या राजवटीत आपलेसे केलेले **शेवटचे उत्तर** (FINAL SOLUTION), स्टॅलिनवाद्यांनी नात्झींनाही लाजविणारी केलेली कत्तल, कांबोडिआ, रुआंडा आर्मेनिया या देशात झालेल्या कत्तली ही विसाव्या शतकातील अत्यंत कुप्रसद्धि अशी वंशउच्छेदाची उदाहरणे आहेत. विद्वानांचे काही छोटे गट या अशा घटनांचा खास करून अभ्यास करीत आहेत. या सर्वच विद्वानांनी या सर्वच घृणास्पद व भयावह घटनात असलेल्या आधुनिकतेचा निर्देष केलेला आहे. तीच या घटनांची प्रवृत्ती आहे हे अधोरेखितही केले आहे. आधुनिक राज्यांची एका विशिष्ट भूप्रदेशावर सत्तेबाबत मक्तेदारी असते. ती सार्वभौम राज्ये असतात. हा भूप्रदेश वस्तूत: सांस्कृतिक दृष्ट्या बहुरंगी, बहुढंगी आणि आर्थिक दृष्ट्या वेगवेगळ्या थरात विभागलेला असतो. ह्या अशा प्रकारच्या भूप्रदेशावर निरंकुश सत्ता असल्याकारणाने वंशउच्छेद करण्याची आणि त्या कामाकरता सत्तेचा वापर करण्याची इच्छा निर्माण होते; असे समाजशास्त्रज्ञ **लिओकूपर** यांचे याबाबतच विश्लेषण आहे. त्यांनी आपल्या GENOCIDE-ITS POLITICAL USE IN THE TWENTIETH CENTURY (वंशउच्छेद : विसाव्या शतकातील त्याचा राजकीय उपयोग) या ग्रंथात ते विस्ताराने मांडले आहे. **वालीमान** आणि **डोबकोवस्की** यांनी संपादन केलेल्या GENOCID AND THE MORERN AGE ( वंशउच्छेद आणि आधुनिक युग) या ग्रंथात **रॉजर**

**स्मिथ** यांनी असे ठासून सांगितले आहे की, आधुनिक राज्यांच्या धोरणात वंशउच्छेद हे बुद्धीपुरस्सर वापरण्यात येणारे एक साधन आहे. काही विश्लेषकांनी आधुनिक राज्यांना उपलब्ध असलेल्या तंत्रविज्ञानावर भर दिला आहे. आधुनिक शतकातील वाहतुकीची साधने, आणि आधुनिक शासन व्यवस्था इत्यादी साधने आधुनिक राज्यांच्या शासनाला उपलब्ध असतात. यामुळे प्रचंड प्रमाणावर होणारी प्राणहत्या आधिक 'कार्यक्षम' होऊन ती एक 'वरची' पायरी गाठते. ह्या दृष्टीकोनापेक्षा **हेलेन फईन** (HELEN FEIN) यांनी आपल्या ACCOUNTING FOR GENOCIDE (वंशउच्छेदाचे स्पष्टीकरण) या ग्रंथात वेगळेच मत मांडले आहे. त्यांच्या मते, तत्त्वप्रणालीत्मक अशी आधुनिक उद्दिष्टे आणि तंत्रविज्ञानाने उपलब्ध करून दिलेली साधने, ही दोन्हीही विसाव्या शतकातील योजनापूर्वक करण्यात येत असलेल्या प्राणहत्येला जबाबदार आहेत. आधुनिक राज्यांसमोर एका नव्या युगाचे संकल्पचित्र असते त्याची परिपूर्ती व्हावी म्हणून ही प्रचंड प्रमाणावरील मानवी हत्या होते. राष्ट्र, वंश आणि वर्ग ही आधुनिक मिथस अगर राजकीय सूत्रे, यांच्यात सुप्तपणे बसत असलेल्या वंशउच्छेदी शक्तीवर **हेलेनबाईंनी** भर दिलेला आहे.

**लोकांच्या नावाने**

लोकांच्या नावाने केलेला मानवी संहार हेच या सर्व विश्लेषणांचे व्यवच्छेदक लक्षण आहे. या राज्यांनी आणि त्यांच्या राज्यकर्त्यांनी आपल्या पाशवी कृत्यांचे आणि त्यांनी अंमलात आणलेल्या वंशउच्छेदांचे 'लोकांच्या करीता' केलेली कृत्ये असे सांगत स्वत:च्या वागणुकीचे समर्थन केलेले आहे. विसाव्या शतकातील त्या मानाने अधिक नेमस्त आधुनिक तत्वप्रणालीपेक्षा ती राज्ये वंशउच्छेदाबाबत तरी अजिबात वेगळी नव्हती, याचे कारण विसावे शतक हे जनतेचे युग आहे. उदा. गेल्या ऐंशी वर्षात वेगवेगळ्या राजवटी होत्या. या राजवटी अनेक स्थित्यंतरातून गेल्या आहेत. वायमार प्रत्यासत्ताक ते नात्झी तानाशाही ते कम्युनिस्ट तानाशाही अशी ती स्थित्यंतरे आहेत. (जर्मन संघराज्य ते जनतेचे प्रजासत्ताक DDR TO THE BUNDESREPUBLIK या सर्व राजवटीतली न्यायालयेही वेगवेगळ्या स्थित्यंतरातून गेली. पण त्या सर्व न्यायालयांनी IN NAMEN DES VOLKES 'लोकांच्या तर्फे' याच सूत्राचा वापर करून आपले निकाल वाचून दाखविले होते. अमेरीकन न्यायालये, आणखी एक वेगळे सूत्र पसंत करतात. पण त्याचा आशय तोच आहे. उदा. 'क्ष विरुद्ध जनता या दाव्यात'. वंशउच्छेदी राजवटी अशा प्रकारे 'लोकांचे' नांव घेऊन आपण जे काही करीत आहोत ते वैध आहे असा दावा करतात. असे करताना खऱ्याखुऱ्या आधुनिकत्वाचे निशाण ज्यांच्या खांद्यावर आहे, अशा प्रकारची दाद ज्या चळवळींना मिळालेली आहे, त्यांच्याशी आपले कौटुंबिक स्वरूपाचे नाते आहे व तो आपला हक्कच आहे असे त्या बजावित असतात. एवंच वंशउच्छेदी विचार, भावना प्रवृत्ती, त्यांच्या करीता म्हणून करण्यात येणाऱ्या कृती, व ती एकंदर प्रक्रिया ही 'लोकशाहीची काळी बाजू' आहे अशा स्वरूपात त्याकडे पाहिले जावे असे या लेखाचे प्रतिपादन आहे.

तथापि हा दृष्टीकोन शिष्टसंमत नाही. ' लोकशाही शांतता' या विचारधारेचे विद्यमान काळी प्रभुत्व आहे. या विचारधारेने असे जाहीर केले आहे की, लोकशाही राज्यव्यवस्था ही आवश्यकपणे शांततावादी असते. ती व्यवस्था युद्धाच्या भानगडीत क्वचितच पडते. लोकशाही मानणारी दोन राष्ट्रे युद्ध कधीही करीत नाहीत. 'वंशउच्छेद' या विषयासंबंधी जे संशोधन व अभ्यास होत होत आहेत त्यात 'लोकशाहीवादी शांतता' या विचारधारेचे प्रमुख प्रतिनिधी **रूडाल्फ रूम्मेल** (RUDOLPH RUMMEL). या विचारवंताचा दावा असा आहे की, एखादे राज्य हे जितके अधिक सर्वंकष सत्तावादी /तानाशाहीवादी असेल ते तितके अधिक प्रमाणात वंशउच्छेद करण्याची शक्यता अधिक. आपल्या या सूत्राच्या समर्थनार्थ त्यांनी विसाव्या शतकातील अनेक देशातील वंशउच्छेदाबाबत आकडेवारी पेश केली आहे. त्यांचा आधार घेऊन **पं. रूम्मेल** असा निष्कर्ष काढतात की लोकशाही राज्यव्यवस्थेत वंशउच्छेद हा प्रकार जवळजवळ घडलेलाच नाही. अर्थात ते हे मान्य करतात की अगदी काही थोड्या लोकशाहीत वंशउच्छेद जरुर झालेला आहे. परंतु हे प्रकार युद्धकाळात घडले. युद्धकाळात प्रचंड प्रमाणावरील मानवी हत्येचे संकल्प व त्यांची अंमलबजावणी ही अत्यंत गुप्तपणे केली जात होती; म्हणजेच ही अघोरी कृत्ये, आमजनतेचा थोडक्यात लोकशाहीचा पाठिंबा नसताना घडली होती. थोडक्यात या अशा घटना, आपण प्रतिपादन केलेल्या नियमाविरुद्ध असणाऱ्या अपवादादाखल घटना असल्याकारणाने, आपण आपल्या संशोधनाच्या मदतीने बसविलेला नियम सिद्ध होतो, असे **पं. रूम्मेल** यांचे प्रतिपादन आहे. व्हिएटनाम युद्ध चालू असताना माय लाय (MY LAI) या नावाने कुविख्यात असलेली त्या मानाने छोटी मानवी कत्तल. प्रथम अमेरिकेत हे प्रकरण दडपून टाकण्यात आले होते. पण जेव्हा ते प्रकाशात आले, तेव्हा अमेरिकन लोकशाहीने त्या कत्तलीचा निषेध केला आणि ती कत्तल करणारावर खटलेही भरले. 'माय लाय' सारख्या घटना लक्षात घेता. **पं. रूम्मेल** यांच्या प्रतिपादनात काही गैर नाही हे खरे परंतु **पं. रूम्मेल** मायलाय कत्तलीपेक्षाही प्रचंड मोठ्या प्रमाणात होणाऱ्या मानवी कत्तली, लोकशाही राजवटीतही झालेल्या आहेत, याची दखल ते घेताना दिसत नाहीत. उदा. ड्रेस्डेन आणि टोकिओ या शहरावर झालेला अग्निगोल वर्षाव या लोकशाहीवादी प्रणित प्रचंड कत्तली आणि मायलाय सारख्याछोट्या कत्तली यात **पं. रूम्मेल** फरकच करीत नाहीत. इतकेच नव्हे तर प्रचंड मानवी कत्तलीत मृत पावलेल्या लोकांची संख्या कमीत कमी करून दाखविण्याकडे त्यांचा कल आहे. ड्रेस्डेन, टोकीओ शहरावरील अणूबॉम्ब फेक आणि व्हिएटनाम मधील ग्रामिण भागात करण्यात आलेला नापलाम सारख्या प्रखर बॉम्बचा वर्षाव. हे निर्णय सैनिकी गुप्ततेच्या नावाखाली जनतेपासून लपवून ठेवलेले होते, हे अर्थातच उघड आहे. परंतु असे असले तरी अमेरीकन आणि ब्रिटीश सरकारांनी हे निर्णय लोकशाहीवादी घटनात्मक प्रक्रियांच्या आधारानेच घेतलेले होते याचा विसर पडू देता नये. या शिवाय युद्धकाळात जेथे हुकुमशाही होती त्या देशातील सरकारांनी 'वंशउच्छेद' करण्याचे निर्णय घेऊन, मानवी कत्तली केल्या होत्या आणि त्या

गुप्त राहतील असा प्रयत्नही केला होता. हिटलरने घडवून आणलेले सर्व खून युद्ध काळातच केलेले होते व त्याची वाच्यताही होऊ दिली नव्हती. लालनिशाणी लोक, त्यांचे सहप्रवासी व **पंडित नेहरू** यांना प्रिय असलेल्या स्टॅलीननेही तेच व तसेच केले होते, **पं. रूम्मेल** हा जो सिद्धांत मांडीत आहेत, त्याला वर उल्लेखिलेल्या कत्तलीपेक्षाही अधिक प्रचंड प्रमाणात झालेल्या मानवी कत्तलीच्या उदाहरणांनी छेद जातो. या साऱ्या वंशउच्छेदक स्वरूपाच्या मानवी कत्तली सतरावे शतक ते विसाव्या शतकाची पहिली काही दशके यात झाल्या होत्या. घटना असलेल्या व त्यानुसार राज्य करतो असा दावा करणाऱ्या सरकारांचे नागरीक असलेल्या युरोपियन वसाहतवाद्यांनी या कत्तली केल्या होत्या, **पं. रूम्मेल** या कत्तलीचा उल्लेख करतात हे खरे आहे. परंतु तो उल्लेख करताना अगदी मोहक शब्दात व कत्तलीत बळी पडलेल्या लोकांची संख्या विश्वास बसू नये इतकी कमी करून सांगतात. ते असेही अस्पष्टपणे सुचवितात की तत्कालिन 'सरकारे' ही या कत्तलीस एखादवेळ जबाबदार असतीलही. परंतु असे सांगताना त्या मानवी कत्तलीबद्दल ते स्पष्टीकरण देत नाहीत. वस्तुस्थिती अशी आहे की, इतक्या प्रचंड प्रमाणावर लोकांचा खून करण्यास एखादी राजवटी कां प्रवृत्त होते, याचे स्पष्टीकरण **पं. रूम्मेल** कधीही देत नाहीत. सरतेशेवटी एक मुद्दा. इतिहास काळात होऊन गेलेल्या सर्वच राजवटी सर्वंकष सत्ता हाती असलेल्या हुकुमशाही राजवटी होत्या, पण त्या सर्वच राजवटींनी प्रचंड प्रमाणात मानवी कत्तल केलेली नाही हे या ठिकाणी ध्यानात घेतले पाहिजे. या नंतर या लेखात असे प्रतिपादन करण्यात येणार आहे की लोकशाही आणि वंशउच्छेद यात संबंध आहे. परंतु **पं. रूम्मेल** मान्य करतात त्यापेक्षा तो अधिक गुंतागुंतीचा व दुधारी आहे.

**राबर्ट मेलसन** यांनी REVOLUTION AND GENOCIDE (क्रांती आणि वंशउच्छेद) या ग्रंथात आणखी एक वेगळेच स्पष्टीकरण दिलेले आहे. क्रांती पाठोपाठ युद्धे येतात व त्यातून वंशउच्छेद उद्‌भवतो, अशा प्रकारचे स्पष्टीकरण ते देतात. अगोदर अधिकारावर असलेल्या जुन्या राजवटीच्या संस्थात्मक आणि नैतिक अशा प्रतिबंधांना क्रांतीकडून सुरूंग लावला जातो. अशा प्रकारे समाजात पोकळी निर्माण होते. 'लोक' या मिथचे नांव घेऊन, त्या क्रांतिद्वारा समाजात आमुलाग्र परिवर्तन घडवून आणू पहाणारे क्रांतीकारी, त्या क्रांतीतून वर येतात. 'लोक' म्हणजे नेमके कोण याची व्याख्या करणे व त्याची व्याप्ती सिमित करणे मग आवश्यक होऊन बसते. याचा परिणाम असा होतो की वेळप्रसंगी हिंसक मार्गाचा अवलंब करून विरोधकांना 'लोक' या संज्ञेतून वगळण्यात येते. या पुढे जाऊन ते क्रांतीकारी सांगतात की युद्धामुळे प्रस्थापित सरकारमध्ये आपण कमकुवत आहोत अथवा आपला पराजय होणारच नाही ही भावना वाढीस लागते. असे झाले म्हणजे मग राज्याच्या स्वातंत्र्याचे व सार्वभौमत्वाचे रक्षण करण्यासाठी अधिक 'जहाल' अशी पर्यायी धोरणे अंमलात आणण्यास मुभा मिळते. आपल्या राजवटीचे विरोधक हे आपल्या कट्टर विरोध-कांशी संगनमत करून असल्याने आपण त्यांना ठार मारणे हे वैध आहे, अशी स्वत:ची

समजूत या राजवटी क्रांती आणि युद्ध या दोन गोष्टी एकत्र आल्या म्हणजे करून घेतात. परंतु **मेल्सन** यांनी हे प्रतिपादन करीत असताना हे नमूद करण्याची काळजी घेतली आहे की क्रांती आणि युद्ध एकत्र आले म्हणजे हाच परिणाम होणे आवश्यक आहे असे नाही. उदा. क्युबा या ठिकाणी क्रांती/युद्ध हे आवर्तन होते, पण त्याची परिणती मानवी हत्येत झाली नाही. फक्त जी बुर्झ्वा वर्गातील मंडळी होती, त्यांना देशाबाहेर घालवून देण्यात आले. **मेल्सन** हेही मान्य करतात की पूर्वी झालेल्या क्रांत्या उदा. – इंग्लंड, अमेरिका आणि फ्रान्स या देशातील क्रांत्या या ठिकाणी देखील क्रांती/युद्ध हे आवर्तन होते. परंतु त्या क्रांत्यानंतर जशी इतर ठिकाणी वंशउच्छेदी मानवी कत्तल झाली, तशी या ठिकाणी झाली नाही. परंतु ते हे सारे एकीकडे मान्य करीत असले तरी तसे का घडले याबद्दल ते चांगले स्पष्टीकरण देत नाहीत. सरते शेवटी आणखी एका मुद्याची, **मेल्सन** यांनी मांडलेल्या उत्पत्तीबाबत नोंद घेतली पाहिजे. **मेल्सन** हे राष्ट्र, वंश आणि वर्ग यांच्या तत्वप्रणालीतील वाढीची नोंद घेत नाहीत. ही नोंद घेणे आवश्यक आहे याचे कारण या तत्त्वप्रणाली वंशउच्छेदी मानवी कत्तल ही वैध आहे हे ठरविण्यासाठी वापरण्यात आल्या होत्या. शिवाय या तत्वप्रणाली युद्ध असो वा नसो, क्रांती होवो वा न होवो - थोडक्यात या आधुनिक काळात मुसंडी मारून पुढे आल्या आहेत.

**रूम्मेल** आणि **मेल्सन** या मान्यवर अभ्यासकांच्या प्रतिपादनावर हे आक्षेप घेता येत असले तरी त्या दोघांनी, त्यातही विषेश करून **मेल्सन** यांनी आपणास या प्रश्नात अंर्तदृष्टी (INSIGHTS) प्राप्त करून दिली आहे. परंतु त्या दोघांचे प्रतिपादन आणखी पुढे जात नाही हीच त्याबद्दल तक्रार आहे. तत्वप्रणालीने वैध ठरविलेल्या आणि प्रस्थापित राज्यव्यवस्थे करवी प्रत्यक्ष कृतीत उतरविलेल्या वंशउच्छेदी मानवी कत्तलींचा झालेला विस्तार आपणास समजावून घेण्याची इच्छा असेल तर मग आपण त्या प्रवृत्तीची निर्मिती का होते हे जाणून घेतले पाहिजे. आधुनिकीकरण झालेल्या पाश्चिमात्त्यांना जी संस्था सर्वात अधिक पवित्र वाटते- ती संस्था म्हणजे – लोकशाही. तिने निर्माण केलेली ही विकृती आहे. राजकीय दृष्ट्या वैध काय किंवा काय नाही, हे 'लोकच' ठरवितात हा जो आधुनिक रिवाज आहे, त्याचा अत्यंत पराकोटीची नको असलेल्या हा परिणाम- हीच ती लोकशाहीची काळी बाजू म्हणजे या वंशउच्छेदी मानवी कत्तली-याकडे देखिल आपणास अगदी दोन भिन्न दृष्टीकोनातून पहाता येईल.

### 'लोक' आणि त्यांचे दुसरे

आपण 'लोक' म्हणजे कोण या संबंधात जे अगदी पुरातन वक्तव्य आहे त्याकडे लक्ष टाकून 'लोक' या मिथला सामोरे जाऊ या.

*'आम्ही युनायटेड स्टेटसचे 'लोक' एक अधिक परिपूर्ण संघ निर्माण करण्यासाठी न्यायाचे राज्य प्रस्थापित करण्यासाठी, आपल्या रहात्या प्रदेशात शांतता कायम राहील याची खात्री करून घेण्यासाठी, समान संरक्षणाची तरतूद करण्यासाठी, सर्वसामान्य कल्याणाचा*



अनुक्रमणिका

*पुरस्कार करण्यासाठी आणि आम्ही स्वत:लाच आणि आमच्यानंतर येणाऱ्या भावी पिढ्यांनाही स्वातंत्र्याचे आशीर्वाद मिळतील हे नक्की करण्यासाठी युनायटेड स्टेटस ऑफ अमेरीकेची घटना प्रस्थापित करीत आहोत असे विधिपूर्वक जाहीर करावे.'*

अमेरीकन घटनेची ही नांदी आहे- त्यात 'लोक' याचे जे वर्णन करण्यात आले होते, त्याचा जगात फारच प्रचंड प्रभाव पडलेला आहे. या वर्णनाने जवळ जवळ सर्वच आधुनिक राज्ये वैध ठरलेली आहेत. त्याच प्रमाणे 'लोक' हा एक चांगला व नैतिकता असलेला समूह आहे असे कोठलाही संदेह मनात न ठेवता जगात सर्वत्रच मानण्यात येते. एखाद्या विशिष्ट भूप्रदेशातील लोकसंख्येतील जनतेकडे सार्वभौमत्व व नैतिकदृष्ट्या वैध व अवैध काय हे ठरविण्याची सत्ता सूपूर्द केली की त्याच्या पाठोपाठ दोन प्रश्न उपस्थित होतात. **(एक)** हा जो 'लोक' हा समूह आहे. तो समान, विशिष्ट व सदाचारी अशी प्रकृतीची वैशिष्टे असलेला समूह आहे. ही प्रकृतीची वैशिष्ट्ये एथनिक आणि/अगर राजकीय असतीलही. जे कोणी (आपल्या) देशाचे नागरीकत्व प्राप्त झालेले नसतील व आपल्या देशाचे नागरीकत्व प्राप्त होण्यास जे कोणी कायदेशिरदृष्ट्या लायक नसतील, अशा पासून आपण वेगळे आहोत हे या वैशिष्टामुळे दाखवून दिले जाते. 'आम्ही विशिष्ट 'लोक' यामुळे, परका 'दुसरा' अशा तऱ्हेच्या भावनेची निर्मिती होते. **(दोन)** एखाद्या विशिष्ट भूप्रदेशावरील सत्ता म्हणजे सार्वभौमत्व असे जर आपण समजणार असलो ...... आधुनिक राज्यांचे हे सर्वसाधारण वैशिष्ट्य आहे.... तर मग या भूप्रदेशात राहणाऱ्या लोकांतून या दुसऱ्यांना अगदी शारिरीक दृष्ट्या वगळण्यात आले तरी चालण्यासारखे आहे.

तथापि 'मिथ' या संज्ञेचा शक्य कोटीतला असा आणखीही काही गाभितार्थ आहे. त्याचा जर आपण पाठपुरावा करणार असलो, तर त्यातही आपणास दोन प्रकारची वैशिष्टे अलग करणे आवश्यक ठरेल. **एक.** लोकशाही राज्य / समाज व्यवस्थेत दोन वेगवेगळ्या प्रकारचे लोक अनुस्यूत आहेत. एक सामाजिक **स्तरीकरण** असलेले व दुसरे त्या देशातील धरतीपुत्र (ORGANIC) आता हे दोन्ही गट आपल्यापैकी जो नव्हे तो परका - हा तो 'दुसरा' आहे अशी संकल्पना करतात व ती पूर्णपणे ग्राह्य मानतात. असे असले तरी 'देशाच्या धरतीपुत्रांकडून (ORGANIC) एरवी ज्या व्यक्ती नागरिक समजल्या गेल्या असत्या, त्यातील अनेक व्यक्तींना वगळल्या जाण्याचा संभव असतो. यातून अनेक पर्याय निर्माण होतात. समजा या राष्ट्राच्या चतु:सिमात रहाणाऱ्या लोकात अंतर्गतपणे **स्तरीकरण** झालेले आहे. असे असले तर या राष्ट्रात / लोकात एकमेकाशी स्पर्धा करणारे, विशिष्ट हितसंबंध असलेले जे गट असतील त्यांच्यात आपआपसात सामंजस्य निर्माण करणे आणि त्यांच्यात मध्यस्थी करणे हेच त्या राज्याचे प्रधान कार्य असते. हे कार्य अंगभूतपणे करणारे जे राज्य असेल, ते आपले जे नागरिक आहेत, त्यांच्यातील भिन्नत्व कायम राहील असे पहातात. म्हणूनच या अशा राज्यातील नागरिकास नैतिक व राजकीय शुद्धीकरण करण्यासाठी प्रोत्साहन मिळणे हे त्या मानाने असंभवनिय. तथापी आपण 'लोक' अथवा राष्ट्र हे धरतीपुत्र

आहोत अशी कल्पना केली, शिवाय (AMERICAN CREED) अमेरिकन जीवन तत्त्वज्ञानाला अभिप्रेत असल्याप्रमाणे हे लोक / राष्ट्र हे अतूट असे परिपूर्ण मिलन असेल तर त्याचा परिणाम त्या दुसऱ्यांना बाहेर ठेवण्यात होतो, याचे कारण काही नेते आणि चळवळी यांना आपल्या देशातील लोकांची व राष्ट्राची 'शुद्धता' कशी वाढेल याबाबत प्रयत्न करण्याचा मोह होतो. यासाठी, आपल्या लोकात गणल्या जाणाऱ्यांतील या प्रत्यक्ष जगात असणारी भिन्नता त्यांना दडपून टाकावी लागते. आता हे खरेच आहे की ज्या अनेक आधुनिक राजवटी या आपण लोकशाही राजवटी आहोत असा दावा करतात, त्या सर्वांनीच एथनिक आणि राजकीय शुद्धीकरणाच्या रोखाने अगदी लक्षणिय अशी प्रवृत्ती प्रकट केली आहे.

**दोन.** शुद्धीकरणाचे वेगवेगळे प्रकार आणि त्यांच्या पातळ्यात यात फरक केला पाहिजे. त्याजबरोबर आपण हे स्पष्टपणे नमूद केले पाहिजे की, यातील बहुतेक 'शुद्धीकरणे' ही वंशउच्छेदाच्या जवळपासही पोचत नाहीत. या शुद्धीकरणात जो प्रकार अगदी मवाळ समजला जाईल, तोच प्रकार सर्वसामान्यपणे आढळतो. या शुद्धीकरणातही तीन प्रकार सर्वसामान्यपणे आहेत असे दिसते. (१) मुख्य प्रवाहात सामिल होण्यास प्रोत्साहन, देश सोडून जाण्यास प्रोत्साहन आणि इतर देशात असलेले 'आपले लोक' देशांतर करून, आपल्या देशात यावेत यासाठी प्रोत्साहन. या सर्व प्रकारात सामान्यपणे दडपशाही अंतर्भूत नसते. यातील सामिल होण्यास प्रोत्साहन हा जो प्रकार आहे, त्या जे कोणी 'दुसरे' असतात, ते मुख्य प्रवाहातील प्रभुत्व गाजविणाऱ्या गटात ते स्वेच्छा सामिल होण्याची इच्छा प्रदर्शित करतात. अमेरीकेत स्थलांतर करून जे लोक आजवर जेथे गेले आहेत त्यांचे 'शुद्धीकरण', याच प्रकारचे 'शुद्धीकरण' वापरून करून घेण्यात आले. आर्थिक यश मिळविणे आणि अगोदरच बहुसंख्य असलेल्या समाजाबरोबर जुळवून घेण्याचा हे स्थलांतर करून आलेले 'दुसरे' प्रयत्न करीत असताना आपले स्वतःचे सांस्कृतिक व सामाजिक वेगळेपणाचे भान बहुतांशाने गमावून बसले. हे एकीकडे होत असताना ते अमेरीकन बनले होते. शुद्धीकरणाचा हा प्रकार त्या मानाने कोणाला इजा पोचविणारा नव्हता. परंपरागत संस्कृती टिकवूनच धरली

पाहिजे असे मानणारे जे कोणी असतील ते या प्रकारच्या शुद्धीकरणाबद्दल खेद व्यक्त करतील. 'आपले लोक' आज जे परक्या देशात आहेत, त्यांनी स्थलांतर करून 'आपल्या देशात' यावे यासाठी देण्यात येणारे प्रोत्साहन हा जो 'शुद्धीकरणा'चा प्रकार आहे, तो प्रकार अनेक योजनांच्या द्वारा अंमलात येतो. एखाद्या देशात जो गट प्रभावी आहे, त्या गटासारखी संस्कृती असलेले जे परक्या देशात 'आपले लोक' आहेत त्यांनी स्थलांतर करून यावे यासाठी प्रलोभने दाखविण्यात येतात. अर्थात या प्रकारच्या सवलती जे 'आपले लोक' नसतात त्यांना देण्यात येत नाहीत. उलट त्यांनी आपल्या देशात स्थलांतर करून येऊन नये, म्हणून त्यांना प्रतिबंध करण्यात येतो. 'गौरवर्णिय ऑस्ट्रेलिया' हे या संबंधातील एक प्रमुख उदाहरण. बाहेरच्या देशातील गौरवर्णिय नसलेल्या लोकांनी ऑस्ट्रेलियात स्थलांतर

करून येऊ नये या उद्देशाने हे धोरण अगदी परवापरवा पर्यंत जारी होते. देश सोडून जाण्यास प्रोत्साहन हा जो शुद्धीकरणाचा तिसरा प्रकार आहे त्याचा वापर करण्याकडे उजव्या राष्ट्रवाद्यांचा प्रयत्न असतो. युरोप, अमेरीकेमध्ये राष्ट्रवादी आघाडी अशा प्रकारचे नाव घेतलेले अलीकडेच स्थापन झालेले जे पक्ष आहेत, ते अशा प्रकारचे राष्ट्रीय धोरण असले पाहिजे असा घोषा लावतात. पण हे धोरण सामान्यपणे अमलातच येत नाही. पण यदाकदाचित ते अमलात आले, तर अर्थातच ते दडपशाही करूनच अमलात येते.

शुद्धीकरण या प्रक्रियेत सुरुवातीला वाढ होते ती प्रथमत: 'सक्तीच्या सामिलीकरणाद्वारा! ही वाढ होण्यासाठी अनेक धोरणे अमलात आणावी लागतात. **(एक)** देशात प्रभुत्व गाजविणारा गट 'दुसऱ्यांनी' आपल्या गटात सामिल व्हावे यासाठी हुकुमवजा आवाहन करतो. **(दोन)** त्या दुसऱ्यांनी 'आपल्या जुन्या अस्मिते'चा त्याग करण्यास प्रोत्साहन मिळावे यासाठी देशात संस्था निर्माण करण्यात येतात. **(तीन)** या संस्थाद्वारा त्या 'दुसऱ्यांवर' सक्ती करण्यात येते. उदा. 'दुसऱ्यांच्या' मातृभाषेला शाळेतून व सरकारी कचेऱ्यातून हद्दपार करण्यात येते. (शाळेत व सरकारी कचेऱ्यात कोणत्याही त्या 'दुसऱ्यां'च्या मातृभाषेचा वापर करण्याबाबत सक्तीने बंदी करण्यात येते. हे सारेच अरूचीचे आहे हे खरे आहे. पण या 'शुद्धीकरण' प्रकारात होणाऱ्या दडपशाहीमुळे कोणाला शारिरीक ईजा होत नाही. यदाकदाचित झाली तर त्याचे प्रमाण फारच अल्प असते. कोणालाही देशातून हद्दपार करत नाहीत, अगर कोणाचाही खून करण्यात येत नाही. दुसऱ्या गटात मोडणाऱ्या फारच थोड्या लोकांविरुद्ध, एक प्रकारच्या विशिष्ट मध्यम दर्जाच्या हिंसेचा सामान्यपणे वापर करण्यात येतो. उदा. जीवशास्त्रीय सामिलीकरण (BIOLOGICAL ASSIMILATION) या 'उपायां'च्य द्वारे अल्पसंख्याकाची वाढच होणार नाही यासाठी प्रतिबंधक उपाय वापरण्यात येतात. उदा. विवाहावर बंदी घालणारे कायदे करण्यात येतात, पराकोटीला जाऊन, अल्पसंख्यांकाची खच्ची करण्यात येते. या सर्व प्रकारची दडपशाही ज्या गटावर होते, ते सर्व या अशा दबावाला अर्थातच विरोध करतात. 'देशत्याग' करण्याचा पर्याय स्वेच्छा (!) पत्करून हा विरोध प्रकट होतो. परंतु त्यामुळे 'शुद्धीकरण' ही प्रक्रिया आणखी पुढे जाते. दडपशाहीची या नंतरची म्हणजे या 'दुसऱ्या'स सन्मार्गाने देशत्याग करावयास भाग पाडणे. आपल्या प्रभुत्वाखालील देशातून दंडसत्तेचा वापर करून, तिच्या दबावाखाली त्या सर्व 'दुसऱ्यां'ना देशातून बाहेर घालवून देण्यात येते. त्या 'दुसऱ्यांचा शारिरीक छळ करणे, त्यांची मालमत्ता जप्त करणे, आणि अशाच अन्य मार्गाचा अंतर्भाव दंडसत्ता आपल्या या 'दुसरे' हटाव या मोहीमेत करते. अशा प्रकारे त्या 'दुसऱ्यां'ना आपल्या रहात्या ठिकाणी जीवन कंठणे दुष्कर केले जाते. दडपशाहीची यानंतरची पायरी त्या 'दुसऱ्यां'ना देशातून हद्दपार (deportantion) करणे. या नंतरची पायरी खुनाद्वारे 'शुद्धीकरण' याचा अर्थ त्या दुसऱ्यांचा अगदी पद्धतशीरपणे खून करण्यात येतो. त्यासाठी आवश्यक असलेले संघटन उभारण्यात येते. हे अशा प्रकारे संघटीतपणे खून होऊ लागले म्हणजे मग त्याची परिणती ह्या 'दुसऱ्यां'नी अशा

प्रकारच्या 'खुषीच्या सक्तीमुळे' स्वतःहून देहत्याग करण्यात होते. अगदी फारच थोड्या वेळी दडपशाही 'वंशउच्छेद' ही शेवटची पायरी गाठतो. 'वंश-उच्छेद' या शब्दाचा अर्थ देशातील लोकसंख्येतील एका विशिष्ट गटाची, अगदी पद्धतशीरपणे या जगाबाहेर रवानगी करणे. या विसाव्या शतकाच्या अगोदरच्या शतकात 'वंशउच्छेद' हा फारच क्वचित वापरण्यात येणारा मार्ग होता.

आता ही जी दडपशाहीची वर्गवारी करण्यात आलेली आहे ती अर्थातच एक 'आदर्श' (Ideal Type) या स्वरूपाची आहे. प्रत्यक्षात त्या 'दुसऱ्यावर' टाकण्यात येणाऱ्या बहुतेक दबावांचे स्वरूप हे काहीसे भिन्न असते. उदा. इतिहासकाळी 'ज्यूं'च्या विरुद्ध करण्यात आलेल्या मोहीमेत सर्वसामान्यपणे हिंसा, लुटालुट, बलात्कार सक्तीने घडवून आणलेले धर्मांतर आणि कधीतरी वेळप्रसंगी खून, इत्यादी मार्गांचा अंतर्भाव होता. या अशा दडपशाहीला, अत्याचाराला, आणि खुनाला प्रोत्साहन व चालना देणारे लोक 'ज्यूं'चे समाजातून पूर्णतः उच्चाटन झालेच पाहिजे हे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवूनच असले कार्यक्रम प्रत्यक्ष कार्यवाहीत आणीत असत. ही दडपशाही करणारांना राजकीय सत्ताधाऱ्यांकडून निश्चितपणे प्रोत्साहन मिळत असे. 'परंतु' 'ज्यूं'ना संपूर्णतः नष्ट करणे हे उद्दिष्ट परवडणारे नव्हते, याचे कारण 'ज्यू' हे तसे फारच उपयोगी होते. 'शुद्धीकरणे' ही सर्वसामान्यपणे अविचितपणे उद्भवतात. एकदा सुरुवात केली की मग शुद्धीकरण हळूहळू विराम पावत असे. अथवा या शुद्धीकरणामुळे समाजात जबरदस्त प्रतिक्रीया प्रकट होत असे. सुदैवाने शुद्धीकरण या प्रक्रियेचा अटळपणे होणारा शेवट म्हणजे वंश-उच्छेद असे नाही. वंश-उच्छेद ही गोष्ट शुद्धीकरणापासून तशी फार दूर आहे. सरतेशेवटी आणखी एक मुद्दा नमूद करणे आवश्यक आहे. ही दडपशाहीची धोरणे ही एखाद्या एथनिक गटाविरुद्धच प्रत्यक्षपणे असतात. ते त्याचे सर्वसामान्य स्वरूप आहे. याचा अर्थ असा नाही की एखाद्या राजकीय विरोधकांच्या गटाविरुद्ध अगर एखाद्या धार्मिक गटाविरुद्ध त्यांचा उपयोग करण्यात येत असे नाही. त्यांच्या विरुद्धही अर्थातच त्यांचा वापर होतो. यापैकी राजकीय शुद्धीकरण हे त्या मानाने अर्थातच सौम्य असते. या उलट एथनिक शुद्धीकरणे ही पराकोटीची भयावह अशी आहेत. आधुनिक शुद्धीकरणाच्या मुख्य प्रकारांचे स्वरूप काय असते याची तपासणी करणे हे उद्बोधक ठरेल.

**उदारमतवादी लोकशाही आणि तिची काळी बाजू**

उदारमतवादाच्या वृत्तांतात सामान्यपणे बुर्झ्वा व्यक्तिवादावर भर दिलेला असतो. उदारमतवादी – लोकशाही या शांततावादी असतात असे म्हटले जाते. प्रत्येक व्यक्तिच्या मानवी हक्काचे संरक्षण करणे हे उदारमतवादी घटनांचे पहिले आणि अत्यंत महत्त्वाचे उद्दिष्ट असते. त्या शांततावादी असण्याचे ते कारण आहे असे सांगितले जाते. या लेखात एक वेगळाच दृष्टीकोन मांडलेला आहे. ह्या दृष्टीकोनानुसार सामाजिक गट, विशेषतः समाजातील वर्ग यांना एकाकी व्यक्तिपेक्षाही उदारमतवादात मध्यवर्ती स्थान आहे. पराकोटीच्या

उदारमतवादी लोकशाहीला आपल्यात समाविष्ट असलेल्या लोकसंख्येच्या गाभ्यात समाविष्ट असलेल्या व्यक्तिंना, शुद्धीकरणाला अभिप्रेत असलेल्या अत्याचार, जुलुम, जबरदस्ती पासून कोणी रोखले असेल, तर वर्ग संघर्ष आणि त्या संघर्षाला सामाजिक संस्थेचे स्वरूप प्राप्त होणे या घटनांनी. व्यक्तिच्या मानवी हक्काबद्दल सारतत्वरूपी आदर असणे, या गोष्टीने याबाबतचे जे कार्य केले असेल, त्यापेक्षा वर्ग संघर्ष आणि त्याला प्राप्त झालेले संस्थात्मक स्वरूप, या दोघांनी कितीतरी अधिक प्रमाणात कार्य केलेले आहे. ते काहीही असो; इतके असूनही उदारमतवादी लोकशाह्यांनी प्रचंड प्रमाणावर शुद्धीकरण करणे, हा गुन्हा केलेला आहे. वेळ प्रसंगी या अशा शुद्धीकरणाचे रूपांतर वंशउच्छेदनातही झालेले आहे. वसाहतवादाच्या संदर्भात फार मोठे सामाजिक गट हे लोकशाहीतील 'लोक' या संकल्पनेबाहेर आहेत असेच त्या संकल्पनेविषयीच्या व्याख्येने ठरविले जाते. दोन उदारमतवादी उदाहरणे क्रमाक्रमाने या संदर्भात विचारात घेऊ या,

हे जे कोणी 'लोक' आहेत त्यांनी अमेरीकरन घटना प्रस्थापित केली व तिला आशिर्वाद दिला असे प्रत्यक्षात खरोखरीच घडलेले नाही. अमेरीकन राज्यघटना ही मध्यम वयाच्या पंचावन्न व्यक्तिंचे कर्तृत्व आहे. हे पंचावन्न गौरवर्णिय होते. सामाजिक स्थान आणि मिळकत या दोन्हीबाबत त्यांचे स्थान अत्यंत उच्च श्रेणीत होते. हे असे गौरवर्णिय सद्गृहस्थ फिलाडेल्फिया या अमेरिकेतील शहरात एकत्र आले, त्यांनी चर्चा केली व त्यातून विद्यमान अमेरीकन घटना सिद्ध झाली. परंतु अमेरीकन घटनेचे जे संस्थापक होते (Founding Fathers) होते. त्यांच्या मनात 'आम्ही लोक' यातील 'आम्ही'त स्त्रिया, गुलाम आणि स्थानिक रेडइंडीयन जमाती यांचा समावेश व्हावा असे कधीही नव्हते. या पंचावन्न पैकी अनेकांच्या मनात ज्या गौरवर्णियांकडे जमिन-जुमला वा इतर स्थावर मालमत्ता नाही यांपैकी कोणाचाही अंतर्भाव व्हावा असे नव्हते. थोडक्यात तळागाळातील लोकांना, त्या पंचावन्न सद्गृहस्थांना आम्ही 'लोक' या संज्ञेतून वगळण्याची मनिषा होती. याच काळात जे ब्रिटीश राजकारणी होते, ते 'लोक' आणि 'जनता' या दोन संज्ञात फरक करून अधिक स्पष्टपणे विचार करीत आणि तसे ते सांगतही होते. 'जनता' या संकल्पनेत तळागाळातील लोक, जमाव, झुंड, यांचा समावेश होता.हे असे नागरीक 'आम्ही लोक' या संकल्पनेचा भाग नाहीत हे त्यांच्यामते अगदी ठामपणे स्पष्ट होते. 'आम्ही लोक' मध्ये फक्त मालमत्ता असलेले नागरीक समाविष्ट होते. या नागरीकांचे नामकरणही 'हितसंबंधी' असे करण्यात आले होते. या अशा नागरीकात सभ्यलोक (जंटलमेन) व्यापारी, कारखानदार, शिल्पि, कारागिर इत्यादींचा समावेश होता. यांच्यात 'हितसंबंधाचे' हित हे परस्परापासून अगदी भिन्न भिन्न आहे हेही मान्य करण्यात आले होते. परंतु असे असले तरी या मालमत्ता व शिक्षण मंडीत लोकांना 'राष्ट्रातही इतरांबरोबरच समान हितसंबंध/कर्तव्य आहे' हेही नमूद करण्यात आले होते. या अशा लोकशाहीच्या कक्षेत येणाऱ्या नागरीकांचा समुदाय हा अंतर्गतपणे, सामाजिक व आर्थिक दृष्ट्या स्तरीकरण झालेला समाज होता. तसेच घटनेत नमूद केलेल्या नागरीकांच्या

हक्कातील सर्व नव्हे परंतु काही हक्क मिळावेत अशी त्या काळच्या तळागाळातील व खालच्या वर्गातील नागरीकांची पात्रता आहे हेही मान्य करण्यात आले होते.

'आम्ही लोक' यांना त्या 'दुसऱ्या'बद्दल आपलेपणा नसण्याची जी भावना होती त्या भावनेला सामाजिक स्तरीकरणाकडून दोन मार्गांनी प्रतिबंध होत असे. या दोन्हीही मार्गांनी लोकशाही स्थापन होण्या अगोदरच्या जुन्या राजवटीतील या प्रतिबंधावाबतच्या ज्या परंपरा होत्या, त्या चालू ठेवल्या होत्या. या जुन्या राजवटीतील राज्यकर्त्यात अर्थातच संरजामदार, उमराव आणि उच्च पदस्थ व खास हक्क असलेल्या सामाजिक वर्गाचा समावेश होतो. **(एक)** उदारमतवादी लोकशाही ही अधिक सखोल व्हावी, 'आम्ही लोक' या संज्ञेची व्याप्ती विस्तृत व्हावी यासाठी जी पहिली पावले उचलण्यात आली ती वर्गिय संघर्षाच्या प्रभुत्वाखाली होती. याबाबत राजकारणात सक्रीय असणारे जे लोक होते त्यांचा वर्गसंबंधावरोबर चांगलाच परीचय होता. मतदानाचा हक्क अधिक अधिक नागरीकांना असावा या संबंधीचे जे वादविवाद व चर्चा होत होती, त्यावरही जुन्याच प्रश्नांना वरचष्मा होता. उदा. मतदाराकडे मालमत्ता 'असली पाहिजे' का? यातील 'असली पाहिजे' हे मान्य होते. पण ही मालमत्ता नेमकी किती असली पाहिजे? याबाबत एकवाक्यता होत नव्हती. कारखाने, कचेऱ्या व दुकाने यातील नोकर आणि घरगडी यांना स्वतंत्र्यपणे विचार करता येत नसल्याकारणाने अशा लोकांना मतदानाचा हक्क असावा का? अगर शासनातील वरच्या थरातील स्थाने यांना घ्यावीत का? न्यायसंस्थेत यांना स्थान असावे का? समाजातील काही वर्गांना इतरांपेक्षा अधिक मते देण्याचा अधिकार असावा का? या सर्वच प्रश्नाबावत एकमत नव्हते. समाजात अनेक वर्ग आहेत, आणि वेगवेगळ्या सामाजिक थरात असलेल्या लोकांना आपआपले हितसंबंध आहेत, ही वस्तुस्थिती केव्हाच मान्य करण्यात आलेली होती. परंतु हे हितसंबंध वा वर्ग हे समाजातून नाहीसे न करता, त्यांच्याबरोबर समझोता करण्याकडे कल होता. 'आम्ही लोक' हे एकसंघ व अभेद्य नसून त्यात अनेक प्रकारचे लोक तेही समाजातील वेगवेगळ्या थरातील आहेत हे मान्य करण्यात आले होते. एवंच सामाजिक गटांच्या वेगवेगळ्या हितसंबंधाबद्दल ते गट करीत असलेला दावा उदारमतवादाने स्वीकारला असला, तरी ते लोकशाहीचे सारतत्त्व नव्हते. व्यक्तिवाद हा खालच्या पायरीवर नेणे **हे** लोकशाहीचे सारतत्व होते. पण त्याजबरोबर समाजातील वेगवेगळे एकमेकांशी स्पर्धा करणारे हितसंबंध राजकीय पक्षांच्याद्वारा संस्थात्मक स्वरूप धारण करतात. परंतु त्या हितसंबंधांना टाळता येत नाही व त्यांना ओलांडून त्यांच्या पलीकडे जाताही येत नाही, त्यांचा पराभवही करता येत नाही. म्हणून 'राज्य' ही शासनव्यवस्था प्रामुख्याने समाजात हितसंबंधियांच्या मध्यस्ताचे काम करीत असल्याकारणाने, त्याचे अधिकार तसे मर्यादीतच असतात आणि त्या व्यवस्थेपलीकडे राज्याला स्वतःची अशी सत्ता फारच कमी असते. 'आम्ही लोक' यांना इतरांबद्दल आपलेपणाची भावना नव्हती ही जी भावना होती तिला समाजातील

स्तरीकरणाकडून दोन मार्गांनी प्रतिबंध होत असे, व तो कसा होत असतो, याबद्दलच्या पहिल्या मार्गाचा विचार येथवर झाला. आता दुसऱ्या मार्गाचा विचाराकडे वळू या.

**संघर्ष हाच लोकशाहीचा प्रमुख आधार**

उदारमतवादी राजवटीत, संघर्षाच्या बाबतीत वर्ग हाच मध्यवर्ती प्रश्न होता. त्यात थोड्याच काळानंतर वय आणि लिंग यांची भर पडली. कुटुंब प्रमुखाला सर्व हक्क असावेत का? एखाद्या कुटुंबातील पुरुष किती वयाचा झाला म्हणजे मग त्याला स्वतंत्रपणे विचार करता येतो असे मानावयाचे? यानंतर वय आणि वर्ग यात 'लिंग' विचार येऊन गुरफटले समाजातील इतर स्त्रियांपेक्षा एखाद्या विशिष्ट वर्गातील अगर कोणत्याही वर्गातील विशिष्ट वयाची स्त्री ही राजकीयदृष्ट्या जबाबदार स्त्री आहे असे समजायचे का? हा प्रश्न उपस्थित झाला. नेमक्या या ठिकाणी तो दुसरा मार्ग व त्यांची कारणे यांचा उद्भव होतो. वर्ग, वय आणि लिंग या सर्वांमुळे समाजात स्तरीकरण होते. परंतु सामान्यपणे वेगवेगळ्या समुहातील ते अलग असे गट आहेत हे स्वरूप धारण करीत नाहीत. समाजातील सर्व वर्गांना एकाच ठिकाणी जीवन व्यतित करणे, आणि एकमेकाबरोबर काम करणे हे सामाजिक व वर्गिय संघर्ष अगदी ऐन भरात असतानाही अगदी आवश्यक असते. उदा. मालक आणि कामगार या दोघांनाही दिवसातला आपला बराचसा वेळ एकमेकाबरोबर सहकार्य करूनच घालवावा लागतो. वेगवेगळ्या वयाचे स्त्री-पुरुष हे कुटुंबात एकत्रच राहतात. पण समाजातले वेगवेगळे वर्ग शहरात अलगपणे राहतात आणि दैनंदीन जीवनात ते एकमेकांपासून स्वतंत्र असतात हे खरे आहे. पण या अशा प्रकारच्या स्वातंत्र्यामुळे 'आम्ही लोक' आणि ते 'दुसरे' यांच्यात सुप्त शत्रुत्वाची जी भावना असते तिलाही मोठ्या प्रमाणात अटकाव होतो.

आधुनिक समाजाच्या विकासात वर्गसंघर्षाला नेहमीच महत्त्वाचे स्थान मिळालेले आहे. समाजात उदारमतवादी आणि लोकशाही संस्था निर्माण होण्याचे ते कारण होते. तीच गोष्ट लिंग आणि वय याबाबतच्या संघर्षासंबंधी आहे. हे सर्व गट एकमेकांबरोबर स्पर्धा करताना आप-आपल्या हितसंबंधाचे रक्षण करीत, वेळप्रसंगी त्यांना पुढे रेटीत, एकाच 'लोकात' विविक्षत गट या स्वरूपात नेहमीच राहतात. या हितसंबंधा विषयीचे संघर्ष हे वैध आहेत असे मानले जाते. उदारमतवादी आणि लोकशाही राज्यव्यवस्थेत बहुपक्षिय पद्धतीच्या द्वारा या संघर्षांना 'संस्था' हे स्वरूप प्राप्त होते. स्तरीकरण हे लोकशाहीचे सारतत्त्व आहे; उदारमतवादी स्वरूपाची लोकशाही समाजातून पिळवणूक निपटून काढण्याचा प्रयत्न करीत नसल्याकारणाने काही गटांना आपल्यावर दडपशाही होत आहे असे नेहमीच वाटणार. हे सामाजिक गट नव्या स्वरूपाची जी पिळवणूक असेल, तिच्या बरोबर संघर्ष करण्यासही नेहमीच उठाव करणार. परंतु उदारमतवादी संस्थातील वर्ग संघर्षाची सोडवणूक, आपल्या विरोधकांचे शुद्धीकरण करून करण्यात येत नाही. त्यासाठी प्रचंड प्रमाणावर मानवी हत्या करणे, या मार्गाचा अवलंबही होत नाही. एवंच भांडवलशाही ही स्वत: विशेषकरून



अनुक्रमणिका

कल्याणकारी व सौम्य पद्धतीची वर्तणूक या करता प्रसिद्ध असलेली समाजव्यवस्था नाही. परंतु भांडवलशाहीमुळे जो वर्गिय संघर्ष निर्माण होण्याची प्रवृत्ती असते त्यातूनच उदारमतवादी समन्वय निर्माण होतो.

उदारमतवादी राज्यात वर्गिय संघर्षापाठोपाठ आलेला लिंग विषय या दोघांनाही महत्त्व आहे. त्याचा अर्थ असा आहे की एथनिसिटीला युरोपमध्ये अगदी सुरुवातीच्या राजकारणात फारच कनिष्ठ दर्जाची भूमिका होती. या ठिकाणी एथनिसिटीम्हणजे एक भाषिक किंवा, तथाकथित एका वंशाचे समुदाय आहे. ब्रिटनमध्ये जे कोणी मालमत्ताधारी होते ते सारेच नागरीक समजले जात. मग ते इंग्लिश, सेल्ट वा गेलीक भाषिक असेनात. आज आश्चर्य वाटेल इतके गेलीक भाषिक त्यावेळी ब्रिटनमध्ये रहात होते. पण ते मालमत्ताधारी होते व ते ब्रिटीश नागरीक होते. धर्म हा एक जुना आस समजून त्याच्या अनुषंगाने नेहमीच स्तरीकरण होई. हा घटक नेहमीच महत्त्वाचा होता. विशेषत: युरोपमधल्या एकमेव अंतर्गत 'वसाहती' मध्ये- आयर्लंडमध्ये- तो महत्त्वाचा होता. या ठिकाणी 'सभ्यता नसलेले' (Uncivilized) कॅथलिक विरुद्ध प्रॉटेस्टँट राज्यघटना या कक्षेत ते स्तरीकरण पसरलेले होते. परंतु या कारणामुळे काही वेळा प्रचंड प्रमाणावर मानवी हत्या होत असे. तसे होते तरी विसावे शतक उजाडेपर्यंत, युरोपमध्ये अत्यंत प्रभावी असलेल्या एथनिक गट आणि धार्मिक गट यांची अशी अपेक्षा होती की त्या 'दुसऱ्यांनी' या प्रभावी गटात आपणास **सामावून** (Assimilate) घ्यावे. या अपेक्षेत संस्थात्मक स्वरूपाची दडपशाही अनुस्यूत असेलही. विशेषत: अल्पसंख्यंकाच्या भाषेबाबत. परंतु त्या 'दुसऱ्यां'ना देशाबाहेर हाकलून देण्यात आले नव्हते, मग त्यांची कत्तल करणे बाजूलाच राहीले. या 'दुसऱ्यां'ना ब्रिटीश फ्रेंच अगर जर्मन बनण्याची मूभा होती. वस्तुस्थिती अशी आहे की या कालखंडातील अत्यंत हिंसक अशा घटना युरोपच्या सीमेवर असलेले जे देश आहेत त्या ठिकाणी घडल्या. या देशात ज्या वर्गांचे शोषण होत होते, ते एथनिक सांस्कृतिक दृष्ट्या फारच क्वचित, फारच कनिष्ठ आहेत; अशी त्यांच्याबद्दल व्याख्या केली जात होती. ज्यांचे शोषण होत असे तो सांस्कृतिक दृष्ट्या तळागाळात अशी ती व्याख्या होती. जमिनदारांनी आपल्या खंडकरी शेतकऱ्यांचा अत्यंत क्रूर कत्तल करून 'शुद्धीकरण' केले होते. हायलँड क्लीअरन्स या नावाने ते ओळखले जाते. या कत्तलीमुळे या शेतकऱ्यांना अमेरिकेला (NEW WORLD) देशत्याग करून जावे लागले. सक्ती करून देशत्याग करावयास लावून 'शुद्धीकरण' यशस्वी झाल्याचे ते एक उदाहरण होते.

युरोपमध्ये उदारमतवादी राज्यांचे प्रभुत्व फक्त वायव्य (NORTH WEST) विभागात होते. या वायव्य विभागात स्कँडेनेव्हियन देश, हॉलंड, बेल्जियम, फ्रान्स, स्विझर्लंड आणि ब्रिटीश बेटे यांचा समावेश होता. या विवेचनात आपण हे नंतर पाहणारच आहोत की पश्चिम युरोप व्यतिरीक्त उर्वरीत युरोपने उदारमतवादाच्या रोखाने तितक्या सहजपणे आगेकूच केली

नाही. ते कांहीही असो. जवळ जवळ सर्वच पश्चिम युरोपमधील देशांच्या वसाहती होत्या. हे अधोरेखित करण्याचे कारण, या उदारमतवादी लोकशाही असलेल्या देशांचे दुहेरी व्यक्तित्त्व लक्षात यावे. स्वदेशात उदारमतवादी पण वसाहतीत साम्राज्यवादी असा तो दृष्टीकोन होता. आपल्या साम्राज्यात असणाऱ्या वसाहतीशी ज्या प्रकारे ते वर्तन करीत असत त्यावरून हे स्पष्ट होते. 'लोक' या संकल्पनेत 'मूळ-धरतीवाद' (Organicism) विशेषत: गोऱ्यांनी स्थलांतर करून वसाहत केलेल्या देशात सर्वत्र पसरवला होता. या अशा देशातून वेगवेगळे हितसंबंध अस्तित्वात होते हे सर्वांनाच मान्य होते. परंतु एका बाबतीत 'लोक' हे 'मूळ धरतीपूत्र' (Organic) आहेत असे समजले जात होते. हे मूळ-धरतीपूत्र 'लोक' हे अर्थातच गौरवर्णिय युरोपियन होते. ते त्या वसाहतीतीत स्थानिक लोकांपेक्षा वरच्या श्रेणीतले होते. इतर वंशातील स्थानिक लोकांमुळे या मूळ-धरतीपूत्र गौरवर्णियांत प्रदुषण पसरेल ही सुप्त भिती नेहमी होतीच ! थोडक्यात या गोऱ्यांचे मूळ धरतीपूत्रपण प्रदुषणाच्या आवर्तात सापडण्याचा संभव होता. म्हणूनच सुरुवातीला ज्या पश्चिम युरोपमधील देशांचा निर्देश उदारमतवादी असा करण्यात आला होता, त्यांची प्रकृती दुहेरी होती. त्यांना एककाळी बाजूही होती. भांडवलशाही प्रकट करीत असलेली वर्गिय तडजोडीची भूमिका, उदारमतवादी लोकशाही, आणि वसाहत करणाऱ्या युरोपियन लोकांची परस्पराबद्दल सहीष्णु वृत्ती, या साऱ्या गोष्टी अत्याचार व दडपशाही यावर आधारीत होत्या. हे सारे अत्याचार व दडपशाही वसाहतीतील त्या 'दुसऱ्या'वर करण्यात येत असे. म्हणूनच त्यांची लोकशाही ही सामंताची लोकशाही होती, (HERREN VOLK). या संबंधातील अत्यंत वाईट उदाहरणे, ज्या देशातील अनेक व्यक्तिंनी नव्हे तर अनेक कुटुंबांनी वसाहतीत स्थलांतर केले, ते देश आहेत. वसाहत करायला गेलेल्या त्या कुटुंबांना स्थानिक लोकांबरोबर व्यापार करण्यात अथवा त्यांचे शोषण करण्यात दिलचस्पी नव्हती. स्थानिक लोकांची जमिनी बळकाविण्यात, त्या कुटुंबांना अधिक रस होता व तेच त्यांचे उद्दिष्ट होते. या अशा वसाहत करावयास गेलेल्या कुटुंबांना स्थानिक 'दुसऱ्या'शी संबंध ठेवून, लोकसंख्येत भर घालून, होता होता विवाह- संबंध प्रस्थापित करावयाचे नव्हते. एवंच स्थानिक 'दुसरे' म्हणूनच हे वांशिक दृष्ट्याही 'दुसरे' आहेत असे समजले जाण्याची अधिक शक्यता होती. स्थानिक लोकांनी ते 'दुसरे' ठरवून, त्यांना देशातून घालवून देण्याच्या दृष्टीने ते फारच चांगले कारण होते. याबाबतीत कार्यक्षम ठरणारा कोणताही मार्ग वापरून, यात वेळप्रसंगी खून करणेही समाविष्ट आहे. स्थानिक 'दुसऱ्यां'ची हकाल पट्टी करण्याचे कार्य पार पाडण्यात आले होते. घृणास्पद अत्याचार करून केलेली स्थानिक 'दुसऱ्याची' हकालपट्टी, वेळप्रसंगी बुद्धीपुरस्सर केलेला वंशउच्छेद इत्यादी गोष्टी त्या 'मार्गात' अंतर्भूत होत्या. क्रूर अशी गुलामी ही या संदर्भात तसा सौम्य पर्यायी मार्ग आहे. याचे कारण मग स्थानिक दुसऱ्यांना हद्दपार करण्यात येत नसे. त्यांचा खून करण्यात येत नसे. पण त्यांचे शोषण जरूर करण्यात येत होते. शिवाय युरोपियनांच्या उदारमतवादी संस्थातून त्यांना वगळून, अस्पृशासारखे, त्या संस्थाबाहेर ठेवण्यात येत असे.

## वसाहत करणारे आणि त्यांनी घेतलेले बळी

वसाहतवादी राजवटींच्या काळ्या बाजूत दोन लक्षणे सातत्याने आढळून येतात. **(एक)** वसाहत करणारांना स्थानिक पातळीवर वसाहतीत वस्तुतः संपूर्ण स्वराज्य होते. त्यापासून मिळणारे सर्व फायदे त्यांना घेता येत असत. मग घटनेत प्रत्यक्ष काहीही सांगितलेले असेना, या कालखंडात असे आढळून येते की हे सर्व वसाहती देश हे वैशिष्ट्यपूर्ण 'लोकशाही' समूह होते; तरी स्थानिक 'दुसऱ्यां'चे त्या 'लोकशाही' समूहांनी केलेले एथनिक शुद्धीकरण हे कमालीचे भयावह व क्रूर होते. या वसाहती ज्या देशांच्या साम्राज्यात येत होत्या, त्या देशांतल्या लोकशाही राजवटी या पातळीचे अत्याचार कधीही करीत नसत, थोडक्यात या देशातील लोकशाहीला तसे वागू नये याचे प्रशिक्षणच मिळत असे. म्हणूनच स्पॅनिश, पोर्तुगीज व ब्रिटिश साम्राज्यातील वसाहतीवर नेमण्यात आलेले व्हॉईसरॉय व गव्हर्नर कॅथलिक व प्रोटेस्टंट धर्मिय चर्च संघटन, या स्थानिक 'दुसऱ्यां'ना वसाहत करावयास आलेल्या गौरवर्णियांपेक्षा सौम्यपणे वागवित असत. याच कारणामुळे अमेरीकेतील स्थानिक रेड-इंडियनांनी, अमेरीकन क्रांती युद्धाच्या वेळी, ब्रिटीश राजवटीला पाठींबा दिलेला होता, **(दोन)** स्पॅनिश आणि पोर्तुगीज वसाहतीपेक्षा, ब्रिटीश वसाहतीत 'वंशउच्छेद' उफाळून येणे हे अधिक करून होत असे. या दोन साम्राज्यवादांची तुलना करता असे आढळून येते की, मूळ देशात लोकशाही ही जितकी मजबूत, तितका त्यांनी केलेला वंश-उच्छेद हा अधिक प्रखर.

स्थानिक दुसऱ्यांच्या राजकीय संस्था या वसाहत करावयास आलेल्या गौरवर्णिय लोकांच्या राजकीय संस्थापेक्षा कितीतरी प्रमाणात अधिक लोकशाही असलेल्या संस्था असत. या मुद्याची आवर्जून नोंद घेणे आवश्यक आहे. या स्थानिक लोकांच्या लोकशाहीत असलेला लोकांचा (म्हणजे त्या 'दुसऱ्यांचा') सहभाग हा प्रातिनिधिक स्वरूपाचा नसे, तो अधिक प्रत्यक्ष असे. उदारमतवादी लोकशाहीत प्रतिनिधित्व करणाऱ्या नागरीकांना अधिकार असतात. परंतु स्थानिक जमाती आणि राष्ट्रे यांच्या समाजातील सर्वसामान्य पुरुष नागरीकांना आणि काही ठिकाणी स्त्रियांना देखिल, गौरवर्णियांच्या लोकशाहीत असलेल्या अधिकारापेक्षा कितीतरी जास्त अधिकार असत. उदा. त्या स्थानिकांना आपले राष्ट्र वा जमात यांना अगदी सहजपणे सोडून जाण्याचे स्वातंत्र्य होते. त्या राष्ट्राच्या व जमातीच्या वतीने लढण्यास **नकार** देत येत असे. 'वंशउच्छेद' या विषयासंबधी लिहिणारे जे विचारवंत 'लोकशाहीवादी शांतता' या पक्षाचे आहेत, त्यांनी एखाद्या 'वंशउच्छेदा' मध्ये किती मानवी संहार झाला याचा हिशोब मांडलेला आहे. पण त्यातून ते अमेरीकेतील रेड-इंडीयनांची राष्ट्रे नेमकी वगळतात, ही राष्ट्रे वा जमाती ही आधुनिक पद्धतीची कायम स्वरूपी अलग अलग राष्ट्रे नव्हती असे काहीसे संशयास्पद कारण आपल्या कृतीच्या समर्थनार्थ देतात. या विचारवंताच्या लिखाणातील आत्मगौरवाचा जो ध्वनी आहे तो कदाचित त्यांना सोईचा असेलही. पण या विचारवंतांनी

स्वत:च केलेल्या 'राष्ट्र' या संकल्पनेनुसार ते प्रतिपादन वैध व रास्त नाही हे लक्षात घ्यावयास हवे. उदा. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरती अमेरीकन रेड इंडीयन्सनी घटना असलेली कायम स्वरूपाची राज्ये विकसित केली होती. इ. स. १८२७ साली चेरोकी, इ. स. १८५६-६७ सालचे चोकटॉ, चिकासॉ, आणि क्रिकस ही त्यांपैकी काही राज्यांची नावे, रेड इंडियनांनी 'जबाबदार' सरकारे स्थापावी असा अमेरीकन सरकारचा दबाव असल्याकारणाने या राज्यांची स्थापना झाली होती. पण तो दबाव हे फक्त एक कारण होते एवढेच. अशा प्रकारची 'जबाबदार' सरकारे तयार झाली म्हणजे मग अमेरीकन सरकारला त्यांच्याबरोबर वाटाघाटी करणे सुलभ गेले असते. या वाटाघाटीतून काय निष्पन्न होणार याचा अंदाज सर्वांनाच होता. प्रत्यक्षात तसेच घडले. या वाटाघाटीची फलश्रुती, प्रचंड प्रमाणावर घाऊकपणे केलेली जमिन जप्ती, अमेरीकन रेड इंडीयनांना अमेरिकेबाहेर घालवून देणे, आणि या दोन्ही गोष्टी बरोबर किंवा त्यांच्या अधेमध्ये होणारे वंशउच्छेदी स्फोट, या गोष्टी होत्या. एवंच दुसऱ्या एका लोकशाही विरुद्ध उदारमतवादी लोकशाही त्या दुसऱ्या लोकशाहीतील लोकांचा 'वंशउच्छेद' पुन्हा पुन्हा करीत होती. अमेरीका, कॅनडा, आणि ऑस्ट्रेलिया या देशातील 'आम्ही लोकांनी' केलेले रेड इंडीयन आणि आदीवासी राष्ट्रांच्या केलेल्या शिरकाणात बळी गेलेल्या माणसांची संख्या प्रथम पृथकपणे विचारात घेऊन, त्यांची गणती केली, तर मग आपल्याला काय आढळते? या अगोदर उल्लेख केलेल्या **रूम्मेल** या विचारवंताच्या आंकडेवारीतील मोजमापात बदल करणे आपणास भाग पडेल. आपणास असे आढळून येईल की तराजूचा काटा लोकशाही राजवटींच्या विरुद्ध झुकलेला आहे. एकाधिकारी राजवटीपेक्षा लोकशाही राजवटी ह्या 'वंशउच्छेद' करण्याची जास्त संभाव्यता असते; असा निष्कर्ष या दुरुस्त केलेल्या आकडेवारीतून काढावा लागेल, हे सारे विवेचन करण्याचा उद्देश **रूम्मेल** यांनी तयार केलेले आंकडेवारीचे तक्ते बदलणे हा नाही. एक मर्यादीत असे समाजशास्त्रीय वास्तव सुचविणे एवढाच त्या मागे हेतू आहे. या वास्तवानुसार 'दुहेरी' प्रकृतीच्या वसाहतवादी समाजातील वसाहती लोकशाह्या या प्रचंड प्रमाणावर घाऊक एथनिक शुद्धीकरण करणे, वेळप्रसंगी दुसऱ्या एखाद्या लोकशाही विरुद्ध केलेल्या वंशउच्छेदात त्याची परिणती होणे हे अधिक संभाव्य होते, इतकेच निर्देशित करण्याचा उद्देश आहे.

खरीखुरी, अस्सल लोकशाही आणि वंशउच्छेद यांच्या दरम्यान- म्हणजेच एका अर्थाने उदारमतवादी लोकशाहीच्या दोन बाजूत- अगदी **आवश्यकपणे** संबंध होता का? या प्रश्नाचे उत्तर नाही हेच आहे. वायव्य युरोपच्या गाभ्यात उदयास आलेल्या उदारमतवादी लोकशाही राजवटी या त्यांच्या परीघाच्या काठावर असलेल्या वसाहतीत होणाऱ्या वंशउच्छेदावर अवलंबून नव्हत्या. त्याचा वंशउच्छेदाचा उदय युरोपमधील विशिष्ट परिस्थितीतून झालेला आहे. आपण या ठिकाणी दोन अगदी अलग घटीतांचा विचार करीत आहोत. असे असले तरी त्या दोघात आणखी एक वेगळा संबंध जरुर आहे. उदा. विशेष

करून स्पेन व पोर्तुगीज या देशांतील राजवटी 'लोकांच्या वतीने' (by the people) राज्य करण्याबावत वचनबद्ध नव्हत्या. म्हणूनच त्या देशातून वसाहत करण्यासाठी गेलेल्या लोकांकडून वांशिक अथवा तत्सम समानतेचा सिद्धांत ठोसपणे विकसित करण्यावर भर देणे, हे त्यामानाने असंभवनिय होते. असे होते तरी या वसाहत करावयास गेलेल्या गौरवर्णिय युरोपियनांना 'लोकांच्या वतीने' केलेले राजवटीला वैधत्त्व (Legitimate) प्राप्त करून देण्याची इच्छा होती. परंतु हे करीत असताना 'लोक' या संकल्पनेत फक्त गौरवर्णियांचा समावेश आहे असे सांगून 'लोक' या शब्दाची व्याप्तीवर मर्यादा घालण्यात आली होती. म्हणूनच वसाहत करावयास गेलेले गौरवर्णिय 'लोक' म्हणजेच वंश (Race) असा सिद्धांत विकसित करणे अधिक संभवनिय होते. 'वंशउच्छेद' ही लोकशाहीची काळी बाजू आहे ती या अर्थाने.

**रूम्मेल** या विचारवंताने, 'वंशउच्छेद' या घटीताचे स्पष्टीकरण म्हणून दिलेले 'लोकशाहीवादी शांतता' या स्पष्टीकरणाशी येथवर केलेले विवेचन- निदान आधुनिक युगाच्या सुरुवातीच्या काळाबाबत अगदी खास करून- विरोधी आहे. थोडक्यात गौरवर्णिय युरोपियन, आणि त्यानंतर अनेक वर्षे गेल्यानंतर जीवंत राहीलेल्या मूठभर स्थानिक 'दुसरे' अगर गुलामांचे जे वंशज होते त्यांच्या दृष्टीने, अमेरीका आणि ऑस्ट्रेलिया ही उदारमतवादी-लोकशाहीवादी आणि सर्वसामान्यपणे दुसऱ्यांचा खून करण्यास प्रोत्साहन न देणारी राज्ये होती. एथनिक शुद्धीकरणात मग्न असणे, त्या 'दुसऱ्यांना' हद्पार केलेच पाहिजे असा घोषा लावणे आणि वेळ प्रसंगी या सर्वांचे पर्यवसान अत्यंत निघृण अशा वंशउच्छेदात होणे, या सर्व प्रवृत्ती नव्या जगाच्या (अमेरीका/ऑस्ट्रेलिया) उदारमतवादी आधुनिकतेला अगदी मध्यवर्ती होत्या. या येथे उल्लेखिलेल्या महाभयानक प्रवृत्ती प्रथम वसाहत करावयास गेलेल्या गौरवर्णियांना वसाहतीत अमलात आणल्या आणि मागाहून 'पहिल्या नव्या राष्ट्रांत' ही जी येथे वर्णिलेली प्रक्रिया आहे ती अमेरीकेत- आजची अमेरीका व कॅनडा- या देशात अनेक वर्षे चालूच राहिली होती. आपल्या देशातून नाहीसे करण्यासाठी 'दुसरे' शिल्लक न राहण्याची परिस्थिती येईपर्यंत, ती प्रक्रिया सातत्याने चालूच होती. हे असे होणे हे म्हटले तर खूद्द लोकशाहीतून झालेले निर्मिती नव्हती हे खरे आहे. परंतु लोकशाही व वसाहतवादी शोषण या दोघांची ती निर्मिती खासच होती.

### इ. स. १९१५ अगोदरची 'धरती'तून आलेली (organic) लोकशाही

मध्य, पूर्व आणि आग्नेय युरोपमध्ये इ. स. १९१५ पूर्वी काही घडामोडी झाल्या होत्या. तशाच वायव्य युरोपमध्येही झाल्या होत्या. या दोन ठिकाणच्या घडामोडींची तुलना करता, त्यात आपणास तीन मुलभूत महत्त्वाचे फरक आढळतात. राष्ट्र-राज्य या संबंधी ज्या उदारमतवादी कल्पना होत्या त्यात 'धरतीतून' वर येणाऱ्या कल्पनांचे प्रभुत्व अधिक असणे, हे ते तीन फरक प्रमुख असण्याचे कारण होते. त्याचे पर्यवसान प्रभुत्व गाजविणारी काळी

बाजू लवकरच प्रकट होण्यात झाले, आणि सरते शेवटी तानाशाही-फॅसिझम या प्रकारच्या समाजव्यवस्थेला जाऊन ती काळी बाजू पोचली. विद्यमान काळातील जगातील विकसनशील विभागात हे तीनही फरक सामान्यपणे आढळतात. याच कारणाने या विभागात तानाशाही, आणि वंशउच्छेद या गोष्टीची आवर्तने होण्याचा संभव आहे.

**एक** त्या मानाने अप्रगत युरोपिय देशात लोकशाही बद्दलच्या अपेक्षा फार उशिरा निर्माण झाली. तोवर अत्यंत वरच्या पातळीवर 'परीपक्व लोकशाही'बद्दल सिद्धांत तयार झाला होता. अशा परिस्थितीत या अप्रगत देशात लोकशाही उदयास आली. 'सर्व लोकांनीच राज्य केले पाहिजे या प्रकल्पनेचे त्या लोकशाहीवर प्रभुत्व होते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास अठराव्या शतकातील ब्रिटीश, 'लोक' आणि 'लोकसंख्या' 'या शब्दांचा जो अर्थ लावित होते, तो त्या 'सर्व लोक' या संज्ञेला अभिप्रेत होता. या सिद्धांतानुसार सर्व लोकांनीच राज्य केले पाहिजे हा विचार बद्धमूल झालेल्या कालखंडात या अप्रगत देशात लोकशाही उदयास आली होती. मध्य, दक्षिण आणि पूर्व युरोपमध्ये सुरुवातीच्या काळात आँग्ले-अमेरीकन पद्धतीचा मतदानाचा मर्यादीत अधिकार होता. परंतु थोड्याच दिवसात अधिक जनताप्रिय कायदे असावेत या विचाराने ती मर्यादीत मतदानाचा अधिकार असलेली लोकशाही मागे पडली व आम जनतेला मतदानाचा अधिकार प्राप्त झाला. याही परिस्थितीत या अप्रगत देशातील अभिजन वर्गाला जनतेला सत्तेपासून दूर ठेवण्याची ईच्छा होती. या इच्छेचा पाठपुरावा करण्याच्या प्रयत्नात त्यांनी जनतेच्या हक्कावर मर्यादा न घालता, देशातील लोकसभांचे सार्वभौमत्व सिमीत केले. या देशातून सर्व पुरुषांना मतदानाचा अधिकार होता, निवडून गेलेल्या प्रतिनिधींना कायदे करण्याबाबत सत्ता होती. परंतु त्यांच्या या सत्तेत एका बलदंड कार्यकारी सतेला सामान्यपणे **राजाला** सहभागी करून घ्यावयाचे होते. मात्र जनतेचे प्रतिनिधित्व करणारांना आपल्या सत्तेतला काही भाग या बलदंड कार्यकारी सत्तेकडे कायद्याने सूपूर्द करावा लागत होता. जर्मनीमध्ये KAISER REICH कैझररइश ही ती बलदंड कार्यकारी सत्ता होती. जर्मन कैझररइश, ही सर्व पुरुष मतदारांनी निवडलेल्या लोकसभेची प्रतिकृती होती. अशा लोकसभेत वयात आलेल्या सर्व पुरुषांनी मतदान करून निवडलेली लोकसभा बादशहा कैझर आणि त्यांचे मंत्री यांच्याबरोबर सत्तेबाबत सहभागी होती.

याचा अर्थ असा होतो की 'राज्या'तील अभिजन वर्गाला आपल्या देशातल्या 'लोकांच्या' डोक्यावरून म्हणजेच त्यांना डावलून आपल्या राज्यातील सत्ता वापरता येणार होती व ती ते वापरीतच होते. हा वर्ग ही सत्ता जनतेला खेळविण्याकरता (MANIPULATE) व आपल्या उद्दिष्टासाठीना कार्यप्रवण करण्याकरीता (MOBILIZE) उपयोगात आणीत असे. युरोपमधील हा विभाग, आर्थिक दृष्ट्या अप्रगत असल्याकारणाने, अभिजन वर्गांना अवैध मार्गांनी प्राप्त झालेली जी सत्ता होती ती वापरण्याच्या त्यांच्या क्षमतेत वाढ झाली होती. या

दोन्ही ठिकाणचे लोक, हे बहुतांशाने ग्रामीण भागात राहणारे, किंवा कारागिरांच्या छोट्या दुकानात काम करणारे अगर आड रस्त्यावर मिळेल ते काम करणारे 'लोक' होते. थोडक्यात कामगार वर्गाच्या संघटनांच्या कक्षेबाहेरचे ते लोक होते. अर्थात जर्मनी हे मागासलेपणाबाबत जे वर्णन आहे त्यात बसणारा देश नाही. जगाच्या दक्षिण गोलार्धातील देशात मतदानाचा हक्क मर्यादीत करणे हे आजच्या जगात जवळ जवळ अशक्य होऊन बसले आहे. एकतर त्या ठिकाणी प्रत्येक **व्यक्तिला मत असते अथवा ते कोणालाच नसते.** यदाकदाचित मतदानाचा हक्क असला तर तो दिखावू असतो अथवा बहुतांशाने तो खोटा असतो. मध्यवर्ती सरकारकडे सत्ता किती असावी याबद्दल उदारमतवादाच्या काही कल्पना होत्या. या देशातून त्या पलिकडे ती सत्ता नेऊन 'राज्यवाद' वाढीस लागला आहे. देश अप्रगत असल्यामुळे हे घडते. तीन मुख्य फरकांचा वर उल्लेख केलेला आहे. त्यातल्या एका फरकाचा हा परिणाम आहे.

**दोन** अलिकडे प्रत्येक राज्याने आपल्या नागरीकांकरीता कितीतरी अधिक गोष्टी कराव्यात अशी नागरीकांची अपेक्षा असते. उदा. आपल्या चुतःसीमात येणाऱ्या प्रदेशात सहयोग व एकात्मता निर्माण व्हावी याकरीता अंतर्गत संरचना (INFRA STRUCTURES) उपलब्ध करून देणे, युद्ध करण्यासाठी जनतेला कार्यप्रवण करणे, आणि समाज कल्याण संघटीत करणे, आर्थिक विकास प्रायोजित करणे इत्यादी. एका विचारवंताने सांगितल्याप्रमाणे राज्य हे एका 'नैतिक प्रकल्पाचे वाहक' बनते. अगदी पराकोटीच्या उजव्या गटातून **राज्यवादी** प्रकल्प इ. स. १८९० ते १९०० च्या दरम्यान अनेक देशातून मुसंडी मारून पुढे आले. त्यात **बारे** आणि **मोरास** या सारख्या फॅसिस्ट पूर्व सूरींच्या लिखाणाने त्याला पाठींबा दिला होता. मध्याच्या उजवीकडचा जो प्रतिगामी गट होता, त्यात 'सोशल कॅथॉलिसिझम' (सामाजिक कॅथॉलिक पंथवाद) या विचाराचा समावेश आहे. मध्याच्या डावीकडल्या डावे, म्हणजे जर्मनीत 'सोशलिस्ट ऑफ द चेअर' या नांवाने महशूर असलेल्या लेखकांचे लिखाण, बिटनमधील 'नवे उदारमतवादी' फ्रान्समध्ये 'जहाल लोकसत्तावादी आणि रशियात उदारमतवादी ZEMSTVO झेमस्टोव्हो बुद्धीवादी यांचा यात समावेश आहे. या सर्व विचार मंथनात 'डावे' हे मागेच पडले होते. पहिले महायुद्ध आणि बोलशेव्हिक क्रांती होऊन जाईपर्यंत आणि त्यानंतरही थोडा काळ बहुतेक समाजवाद्यांची निष्ठा क्रांतीनंतर येणारे, कमीत कमी सत्ता हाती असलेले राज्य अशा स्वरूपाच्या साम्यकुल छाप प्रकल्पना अगर रामराज्यवादी (UTOPIAN) विचार यांच्याशी जवळीक होती. परंतु विसाव्या शतकात **राज्यवादी** विचाराने (STATIST) मारलेली मुसंडी सातत्याने आपले अस्तित्व जाणवून देत होती. जगातील बहुतेक राष्ट्रांना तिने पछाडले होते. सध्या पुन्हा एकदा नव-उदारमतवादाला पुर्नजीवन प्राप्त झाले आहे. त्यामुळे चिरेबंदी राज्यशासनाच्या काही कपच्या उडल्या आहेत. या नव विचारानुसार दक्षिण गोलार्धातील राज्यकर्त्यांनी सामाजिक आणि आर्थिक विकासात सहयोग घडवून आणला पाहिजे अशी अपेक्षा केली जाते. ते

काहीही असो त्या राजवटी **'राज्यवादीच'** (STATIST) राहील्या आहेत. हे झाले दुसऱ्या महत्त्वाच्या फरकासंबंधी.

**तीन** साम्राज्यांच्या प्रभुत्वाखाली असलेला 'बहुराष्ट्रीय' असे प्रजाजन असलेल्या विभाग, त्यावर सम्राटांची सत्ता होती. ही सत्ता या राजघराण्यात परंपरेने चालून आलेली होती. उदा. हॅपसबर्ग रोमनोव्ह आणि ऑटोमन साम्राज्ये. असे असल्याकारणाने सर्व सामान्यपणे आढळून येणारा जो वर्ग संघर्ष आहे, त्यात साम्राज्याविरुद्ध असलेला स्थानिक स्तरावरचा संघर्ष गुरफटला गेला. लोकशाहीच्या युगात हे जे संघर्ष होते, ते अभिजनात होणाऱ्या संघर्षापासून दूर सरकले. राष्ट्रीय समूहांच्या म्हणून मानल्या जाणाऱ्या संघर्षाच्या जवळ जाऊन ते पोचले. या साम्राज्यात जे स्थानिक अभिजन होते, त्यांनी प्रतिनिधित्व करण्याचा अधिकार आपणालाच असला पाहिजे असा आग्रह धरला. असे होते तरी तळागाळातील लोकांकडून या अभिजनावर एकसारखा दबाव येतच होता. त्यातून सुटका करून घेण्याच्या उद्देशाने साम्राज्यशाही हा शत्रू आणि त्यांचे स्थानिक सूर्याजी पिसाळ या दोघांच्या विरुद्ध 'सर्व' लोकांचे आंदोलन उभारण्याच्या प्रयत्नात या अभिजनांनी स्वत:स गुंतवून घेतले. साम्राज्यवादी विचारांच्या जर्मन, रशियन, आणि तुर्क . . . . आणि कालांतराने हंगेरीयन अभिजनांनी आपल्या स्वत:च्या दुरुस्त (REVISIONIST) राष्ट्रवादाकरवी त्या चळवळीस प्रत्युतर दिले. क्रोट रूथेन्स, हे गतकालातील बॉसनिया/तुर्क आणि विद्यमान काळातील तुर्क यांच्याबद्दल नापसंती दाखवत असतीलही. रुमेनियन हें हंगेरीयनासंबंधी तशीच भावना प्रकट करीत असतीलही. स्लोवॅक हे झेक विरुद्ध नापसंती व्यक्त करीत असतील, आणि या जमाती पैकी प्रत्येक जमात आपणावर पूर्वी सत्ता गाजविणाऱ्या जर्मन आणि रशियन यांच्याबद्दल आपणास जी तीव्र नापसंती होती ती प्रकट करतीलही. इतिहास काळातील साम्राज्यवादी राज्यकर्त्यांचे हस्तक 'ज्यू' होते. वरवर पाहता या अल्पसंख्याकांना खास हक्क बहाल करण्यात आले आहेत असे या साम्राज्यातील ज्यू व्यतिरिक्त इतर सर्व प्रजाजनांना वाटत असे. नव्याने स्वतंत्र झालेल्या राष्ट्रात ज्यू जमातीबद्दल दु:स्वास प्रचंड प्रमाणात सर्वत्र पसरलेला होता. हे ज्यू अल्पसंख्यांक व्यापार, ज्या धंद्यात विशेष कौशल्य लागते असे उद्योगधंदे आणि उच्च स्तरीय शिक्षण या सर्व क्षेत्रात आपला वरचष्मा प्रस्थापित करून होते. एवंच उदारमतवादाला वेगवेगळ्या पातळ्या अभिप्रेत होत्या. त्यांच्या पलिकडे जाऊन या 'राष्ट्रवादा'चे वर्धन झालेले होते. ही सारी प्रक्रिया वसाहतवादाशी मुकाबला करीत असताना होत होती. शोषण करणारे वसाहतवादी आणि त्यांचे हस्तक यांच्या विरुद्ध त्या विभागाच्या धरतीतील मूळ 'आम' जनतेला कार्यप्रवण करणे (निदान समजूत तरी तशी होती) हे त्या वसाहतवादाशी केलेल्या मुकाबल्यात अनुस्यूत होते.

**धरतीवादाचा जन्म (ORGANICISM)**

राज्यवाद (STATISM) आणि राष्ट्रवाद या दोन गोष्टींनी दिलेल्या पाठींबामुळे 'धरतीवादी- राष्ट्र-राज्यं' (ORGANIC) हे विकसित झाले आणि त्याचा विकास होतोच

आहे. या संबधीच्या अगदी सुरुवातीच्या काळातील एका उदाहरणाकडे दृष्टीक्षेप टाकू या. इ. स. १८९२ साली तीन ऑस्ट्रियन राजकारण्यांनी लींझ प्रोग्रॅम (LINZ PROGAMME) या नांवाने प्रसिद्ध असलेला कार्यक्रम जाहीर केला. या कार्यक्रमाचा उद्देश DEUTSCHE VOLKSPARTEI डॉईश फोकसपार्टी (जर्मन जनतेचा पक्ष) या नावाचा पक्ष स्थापणे हा होता. जर्मन राष्ट्रवाद, सर्वांना मतदानाचा हक्क आणि प्रगतीशिल सामाजिक कायदे या तीन गोष्टी या कार्यक्रमात अंतर्भूत होत्या. उदारमतवाद, अनिर्बंध भांडवलशाही आणि मार्क्सवादी समाजवाद या तीन्हीचा या कार्यक्रमात सारखाच विचार व निषेध करण्यात आला होता. हा निषेध करताना त्यात डावे-उजवे काहीही नव्हते. सर्वच विचारांबद्दल सारखाच निषेध या कार्यक्रमांद्वारे नोंदविण्यात आला होता. हितसंबंधातील संघर्षांना मान्यता देणाऱ्या राज्यघटनेचा उदारमतवाद पुरस्कार करतो असे असले तरी तो विचार वगळून त्या राज्यघटनेतील जो गाभा आहे तो आपण उचलून धरीत आहोत असे त्या तिघांनी जाहीर केले होते. 'जनतेचे ऐक्य' 'सर्व जनतेचे कल्याण' 'जनतेचे हितसंबंध' या धोरणांचा ते पाठपुरावा करीत असल्याकारणाने ते मांडत असलेला विचार वैध आहे यास आपोआपच आधार मिळतो असा त्यांचा दावा होता. हा संकल्पित पक्ष प्रत्यक्षात कधीही स्थापन झाला नाही. या तीन राजकारण्यात फूट पडली. त्यातील प्रत्येकाने स्वत:चा असा राजकीय पक्ष स्थापन केला. **ॲडलर** हे (लोकशाही समाजवादी पक्ष) सोशल डेमोक्रॅटीक पक्षाचे पुढारी झाले. (ॲडलर हे प्रख्यात मानसशास्त्रज्ञ होते), **ल्यूगर** यांनी ख्रिश्चन सोशलिस्ट (ख्रिश्चन समाजवादी) पक्षाची स्थापना केली आणि **शॉनेरेर** यांनी पॅन-जर्मन-पार्टी (अखिल जर्मनांचा) पक्ष स्थापन केला. दोन महायुद्धाच्या दरम्यान त्या काळातील हे तीन जनता पक्ष होते आणि त्यातील दोनातून जनता-फॅसिस्ट चळवळीची निर्मिती झाली.

'लोक' आणि राज्य यांच्याबाबत 'धरती'वाद या संकल्पनेवर या तीन तरुण ऑस्ट्रीयनांनी शिक्कामातेब केले होते. 'लोक' हे अखंड असतात. त्यांच्यात विभाजन होतच नाही, त्याच्यात ऐक्य अनुस्यूत असते, असे 'लोक' या आपल्या संकल्पनेबद्दल त्यांनी सांगितले होते. असे आहे म्हणूनच समाजातील संघर्षांना संस्था असे स्वरूप देऊन त्यांच्या आधारावर 'राज्या'ची उभारणी करण्याची आवश्यकता नाही. लोकांचे प्रतिनिधीत्व करणारी एकच राष्ट्रीय चळवळ असावी. ही चळवळ सरतेशेवटी सामाजिक गटात असलेल्या संघर्षांना पार करून त्याही पलिकडे जाईल. वर्ग संघर्ष आणि समाजातील वेगवेगळ्या विभागांचे भिन्न हितसंबंध यांच्याबरोबर तडजोड करता कामा नये. परंतु त्या पलीकडे गेले पाहिजे. हा अत्यायिपणा (TRANSCENDENT) करणारा घटक म्हणजे राज्य अशी प्रकल्पना विसाव्या शतकाच्या सुरुवातीला उद्‌भवली.

धरतीवादाच्या संकल्पनेत दोन अगदी स्पष्ट व उघड असे दोष आहेत. **एक** हे दोष आपणास एकाधिकारशाही राज्यवादाकडे घेऊन जातात. एक पक्षिय राजवटीत मग ती राजवट डाव्या पक्षाची व उजव्या पक्षांची असो- पक्षांतर्गत लोकशाही कोणत्याही पक्षाला



अनुक्रमणिका

टिकवून धरणे आजवर जमलेले नाही (बंगालमधील मार्क्सवादी-कम्युनिस्ट पक्षांचे उदाहरण अपवादादाखल कोणी पुढे करील. पण ते अप्रस्तुत आहे याचे कारण भारतात अजूनतरी निखल एकपक्षिय राजवट आलेली नाही) समाजात स्पर्धेला संस्था असे स्वरूप प्राप्त झालेले नसले, तर एकपक्षिय राजवट ज्या ठिकाणी असते त्याठिकाणी तो पक्ष अभिजनांच्या आणि हुकुमशहाच्या ताब्यात जातो. 'लोकांचे' एकमेव असे सारतत्व आहे असे जे समजले जाते, ते सारतत्व कोणाकरवी आविष्कृत होणार? मानवी समाजात वस्तुतः भिन्नता नेहमीच विद्यमान असते. असे असल्याकारणाने एखाद्या अभिजन वर्गाच्या अगर हुकुमशहाच्या नियंत्रणाखाली असणाऱ्या राज्याला अगदी सहजपणे एकमेव व एकमुखी आवाजात आपण बोलतो आहोत असा दावा करता येईल. एवंच खरीखुरी व अस्सल अशी धरतीवादी लोकशाही ही तात्पुरती ठरेल. याचे कारण दूरवरचे भविष्य लक्षात घेता त्या व्यवस्थेत अंतर्विरोध आहेत हे दिसून येईल. **दोन**. राष्ट्राच्या संपूर्ण नागरीकत्वातून, अल्पसंख्य समाज आणि राजकीय विरोधकांना वगळण्याकडे धरतीवाद आगेकूच करतो. या प्रकारचे जे राष्ट्रवादी होते त्यांची अशी श्रद्धा तयार झाली होती का (१) आपल्या राष्ट्राचे सारतत्व हे इतर राष्ट्रांच्या सारतत्वापेक्षा भिन्न असते. (२) अशा प्रकारचे राज्य स्थापन करणे, हा या राष्ट्रवाद्यांचा हक्क आहे. हे संकल्पित राज्य सरतेशेवटी त्यांच्या विशिष्ट सारतत्वाला आविष्कृत करील. (३) जे कोणी ते 'दुसरे' आहेत त्यांना वगळण्याचा या राष्ट्रवाद्यांना अधिकार आहे, कारण वेगवेगळ्या सारतत्वाचे लोक हे राष्ट्र कमकुवत करतात.

एवंच अशा प्रकारे पूर्व युरोप मधील अल्पसंख्य दिवसेंदिवस वाढत्या दबावाखाली येऊ लागले. होता होता त्याचे पर्यवसान त्या 'दुसऱ्यां'ना मुख्य प्रवाहात सामिल होण्यासाठी सक्तीने प्रवृत्त करण्यात येत होते आणि हे जर मिसळून जाणे झाले नाही तर त्यांच्यावर स्थलांतर करण्याची सक्ती करण्यात आली. या सक्तीचा बहुतांश मारा ज्यू धर्मियांवर झाला. इ. स. १९१४ सालच्या अगोदरच्या दशकात २६ लाख पूर्व युरोपिय ज्यू धर्मियांनी पश्चिमेकडे स्थलांतर केले. रशियन-ज्यू-संहार कार्यक्रमांनी (POGROMS) 'खूनी शुद्धीकरणास' आणखीनच वरच्या पातळीवर (खून करण्याबाबत) नेऊन ठेवले. इ. स. १८८१-१८८३ च्या दरम्यान दुसरा अलेक्झांडर या झारच्या खुनाबद्दल ज्यू धर्मिय बळीचे बकरे झाले. राजकारणी आणि तत्कालीन रशियन वृत्तपत्रांनी या आगीत तेल ओतण्याचे काम चोख बजाविले होते. झारशाहीतील अधिकारी वर्ग आणि शासनव्यवस्था यांनी या मानवी हत्याकांडात हस्तक्षेप करण्याबाबत अनिच्छा प्रकट केली होती. ही खूनी प्रवृत्ती फक्त अभिजन वर्गांनी प्रकट केली नव्हती. खरे म्हणजे समाजाच्या तळागाळातून हे खूनी उद्रेक उफाळून आलेले होते. विशेषतः तरुण पुरुष कामगार वर्गियांनी यात भाग घेतला होता. अशा प्रकारे त्या काळातील कामगारवर्गिय असंतोषाला ज्यू धर्मियाकडे वळवून वाट करून दिलेली होती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास बुद्धी पुरस्सर खून करण्याऐवजी, पिटाई, बलात्कार आणि लुटालुट या कृत्यात प्रचंड प्रमाणात वाढ झाली होती. या नंतरचा रशियन उद्रेक हा



अनुक्रमणिका

अधिक राजकीय होता आणि तो अधिक खूनी होता. इ. स. १९०३ च्या दरम्यान जपान बरोबरचे युद्ध आणि इ. स. १९०५ सालची क्रांती या दोन्ही कारणामुळे हा उद्रेक रशियात सर्वत्र पसरला. रशियात त्यावेळी सक्तीची सैन्य भरती चालू होती. त्याबद्दल जो असंतोष होता, त्याचा रोख ज्यू कडे वळवून, त्या असंतोषाला मार्ग करून देण्यात आला. (ज्यू हे ते 'दुसरे' असल्याकारणाने, त्यांना अर्थातच सैन्यात प्रवेश नव्हता व म्हणूनच ते सक्तीच्या सैन्य भरतीबाहेर होते) उजव्या गटाच्या सनातनी राजकारण्यांनी प्रति-क्रांतीवादी झुंडीला ज्यू हे समाजवादी आहेत अशी हुल देऊन, हिंसाचार करण्यास प्रोत्साहन दिल्याकारणाने, ज्यू धर्मियावर होणारे हल्ले हे अधिक अधिक खूनी होत गेले. झारचे सरकार या घडामोडीबाबत काय धोरण पत्करावे यासंबंधी दोलायमान होते. या खूनी हल्ल्यात तीन हजार ज्यू मृत्यूमुखी पडले. हिंसेचे हे भयानकत्व पाहून झार राजवट भयभीत झाली होती. परंतु उजव्या गटांना जनतेची सहानुभूती मिळविण्याच्या कामात उठाव मिळावा यासाठी सरकार भयभीत झालेले असतानाही ज्यू-संहार कार्यक्रमाला सरकारचा पाठींबा आहे असे सांगण्यात आले होते. या हिंसक घटनाविषयी ज्यू धर्मियांची प्रतिक्रीया होणे क्रमप्राप्तच होते. पॅलेस्टाईनमध्ये ज्यूंना स्वत:ची अशी भूमी प्राप्त व्हावी हा विचार ज्यू धर्मियात सर्वत्र पसरला होता. झिऑनिझम या राजकीय चळवळीचे ते उद्दिष्ट होते. रशियातून सक्ती झाल्याकारणाने स्थलांतर करून गेलेच पाहिजे असा जो विचार होता, त्याची ती राजकीय चळवळ हे प्रकटीकरण होते. स्थलांतर या पर्यायातून ज्यू विचारातील धर्मातीतता आणि डावेपण सुचित होत होते. रशियात अशा ही परिस्थितीत ज्या कोणी ज्यू धर्मियांनी राहण्याची इच्छा प्रकट केली, त्यांच्यावर उजव्या गटाकडून अधिक अधिक प्रमाणात हल्ले होऊ लागले. परिणामी त्या-ज्यूंनी डावेपणाकडे जाणारी राजकीय भूमिका घेतली. पण त्याकारणाने 'उजव्या' गटाच्या राष्ट्रवाद्यांनी आपले खूनी धोरण चालू ठेवण्यास प्रोत्साहन मिळाले होते.

परंतु जे काही घडले होते, ते फक्त ज्यू धर्मियांपुरतेच मर्यादीत नव्हते. याच कालखंडात पन्नास लाख बिगर ज्यू धर्मियांनी ते ज्या देशात अल्पसंख्य गणले जात त्या देशातून स्थलांतर केले. या स्थलांतर करणारात स्लोवॅक, क्रोटस, जर्मन आणि स्लोवन्स हे एथनिक अंर्तभूत होते. एकोणिसाव्या शतकात ऑटोमन-तुर्क साम्राज्याचा पराभव सारखा होतच होता. प्रत्येक पराभवानंतर युरोपमधून मुसलमानांनी मोठ्या संख्येने स्थलांतर केले, आणि अनेक जणांना ठारही मारण्यात आले. या घटनेतील अखेरचे प्रकरण इ. स. १९१२ पासूनच्या बाल्कन युद्धात लिहिले गेले. या युद्धकाळात पांच लाख ऑटोमन-तुर्क देशिय ख्रिश्चनांनी उत्तरेकडे पलायन केले. कदाचित तेवढ्याच संख्येच्या मुसलमानांनी दक्षिणेकडे पळ काढला होता. या पळापळीचे कारण असे होते की युद्धकाळात ख्रिश्चन/तुर्क जो कोणी शत्रु असेल त्याच्याबरोबर आपल्या धर्मामुळे त्याच्याबाजूचे आहोत असे समजले जाईल आणि त्याची प्रतिक्रिया आपणास यमसदनास पाठविण्यात हाईल अशी भिती त्या शरणार्थींच्या मनात होती. धरतीवादी राष्ट्रवाद, त्याजबरोबर दिवसेंदिवस वाढणारा राज्यवाद या कालखंडात

अधिक अधिक प्रखर होत गेले. परंतु पहिल्या महायुद्धाने, त्या धरतीवादी राष्ट्रवाद आणि राज्यवादाचे रूपांतर वंशच्छेदात केले होते. या वंशउच्छेदात जे कोणी शरणार्थी हाते, त्यांनी आपल्या संख्येला न साजेशी भूमिका बनवली होती. न साजेशी या अर्थाने, हे शरणार्थी जेथे गेले तेथे अल्पसंख्यच होते. थोडक्यात 'ते दुसरे' होते. परंतु या अल्पसंख्यांच्या येण्यामुळे धरतीवादाला जो उठाव मिळाला, तो त्या त्या देशातील बहुसंख्याकाच्या अस्तित्वामुळे मिळाला असता त्यापेक्षा अधिक होता.

**आर्मेनियन वंशउच्छेद**

पहिल्या महायुद्धाबरोबरच प्रचंड प्रमाणावरील 'वंश-उच्छेदही' आला. इ. स. १९१५ साली तुर्कांनी आर्मेनियन लोकांची सरसकट केलेली कत्तल, ही घटना युरोपच्या परीघाबाहेर घडलेली आहे. एका मागासलेल्या अथवा 'रानटी' इस्लामी संस्कृतीत तो वंशउच्छेद घडला असे मानता कामा नये. (हे सांगण्याचे कारण आर्मेनियन हे ख्रिश्चन होते, तेव्हा इस्लामचा इतिहास लक्षात घेता त्यांची कत्तल होणे हे क्रमप्राप्तच असे ख्रिश्चन धर्मी युरोपिय विद्वान म्हणतील म्हणून हा इशारा) एक **आधुनिकीकरण** होत असलेल्या एका आधुनिक राज्याकडून झालेले हे हत्याकांड होते. युरोपियन सत्ता राजकारणात तोवर त्या सत्तेला महत्त्वाचे स्थान होते. अत्यंत प्रगत अशा युरोपिय आदर्शांना त्या देशाची बांधिलकी होती. अशा या देशाकडून, तो मानवी संहार झाला होता. याचे स्मरण ठेवले पाहिजे. म्हणूनच त्या प्रकरणाची विस्ताराने चर्चा करण्यात आलेली आहे.

त्या हत्याकांडात दहा लाखाहून अधिक आर्मेनियन ख्रिश्चनांची हत्या झाली. तुर्कस्थानमध्ये राहणाऱ्या एकंदर आर्मेनियन रहिवाश्यांपैकी पन्नास (५०) ते सत्तर (७०) टक्के लोकांचा खून करण्यात आला होता. एखादा इस्लाम धर्मियप्रेमी अगर एखादा भारतीय हिटलर प्रेमी- हे खून तसे कमी शिघ्रतेने झाले असे सांगेलही- व हे विधान एका अर्थाने खरेच आहे- हे प्रतिपादन करणारे, अधिक करून इस्लामप्रेमी असे सांगतील की हिटलरच्या 'फायनल सोल्युशन' मध्ये झालेल्या ज्यू धर्मियांच्या खूनापेक्षा हे प्रत्यक्षात झालेले खून- अर्थात आर्मेनियन ख्रिश्चन धर्मियांचे त्यामानाने कमी वेगाने व म्हणूनच कमी संख्येने झाले होते. ही संख्या कमी होती याचे कारण शेजारच्या तटस्थ देशात आर्मेनियन ख्रिश्चन धर्मीयांना पळ काढता येत होता. पहिल्या महायुद्धाच्या काळात शरणार्थी ठरलेला हा सर्वात मोठा गट. तुर्कस्थानमध्ये त्यावेळी इत्तीहाडीस्त (ITTIHADIST) (तरुण तुर्क) सरकारची राजवट होती. या सरकारच्या सर्वोच्च पातळीवर असलेल्या कमिटी ऑफ युनिटी ॲन्ड प्रोग्रेसने (Cup) (ऐक्य आणि प्रगती समिती) हा संहार कार्यवाहीत आणण्याचा निर्णय घेतला होता. निष्ठावान हत्तीहाडीस राज्यपालांकरवी या हुकुमाची अंमलबजावणी करण्यात आली. या निष्ठावान राज्यपालांनी स्थानिक पातळीवरचे सैनिकी अधिकारी पोलीस आणि नागरीकही या सर्वांची या हुकुमाची अंमलबजावणी करण्याकरता योजना केली होती प्रत्येक पातळीवरच्या काही

अधिकाऱ्यांनी हे दुष्कृत्य करण्यास स्पष्टपणे नकार दिला. या अशा-ज्या उदाहरणाबद्दल माहिती उपलब्ध आहे-त्यापैकी बहुतेकांना नोकरीतून मुक्त करण्यात आले. याचा परिणाम असा झाला की जे अधिकारी सुरुवातीला दोलायमान मनस्थितीत होते. त्यांनी आपली नोकरी व हुद्दा कायम राखावयाचा असल्याने वरीष्ठांनी दिलेला हुकूम शिरसावंद्य मानण्याचे ठरविले. मुलकी आणि सैनिकी शासनाबरोबर, आणखी एका तिसऱ्या संघटनेकरवी हा वंशउच्छेद करण्यात आला होता. ही संघटना स्पेशल ऑरगनाइझेशन (खास संघटना) या नावाची ही कुविख्यात संघटना. या संघटनेची सदस्य संख्या तीस हजार होती. या संघटनेतील सर्व सभासदांना या दुष्कृत्यात सामिल करून घेण्यात आले नव्हते. परंतु इत्तीहादीसांचे या शुद्धीकरणाबाबत जे उद्दिष्ट होते त्यांच्याशी या संघटनेची ज्या अधिकाऱ्यांची बांधिलकी होती. अशाच अधिकाऱ्यांची हे अमानुष कृत्य करण्याकरता खास निवड करण्यात आली होती.

तुर्कस्थानचे आधुनिकीकरण करू इच्छिणारे सेनाधिकारी, शहरवासी, व्यापारी, वकील तशाच स्वरूपाचे व्यवसाय करणारे मध्यमवर्गीय आणि विशेष करून डॉक्टर हे सारे इत्तीहाडीस चळवळीचा गाभा होते. युरोपच्या अर्ध्या भागात जशा प्रकारची राजकीय हालचाल होत होती, तशाच प्रकारची चळवळ तुर्कस्थानात चालू रहावी हे त्या चळवळीचे उद्दिष्ट होते. युरोपमधून आलेले तुर्की शरणार्थी देखिल या चळवळीत महत्त्वाची कामगिरी बजावित होते. लोकशाहीचे नाव घेऊन, त्या **अबदुल हमीद** अधिपती असलेल्या ऑटोमन राजवटीची त्यांनी इतिश्री केली होती. अर्थात कोठच्या प्रकारची लोकशाही तुर्कस्थानमध्ये प्रस्थापित करावयाची आहे, हे त्यांनी उघड केलेले नव्हते. धरतींवादी राष्ट्रवादाला त्यांच्या चळवळीत महत्त्वाचे स्थान मिळालेच होते. हे तरुण तुर्क राज्यावर आल्यानंतर हा राष्ट्रवाद ताबडतोब प्रखर केला गेला होता. बहुधार्मिक, बहुएथनिक ऑटोमन साम्राज्य हे 'मागासलेले' आहे म्हणून त्यांनी त्याचा निषेध केला होता. म्हणूनच ते त्याज्य ठरविण्याची त्यांची इच्छा होती. इस्लामची **'जिहाद'** ही प्रकल्पना ही जनतेला कार्यप्रवण करण्याच्या कामात एक सोईस्कर अशी शक्ती आहे असे त्यांना आढळून आले होते. असे होते तरी आपल्या राष्ट्राची अस्मिता (IDENTITY) ही इस्लामिक नसून ती एथनिक आहे असे चित्र त्यांनी आपल्या मनात कल्पिले होते. तुर्कस्थानापासून मध्य आशियातील तुर्की भाषिकांचा भूप्रदेश, या सर्व भूभागाचे नांव **'तुरानिया'** असावे असे त्यांनी निर्देशित केले होते. इतिहासात होऊन गेलेल्या देशामागून देश पादाक्रांत करणाऱ्या महान पराक्रमी योद्धांचे- उदा. अटीला, चंगिझखान, यांचे आपण वारस आहोत असे ते मानित असत. याच काळात युरोपमध्येही निदान सहा धरतीवादी राष्ट्रवाद उदयास आले होते. याच 'तुरानिया' राजवटींवर हक्क सांगणारा एक युरोपिय प्रतिस्पर्धी त्यात होता- हंगेरीतील फॅसिस्ट चळवळ. युरोपियन सत्तांनी अगदी अलीकडच्या काळात नष्ट केलेले ऑटोमन साम्राज्य पुन्हा एकदा प्रस्थापित करून पश्चिम आशियाच्या दिशेने त्या साम्राज्याने आगेकूच करावी ही **इत्तीहादीसांची** मनिषा होती.

या इत्तीहादीसांना असे आढळून आले की आपले उद्दिष्ट साध्य करण्याचे काम या आर्मेनियन लोकांनी रोखून धरले आहे. **एक** तुर्कस्थानने ख्रिश्चन भाषिक ज्या भागात बहुसंख्य होते तो प्रदेश तुर्कस्थानने गमाविलेला होता. **दोन** तुर्कस्थानात अजूनही रहात असलेली ख्रिश्चन धर्मियांची जमात आर्मेनियन हीच होती, **तीन** या ख्रिश्चन धर्मिय जमातीचे संबंध ज्या युरोपियनांनी ऑटोमन साम्राज्य पादाक्रांत केले होते त्यांच्याशी अगदी उघड उघडपणे होते. अशा आर्मेनियन जमातीच्या वसाहत मुख्यत्वे करून तुर्कस्थानच्या पूर्वेला होती. तुर्कस्थान बाहेरच्या तुरानियन मानल्या गेलेल्या लोकांशी संपर्क साधण्याच्या मार्गावर ही ख्रिश्चन जमात 'आव्हानात्मकपणे खडी होती. हे सर्व आर्मेनियन ख्रिश्चन धर्मातील तो इस्टर्न ऑर्थाडॉक्स ख्रिश्चन या नावाचा जो पंथ आहे त्याचे पंथाचे होते. म्हणूनच ते आपल्या जमातीच्या संरक्षणासाठी बाहेरून मिळणारे संरक्षण या स्वरूपात ते रशियावर अवलंबून होते. तसेच या संदर्भात आणखी हेही लक्षात ठेवावयास हवे की काही आर्मेनियन राष्ट्रवादी रशियन लोकांना पाठींबा देत होते. या पाठींब्याचा मोबदला म्हणून, रशियनांनी आर्मेनियन ख्रिश्चन धर्मियांचे राज्य प्रस्थापित करण्याचे वचनही दिले होते. या सर्व वस्तुस्थितीचा परिणाम एका वेगळ्याच ठिकाणी झाला. आर्मेनियन लोकांच्या गद्दारीबद्दल तरुण तुर्कांची खात्री झाली होती. त्याचे असे झाले होते की, कॉकेशस या भागात रशियनांच्या विरुद्ध युद्ध करण्याच्या उद्देशाने ऑटोमन सम्राट एनव्हर पाशा यांचे सैन्य इ. स. १९१५ साली गेले होते. या सैन्याचा तुर्कस्थानला शरमेने मान खाली घालावी लागेल असा दारुण पराभव झाला. म्हणूनच येथे उल्लेखिलेली तिन्हीही कारणे व वैशिष्टे यामुळे आर्मेनियन-ख्रिश्चन हे धरतीवादी तुरामियन राष्ट्राच्या शत्रूंचे हस्तक आहेत असे वाटण्यात झाला. थोडक्यात आर्मेनियन ख्रिश्चन हे बळीचे बकरे ठरले होते. पहिले महायुद्ध चालू असल्याकारणाने वेस्टर्न आँतांन्त (पाश्चिमात्त्य मित्रसंघ) आणि रशिया या पैकी कोणालाही त्या ख्रिश्चन धर्मियांचे संरक्षण करता आले नाही. या संदर्भात म्हणजे एनव्हर पाशांचा पराभव, रशियाने आर्मेनियन ख्रिश्चनांना स्वतःचे असे राज्य स्थापन करण्याबाबत दिलेले आश्वासन, तुरानियन- धरतीवादी- राष्ट्र-राज्याला आर्मेनियन ख्रिश्चन जमात ही आव्हान देणारी व धाकदपटशा दाखविणारा शत्रू आहे अशी प्रतिमा तयार होते. ही प्रतिमा ज्यू धर्मियांशाही अगदी तंतोतंत जुळणारी आहे. विवेचनाच्या या ठिकाणी एक प्रश्न उपस्थित करणे वाजवी आहे व तो प्रश्नही विचारात घेण्यासारखाच आहे. प्रश्न असा आहे की तुर्कांच्या राज्यात ग्रीक, ज्यू, अगर कुर्द हे जळून खाक न होता फक्त आर्मेनियनच का जळून खाक झाले. या प्रश्नांची दोन उत्तरे संभवतात. एक ग्रीक आणि ज्यू यांना परकीय राष्ट्रांचे संरक्षण होते. आपल्या संकल्पित नव्या तुरतनियन राज्याला आव्हान देण्याच्या व धोका उत्पन्न करण्याच्या दृष्टीने कुर्द हे तसे फारच 'आदिम अवस्थेत' असलेले, मागासलेले लोक होते. या जमातीतील लोकांवर सक्ती करून मुळ प्रवाहात सामावून घेता आले असते. थोडक्यात खुनी 'शुद्धीकरण' या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी ती जमात लायक उमेदवार नव्हती. हे सर्व लक्षात घेतल्यानंतर ध्यानात येईल की हिटलर प्रणित ज्यू धर्मियांचे

'फायनल सोल्यूशन' या नावाखाली झालेले खुनी 'शुद्धीकरण' ही केवळ एकच व वैशिष्ट्यपूर्ण घटना नव्हती. आधुनिक धरतीवादी-राष्ट्र-राज्यवाद या विचार धारेने केलेल्या वंश-उच्छेद मोहिमेतील अत्यंत निघृण व तळ गाठणाऱ्या वंश-उच्छेदाला, इ. स. १९१५ सालीच सुरुवात झाली होती.

**नाझी 'वंश-उच्छेदा'कडे आगेकूच**

एखाद्या देशातून पळ काढणाऱ्या अल्पसंख्याकांच्या लोकसंख्येत पहिल्या महायुद्धामुळे प्रचंड भर पडली होती. वेळप्रसंगी त्यांच्यावर केल्या जाणाऱ्या सक्तीतही भर पडली होती. उदा. ऑस्ट्रीयन सैन्याने एकदा सर्व एथनिकापैकी दहा टक्के असलेल्या सर्व लोकांना एके ठिकाणी आणले आणि त्यांची रवानगी बल्गेरीया आणि हंगेरी या देशात उभारण्यात आलेल्या श्रमछावण्यात केली. या सर्वांपैकी जवळ जवळ सर्वांचा वापर वेठ बिगारीसाठी करण्यात आला होता. पहिल्या महायुद्धामुळे बहुतेक सर्व बहु-राष्ट्रकी राज्ये निकालात निघाली होती. परंपरागत असो जो सनातनपणा (CONSERVATISM) होता तोही मोठ्या प्रमाणात कमकुवत झाला. आमजनतेबद्दल या वर्गाला अगोदर गैरविश्वास होता त्यात वाढ झाली. राज्याने हस्तक्षेप आणि नियोजन करून विकास करून घेता येईल याबाबत एक आर्थिक आदर्श या महायुद्धामुळे प्राप्त झाला. तसेच राष्ट्रीय उद्दिष्टांचा पाठ-पुरावा करण्यासाठी सामुदायिक जनताकृती संबंधात एक सैनिकी आणि 'समांतर सैनिकी' (PARAMILITARY) आदर्श निर्माण झाला होता. देशातील जनतेला कार्यप्रवण करून, निर्माण झालेल्या जनता सैन्याने तो आदर्श समोर ठेवून कार्य करावे अशी अपेक्षा होती.

आत्यंतिक टोकाला गेलेल्या उजव्या गटानी 'बोलशेव्हिझम' या आपल्या शत्रूची सांगड देशातील एथनिक शत्रूबरोबर घातल्या कारणाने, ज्यू धर्मियांच्या कत्तलीची एक अधिक जोरदार लाट पूर्व युरोपमध्ये युद्ध समाप्तीबरोबर निर्माण झाली होती. उजव्या गटाच्या जर्मन आणि इटालियनांनी स्लाव जमातीवर हल्ले केले. याचा अर्थ असा नव्हे की ते ज्यू धर्मियांना विसरले होते. त्यांच्यावर करण्यात येणारे हल्ले चालूच होते. खरे म्हणजे उजव्या गटाचे बहुतेक लोक ज्यू विरोधी आणि स्लाव विरोधी होते. परंतु त्यांच्या नेत्यांनी ही भावना व विचार चुकीचा आहे. असे वागणे हे आंतरराष्ट्रीय समाजवाद अगर अराज्यवाद यांना सोडून आहे हे माहित होते. उदा. रशियन यादवी युद्धाच्या काळात लाल सैन्याच्या तुकड्यांनी ज्यू धर्मियांच्या कत्तलीचे काही कार्यक्रम हाती घेतले होते. परंतु त्याहीपेक्षा अधिक प्रमाणात स्थानिक शेतकरी वर्गाने या प्रकारचे कार्यक्रम अधिक जोरदारपणे अंमलात आणले होते. अशा प्रकारे एक लाख ज्यूंचा खून करण्यात आला होता. परंतु यापैकी २५ हजार ज्यूंचा - म्हणजे युक्रेर्नियातील एकंदर ज्यूंपैकी दहा टक्के - खून युक्रेनियन राष्ट्रवाद्यांनी केला होता. पन्नास हजारावरून अधिक ज्यूंचा खून रशियन व्हाईट आर्मीने केला होता. बोलशेव्हिका विरुद्ध लढणाऱ्या या व्हाईट आर्मीने, त्यावेळी रशियावर जे दुर्दैव ओढवले होते, त्याचे कारण ज्यू प्रणीत बोलशेव्हिक क्रांतीच्या रोगट जंतूत आहे असे सांगून ज्यूला दोषी ठरविले

होते. जर्मनीत भविष्यकाळात नात्झीच्या तोंडी जी भाषा येणार होती, त्याची ती नांदी होती, झारकालीन रशियातील कॅडेट पक्षाचे लोक, हे त्या मानाने अधिक उदारमतवादी समजले देतात. परंतु त्यांनी देखिल त्या ज्यू कत्तलींच्या कार्यक्रमाला विरोध दर्शविला नाही, अथवा त्याचा कधी निषेधही केला नाही. पुढे व्हाईट आर्मीचा पराभव झाल्यानंतर उजव्या गटातील लोकांनी पश्चिम युरोपकडे पलायन केले, या पळ काढणाऱ्या रशियनांनी आपल्या बरोबर प्रोटोकोल्स ऑफ द एलडर्स ऑफ झिऑन ही पुस्तिका आणली. ही पुस्तिका तशी चांगलीच कुप्रसिद्ध पण प्रभावी ठरली. ज्यूंनी जग पादाक्रांत करण्याबाबत केलेल्या तथाकथित कटाची माहिती या पुस्तिकेत आहे, ही पुस्तिका निरवालस बनावट आहे हे मागाहून सिद्धही झाले. परंतु ज्यू-बोलशेव्हिक कटाबद्दलची संमिश्र प्रकल्पना, युरोप खंडातील पूर्व भागात सर्वत्र पसरली. रशिया, युक्रेन, पोलंड, बाल्टिक राज्ये, रुमेनिया आणि हंगेरी या सर्व देशातील उजव्या गटाच्या चळवळींनी ज्यूंचा खून करण्यासाठी स्थानिक लोकसंख्या वा जनतेचे नेतृत्व केले होते.

अमेरिकेचे अध्यक्ष वुड्रो विल्सन, यांच्या नावाने प्रसिद्ध असलेल्या 'राष्ट्रीय- स्वयं-निर्णयांच्या' तत्वाची अंमलबजावणी होत असताना, एखाद्या देशातील अल्पसंख्याकांना परदेशात घालवून देऊन आपल्या देशातील लोकसंख्येचे 'शुद्धीकरण' करणे या विचारास सरकारी पातळीवरही इ. स. १९१८ च्या शांतता तहाने मान्यता दिलेली होती. झेकोस्लोवाकीया आणि युगोस्लाविया या दोन राष्ट्रांचा अपवाद. युरोपमध्ये बाकीच्या राज्यातील प्रत्येक राज्य हे त्या त्या राज्यातील प्रभावी एथनिक गटाकडे सुपूर्द करण्यात आले होते. एखाद्या राज्यातील एकंदर लोकसंख्येत, या एथनिक गटाची संख्या पासष्ट टक्के (६५%) असली पाहिजे ही अट होती. ही अवस्था ज्या कोणास मान्य नव्हती त्यांनी एक वर्ष उलटण्याच्या आत, देशत्याग करून दुसरीकडे जाण्याचा त्यांना हक्क होता. तशी मोकळीक या शांतता तहात ठेवलेली होती. अशी अपेक्षा होती की जे कोणी एथनिकस् हे ज्या देशात बहुसंख्य आहेत त्या ठिकाणी देशत्याग करून एखाद्या देशातील अल्पसंख्य जातील. (उदा. समजा अखंड हिंदुस्थान स्वतंत्र झाला असता, तर शांतता तहानुसार अखंड हिंदुस्थानातील मुसलमानांनी, अफगाणीस्तान, अरबस्थान, अगर इंडोनेशिया या देशात स्थलांतर करून जावे अशी अपेक्षा होती) एक वर्ष उलटल्यानंतर जे एथनिक अल्पसंख्य देशत्याग न करता जे आपल्या मूळ देशातच राहतील, त्यांना या शांतता तहातील अल्पसंख्यांकाच्या हक्कांची हमी घेणारी जी कलमे होती तिचा आदर केला जाईल ह्या आशेवर जगावयाचे होते. परंतु बहुतेक राज्यातून हा आदर राखला गेला नाही; आणि ज्या सत्ता बलाढ्य होत्या, त्यांनीही या शांतता तहातील कलमांची अंमलबजावणी होण्याच्या कामात प्रत्यक्ष कारवाई होत आहे की नाही हे पाहण्याकडे फारसे लक्ष घातले नाही, या शांतता-तहामुळे युरोपमधील एथनिक शरणार्थींच्या संख्येत प्रचंड वाढ झाली- अपेक्षाच तशी होती, परंतु सारेच त्या अपेक्षेनुसार घडले नाही. या तहातील अल्पसंख्याकाविषयक

कलमातून; जे कोणी देशत्याग करतात, त्या मागच्या वस्तुस्थितीचे प्रकटीकरण झालेले नव्हते, आणि ती वस्तुस्थिती त्यात अंतर्भूत नव्हती. एखाद्या देशातील एथनिक अल्पसंख्याकांनी केलेला देशत्याग हा स्वेच्छा केलेला नव्हता, त्या मागे सक्ती होती. स्थानिक पातळीवरची हिंसा, मालमत्तेची जप्ती अशा प्रकारच्या शासकीय वा बिगर शासकीय निर्णयांनी, त्या सक्तीला चालना व प्रोत्साहन मिळाले होते. दिवस गेले तशी त्यात वाढही झाली. वेळप्रसंगी मध्यवर्ती सत्तेकडूनही देशत्याग करण्याबाबत सक्ती होतच होती. इ. स. १९२६ सालपर्यंत अशा शरणार्थींची संख्या एका कोटीच्या घरात गेली. यात तुर्कस्थान आणि ग्रीस या दोन देशात सक्तीने केलेल्या अदलाबदलीचा समावेश आहे. अशी अदलावदल करण्यास मान्यता दिलेल्या लोकातील एकंदर पंधरा लाख लोकात, तुर्कस्थानातून ग्रीक मध्ये आलेले बारा लाख होते. अशीच अदलाबदल ग्रीस आणि बल्गेरीयातही झाली. या शरणार्थींची संख्या दोन लाख ऐंशी हजार होती. २० लाख (वीस लाख) पोल, २० (वीस) लाखाहून अधिक रशियन आणि युक्रेनियन, जवळजवळ १० (दहा) लाख जर्मन, सुमारे दोन लाख पन्नास हजार हंगेरीयन, आणि दोन लाख इस्टोनियन लॅटीव्हियन आर्पीलिथ्रनियन- अशा एथनिक गटात त्या एक कोटी शरणार्थींचे विभाजन होते.

इ. स. १९१४ च्या अगोदर दहा कोटी युरोपियन परक्यांच्या अंमलाखाली होते. हाच आंकडा इ. स. १९१४ नंतर दोन ते अडीच कोटी झाला. पूर्व युरोपमधील देशात अल्पसंख्यासाची संख्या पन्नास टक्के होती. की या सगळ्या गदारोळात, पांच वर्षानंतर पंचवीस टक्क्यावर आली. बहुसंख्य एथनिकना असलेले मानवी हक्क आणि नागरी हक्क यांच्यात जवळ जवळ एक वाक्यता होती. अल्पसंख्याकांना हे हक्क असण्याचा प्रश्नच नव्हता ! पाश्चिमात्य समाजातील त्याकाळातील बलाढ्य सत्ता इंग्लंड आणि अमेरीका यांनी देखिल एथनिक 'शुद्धीकरणास' प्रोत्साहन दिले होते. अधोरेखित करावा असा मुद्दा आहे की हे सारे हिटलरचा उदय होण्यापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर घडले होते.

**सनातन (CONSERVATIVE) विचाराने केलेले धुमभाव**

दोन महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात धरतीवादी राष्ट्र-राज्यवादात् अनेक अनिष्ट प्रवृत्ती शिरल्या होत्या. यात एखाद्या देशातील अल्पसंख्याकांना आणि राज्यकर्त्यांच्या विरोधकांना संपूर्ण नागरीकत्वाचे हक्क मिळण्यापासून वगळण्यात होत असलेल्या प्रयत्नांचा समावेश आहे. जर्मनी, ऑस्ट्रीया, इटाली, पोलंड, लिथुनिया, लाटव्हिया, इस्टोनिया, रूमोनिया, हंगेरी, बल्गेरीया (झेक प्रभुत्वाखालील) ग्रीस, (सर्ब प्रभुत्वाखालील) झेकोस्लोवाकीया, युगोस्लाविया आणि तुर्कस्थान या देशांचा त्यात विशेष करून समावेश होता. ज्यांना एकही राज्य नाही असे काही एथनिकस होते. उदा. स्लोबाकीअनस, युक्रेनियनस, आणि क्रोशियन्स. या एथनिकसच्या राष्ट्रवादी चळवळींनी मूळ धरले व त्याही वरील देशांनी दाखवून दिलेल्या मार्गानेच जाऊ लागल्या होत्या. यातील प्रत्येक एथनिकला आपले स्वतःचे असे

धरतीवादी-राज्य हवे होते. या संकल्पित राज्यात वर्ग-संघर्षाची लक्षणियता नाकारण्यात आली होती. बहुसंख्य म्हणूनच प्रभावी असलेल्या एथनिकस शिवाय जे इतर अल्पसंख्याक होते. त्यांना संपूर्ण नागरीकत्वाच्या हक्कातून वगळण्यात आले होते. सुरुवातीला तरी त्या एथनिकमध्ये अंतर्भूत असणाऱ्या बहुसंख्याकांचा या चळवळींना पाठींबा नव्हता. परंतु त्या जसजश्या मुसंडी मारून पुढे जाऊ लागल्या, तसतसा जगातील सनातन विचारांच्या उजव्या पक्षांनी, आपल्या विचारात जागतिक स्वरूपाचे धुमजाव केले होते. डाव्यां बरोबर स्पर्धा करताना, व करण्यासाठी, त्यांनी जनतेत आंदोलन उभारून तिला त्या धरती-वादी-राष्ट्रवादापाठीमागे उभे करण्याचा प्रयत्न केला होता. युरोपमधील, पूर्व, मध्य, आणि आग्नेय दिशेच्या देशातील उजवे गट आणि राष्ट्रवादी शक्तींनी एकजूट केली होती. काही वेळा उजव्या गटाच्या लोकांनी जनता प्रिय (POPULIST) आणि **फॅसिस्ट** कार्यक्रमही आपलासा केला होता. थोडक्यात फॅसिस्टांची राजकीय कार्यक्रमरूपी वस्त्रे त्यांनी पळविली होती. परंतु असे करीत असताना ते खऱ्याखुऱ्या फॅसिस्ट पक्षियांना दडपून टाकीत होते. हा अशा प्रकारचा धरतीवादी राष्ट्रवाद हा त्या मानाने सौम्य अशा झेक आणि बल्गेरीया या राज्यातील राजवटी आणि अधिक दुभंगलेल्या स्लोवाकीया व क्रोशियन चळवळी वगळता, हा इतर सर्व ठिकाणी पराकोटीचा यशस्वी ठरला होता. राज्यातील शासनव्यवस्था व वर उल्लेखिलेल्या चळवळी त्या धरतीवादी-राष्ट्रवादाच्या कक्षेत व प्रभुत्वाखाली आल्या. यातील फारच थोड्या चळवळी व आंदोलने, ही फॅसिझम स्विकारण्याच्या टोकाला गेली. परंतु इतर अनेक बाबतीत त्यांनी फॅसिझमकडून चांगलीच उसनवारी केलेली होती. उदा. फॅसिस्ट पद्धतीचे संघटन समांतर-सैनिक दलांची **उभारणी** ही समांतर सैनिक दले **हे** आम-जनतेची सशस्त्र आघाडी आहे असे जाहीर करण्यात आले होते. या समांतर-सैनिक दलात आपल्या 'शत्रूत दहशत निर्माण करण्याची ताकद होती. त्याजबरोबर 'लोकांच्यात' विरोध निर्माण होण्याचा संभव होता; त्या विरोधालाही धाकदपटशा दाखवून, दहशत निर्माण करून, त्याला गप्प करण्याचे सामर्थ्य या समांतर-सैनिकी दलात होते.

यातील बहुतेक चळवळीत उजव्या गटातील लोकांचे प्राबल्य होते. म्हणूनच वर्गिय भावना निर्माण होऊ न देण्याकडे त्या झुकलेल्या आहेत याची खात्री करून घेण्यात आलेली असे. त्याजबरोबर त्या फॅसिझमही पत्करणार नाहीत यांचीही काळजी घेण्यात येत असे. परंतु उजव्या गटाचे विरोधक हे राष्ट्राचे लबाड एथनिक शत्रू आहेत असे सांगून त्यांचा निषेध करण्यात येई. बोलशेव्हिक या शब्दाचे द्वारा ते रशियन अथवा आशिया यांच्याशी संबंधित आहेत असेही सुचित केले जाई. या विराधकांपैकी जे उदारमतवादी होते त्यांना फारच सौम्य वागणूक मिळे. त्यांच्या सभा उधळल्या जात, त्यांच्या पुढाऱ्यांबरोबर दंगामस्ती करण्यात येई. धाकदपटशा, दहशत हे मार्ग वापरून, भितीचे वातावरण निर्माण करून, अशा वातावरणात झालेल्या निवडणूकातही लबाडी करून, उदारमतवाद्यांना अधिकाराच्या जागेवरून हुसकावून

लावण्यात येई. सर्वात अधिक कठोर व जुलमी वागणूक समाजवाद्यांच्या वाट्याला येई; त्यांच्यातील लढाऊ कार्यकर्त्यांची तुरुंगात रवानगी होत असे. त्यांच्यावर बंदी घालण्यात येई, वेळप्रसंगी त्यांचा खूनही करण्यात येई. या सर्व कृतीत समांतर-सैनिक अग्रभागी असत. परंतु समाजवाद ही एका विशिष्ट प्रकारची समाज-रचनेवर असलेली श्रद्धा आहे. ही श्रद्धा चुकीची आहे असे सांगून तिचा त्याग केल्यानंतर समाजवाद्यांना 'आम्ही लोकात' सामिल करून घेण्यात येत असे. सक्तीने केलेल्या सामिलीकरणाचाच तो प्रकार आहे. वेगवेगळ्या धर्माचे जे अल्पसंख्य होत. त्यांनाही वेगवेगळ्या तऱ्हेची वागणूक देण्यात येई. या सर्व राज्यात- यात राज्यहीन अशा तीन प्रमुख चळवळींचा अंतर्भाव आहे- आपला स्वत:चे असे ख्रिश्चनधर्म पंथ होते. हे धर्मपंथ राष्ट्राचा 'आत्मा' आविष्कृत करतात असा समज होता. अल्पसंख्य गटाचे जे धर्मपंथ होते व त्यांची जी प्रार्थना स्थळे होती, या दोघांच्या नशिबी छळ हीच गोष्ट होती, यदाकदाचित दुसऱ्या एखाद्या राष्ट्र-राज्याचा या छळ करणाऱ्या राज्यावर पुरेसा प्रभाव असला, तर मग या छळातील प्रखरता कमी होई एवढेच. अगदी अल्पसंख्य असे ख्रिश्चन धार्मिक पंथ- उदा. जेहोबाज विटनेस अथवा ऑर्थाडॉक्स इनोसेनटीस्टस यांना बाहेरच्या देशात संरक्षण मिळण्याचा संभव नव्हता. त्यांचा कमालीचा छळ केला जाई. ते काही असले तरी ख्रिश्चन धर्मपंथही ही सरतेशेवटी एका विशिष्ट प्रकारच्या विचारांवर वा कर्मकांडावर असलेली श्रद्धा आहे. म्हणूनच समाजवाद्यांप्रमाणे या धर्मपंथियाच्या विचारात बदल करून त्यांना 'आम्ही लोकात' सामिल होता येत असे. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात क्रोशियन या एथनिकांच्या उसताशे (USTACHE) या नावाचा समांतर सैनिकांनी ऑर्थाडॉक्स सर्ब धर्मपंथियावर प्रचंड प्रमाणावर धर्म-पंथातर करण्याची सक्ती केली होती. अर्थात हे धर्मपंथातर होत असताना मधून मधून प्रचंड प्रमाणावर सर्व एथनिकांचे खूनही करण्यात येत होते.

परंतु इ. स. १९३० साल उजाडले त्यावेळेस, एथनिक राज्यात एथनिक अल्पसंख्याकावरच बहुतेक सर्व हल्ले होत होते. जर्मन आणि झेक, जर्मन आणि पोल, पोल आणि युक्रेनियन, रूमेनियन आणि मज्जार (हंगेरी), क्रोट आणि सर्ब इत्यादी इत्यादी. यातील प्रत्येक एथनिक हा दुसऱ्या एथनिकापेक्षा आपणाकडे चिरकाल टिकणारे वेगळेच सारतत्व आहे असे मानित असे. हे सारतत्व काही प्रमाणात जैविक, काही प्रमाणात सांस्कृतिक होते. पण त्यात बदल होत नसे. आपल्या राष्ट्राच्या अंगभूत (INTEGRAL) ऐक्याचे संरक्षण करण्याच्या उद्देशाने, हे प्रभावी एथनिक राष्ट्रीय कायदे करीत. या कायद्यानुसार, नोकरशाही आणि शिक्षण क्षेत्रात अल्पसंख्याकांना बहुसंख्य एथनिकापेक्षा वेगळी म्हणजे कनिष्ठ दर्जाची वागणूक देण्यात येत असे. अल्पसंख्याकांच्या सांस्कृतिक आणि राजकीय संघटना आणि संस्था यांच्या स्वातंत्र्याला कात्री लावण्यात आली होती, परंतु अशा प्रकारे सक्ती करून अल्पसंख्याकांना 'आम्ही लोकात' सामिल करून घेणे हे अनेकांच्या दृष्टीने पुरेसे नव्हते. यानंतर जे काही महाभयानक घडले, ते जर्मनीचे जागतिक ऐतिहासिक असे सामर्थ्य आणि हिटलर हा जागतिक-ऐतिहासिक असा अपघात, आणि फॅसिझमचा उदय, या सर्वांच्या



अनुक्रमणिका

प्रभावामुळे घडले. नात्झी नेतृत्व हे चांगलेच वेडे होते. ते जर तसे नसते, तर मग 'वंशउच्छेद' ही त्या चळवळीच्या प्रभावाची परणीती ठरली नसती. एथनिक शुद्धीकरणाच्या या अंतिम अवस्थेपेक्षा एखादी मधली अवस्था जगाला कदाचित अनुभवावी लागली असती. तथापी येथवर ज्या प्रक्रीयेचे वर्णन केलेले आहे, त्याला भिषण असे आगळेपण प्राप्त झाले ते नात्झी प्रणित वंश-उच्छेद आणि दि फायनल-सोल्युशन (अखेरचे उत्तर) हे त्यांचे धोरण.

### एथनिक शुद्धीकरण ते संपूर्ण एथनिक वंशउच्छेद

नात्झींनी लाखोंचे खून केले. पण मानसिक अधुत्व असलेल्या जर्मन आणि जर्मन नसलेल्या ऑस्ट्रीयन बिगर ज्यू-खिश्चनांचा या खून सत्रात क्रमांक पाहिला होता. मानसिक दृष्ट्या अधुत्व असलेले, कमतरता असलेले आणि जैविक दृष्ट्या जे कोणी वेगळेच होते, अशा सर्वांचे खच्चीकरण करण्याची प्रथा विसाव्या शतकाच्या सुरुवातीला प्रॉटेस्टंट युरोप आणि अमेरीका या देशात सर्वत्र होती. एक प्रकारचे ते जैविक 'सामिलीकरण' होते. म्हणजे जे कोणी असे नाहीत ते आपोआपच एकमेकात 'सामिल' होत. नात्झींनी ही प्रथा आणखीनच विस्तारीत करून, ती खूनांच्याद्वारे शुद्धीकरण या अवस्थेपर्यंत नेऊन पोचवली. दुसरे महायुद्ध चालू होण्याअगोदर जनतेची 'जैविक शुद्धता' टिकवून धरण्यासाठी सत्तर हजार मनोरुग्णांना ठार मारण्यात आले होते. 'वंश्उच्छेदा'चे धोरण अंमलात आणण्याबाबत येथून पुढे निम-सैनिकी दले आघाडीवर होती. इ. स. १९३९ नंतर मनोरुग्णांच्या या गटात रशियन, पोलिश व फ्रेंच या लोकांचाही अंतर्भाव करण्यात आला. वसाहतवादी ढंगाच्या 'स्थानिक' शुद्धीकरणांनी मुसंडी मारून आर्य वसाहतवाद्यांसाठी जमिन करून देण्याच्या उद्देशाने वीस लाखाहून अधिक 'पोलिश' लोकांचा खून करण्यात आला. जर्मनीत काही 'पोल' अल्पसंख्य इ. स. १९३९ च्या अगोदर पासूनच रहात होते. तसेच काही जर्मन पोलंडमध्ये अल्पसंख्य होते. या दोन्हीही जमातीत नेहमीच तणावाचे वातावरण होते व आजही त्यात फारसा फरक झालेला नाही. दुसऱ्या महायुद्धोत्तर असलेल्या तणावयुक्त वातावरणात वीस लाखाहून अधिक लोकांचा खून होऊन ते वातावरण अगदी शिगेला पोचले.

ज्यू धर्मिय आणि रशियन हे यानंतर नात्झी हिंसेचे प्रमुख शिकार बनले. जवळ जवळ साठ लाख ज्यू-धर्मियांची अत्यंत निघृणपणे हत्या करण्यात आली होती. एकंदर सर्व युरोपियन ज्यू धर्मियांपैकी जवळ जवळ तीन चर्तुथ्यांश लोकांचा खून करण्यात आला होता, जवळ जवळ सत्तर लाख बिगर ज्यू-सोव्हियट नागरीक आणि तीस लाख सोव्हियट युद्ध कैदी यांना ठार मारण्यात आले. पण हे खून प्रामुख्याने व मुलतः राजकीय शुद्धीकरणाचा भाग होता. नात्झींनी या बळींना बोलशेव्हिक हे बिरुद वापरून त्यांना टिपले होते. असे होते तरी आपल्या हिंसेच्या भक्षस्थानी पडलेल्या बळींचे वर्णन UNTER MENSCHEN (मानव प्राणी जाती पेक्षाही खालच्या पायरीवरचे) असे केले जात होते. ज्यू धर्मिय देखिल एथनिक/धार्मिक स्वरूपाची- बळी देण्यास योग्य असे लक्ष होते. परंतु त्यांचे सर्वसामान्यपणे

वर्गीकरण ज्यू-धर्मिय- बोलशेव्हिक असे केले जाई. डाव्यांच्या आंतरराष्ट्रीय कटात ज्यू धर्मिय आणि रशियन हे दोघेही सामिल आहेत या दृष्टीकोनातून त्यांच्याकडे पाहिले जात होते. पण त्याचबरोबर पहिल्या महायुद्धानंतर, जर्मनीला गुडघे टेकावयास लावणाऱ्या आर्थिक भांडवलशाही आणि उदारमवादी सत्ता या ज्या राज्यात सहभागी आहेत अशा आंतरराष्ट्रीय कटांशीही ज्यू धर्मियांचा संबंध लावण्यात आला होता. जर्मन सैन्याने कोणास ठार मारावे या संबंधी जे हुकुम देण्यात आले होते, त्यात सर्वसामान्यपणे राजकीय आणि एथनिक उद्दिष्टे गुरफटलेली होती. या हुकुमात सर्व ज्यू धर्मिय जिप्सी, एथनिकदृष्ट्या खालच्या दर्जाचे लोक, समाजकंटक, आणि सोव्हियट पोलिटीकल कॉमिस्सारस यांचा उल्लेख होता, अगर युद्ध कैद्यांत जे कोणी राजकीयदृष्ट्या आणि एथनिक दृष्ट्या अनिष्ट गट असतील त्यांचा अगर दुय्यम दर्जाचे आशियाई गुन्हेगार, समाजकंटक आणि "आंदोलक आणि घरभेदे' या सर्व भिन्न गटांचा उल्लेख होता. मनोरुग्णापासून सुरुवात झालेल्या या हत्याकांडात सरतेशेवटी जिप्सी आणि इतर छोटे एथनिक गट यांची पाळी होती. या छोट्या एथनिक गटात, काशुबियन, सोरबियन आणि क्रिमटचाक इत्यादी गटांना समाविष्ट करण्यात आलेले होते. शारिरीक व्यंग असलेले लोक, गुन्हेगार, समलींगी संभोगवादी, जेहोबाज विटनेस पंथीय ख्रिश्चन या अल्पसंख्य गटाबरोबरच हे येथे उल्लेखिलेले सर्व गट 'वंश-उच्छेद' सत्रातील बळी ठरले होते. याचे कारण नात्झींना आपल्या तत्वप्रणालीत आयत्त (CONTIGENT) अशी सुसूत्रता आहे हे दाखवून द्यावयाचे होते. सौम्य धरतीवादी- राष्ट्रवाद्याप्रमाणेच नात्झींनाही ज्या शत्रूंपासून संरक्षण करण्याकरता समजाचे शुद्धीकरण करावयाचे आहे, त्या शत्रू विषयी संमिश्र राजकीय-एथनिक स्थानिक-आंतरराष्ट्रीय स्वरूपाची भावना विकसित केली होती.

अनेक सर्वसामान्य जर्मन 'वंश-उच्छेद' करण्याच्या कृष्णकृत्यात सामिल होते. हे कृत्य प्रत्यक्ष अंमलात यावे यासाठी जी कारवाई झाली होती त्यात ते आघाडीवर होते. परंतु हे कृष्णकृत्य करण्याच्या कामात गुंतलेल्यात 'गाभा' समजला जाईल अशा नोकर वर्गातील लोक अगदी वस्त्रगाळ, खरेखुरे नात्झी होते. एकंदर १५८१ जर्मन युद्ध गुन्हेगारांच्या आयुष्यांची नुकतीच तपासणी होऊन त्याविषयी तपशीलात जाऊन संशोधनही झालेले आहे. या १५८१ लोकांनी 'वंशउच्छेद' करण्यात पुढाकार घेऊन, प्रतयक्ष संहारातही अनेक वेळा भाग घेतला होता. त्यांच्यापैकी जवळजवळ सर्वच लोक नात्झी संघटनेचे सभासद होते. किमान दोन तृतीयांश लोकांनी नात्झी कार्यक्रमात भाग घेतला होता, व त्यासंबंधीचा त्यांचा इतिहासही लांबलचक होता; आत्यंतिक स्वरूपाची हिंसा करण्याबाबत त्यापैकी अर्ध्याहून अधिकांना अनुभव होता असे संशोधनात आढळून आले. जर्मनीने युद्धात गमविलेला प्रदेश, जर्मन सीमेवर ज्या प्रदेशाला आत्यंतिक 'धोका' निर्माण झाला होता असा प्रदेश, सरकारी कक्षेतील उद्योगधंदे आणि विभाग या सर्वांच्या एकंदर कार्यपद्धतीत, नात्झी तत्वप्रणालीला

फारच शक्तीशाली प्रतिसाद होता. याच विभागात नात्झी विचारांचे प्राबल्य होते. याच विभागातून त्या 'गाभा' ठरलेल्या विभागात भरती झाली होती. सरकारी कार्यक्षेत्र आणि सरकारी उद्योगधंदे या विभागात काम करणारे जे लोक होते त्यांच्यातून एकंदर नात्झी तत्वप्रणालीला फारच शक्तिशाली प्रतिसाद मिळत होता. याही विभागातून त्या 'गाभ्याला' रंगरूट प्राप्त झाले होते. या सर्व अनुभवामुळे हे सर्वजण राष्ट्र-राज्यवादाचे जोरदार पुरस्कर्ते झाले. आवश्यक ते सर्व उपाय-यात प्रचंड प्रमाणावर हिंसा करणे याचाही अंतर्भाव होता- योजून जर्मन धरतीतून वर आलेल्या राष्ट्र वंशाला 'शुद्ध' ठेवण्याकडे त्यात कसलीही भेसळ असता कामा नये, हे करण्यासाठी उत्सुक होते. धरतीवादी-राष्ट्रवादी चळवळ आणि समांतर लष्करी दलामध्ये, नात्झीनां आपल्या बरोबर खून-संहार या कृष्णकृत्यात सहकार्य करणारे भाईबंद आहेत असे आढळून आले होते. लाटव्हिया या देशातील थंडर क्रॉस ही संघटना, युक्रेनमधिल ओएनयू, हंगेरी आणि रुमेनिया या देशातील 'जहाल उजवे गट' आणि फॅसिस्ट, स्लोवाकियातील हलींका गार्डस आणि क्रोशियांतील उसताशे या अनेक देशातील या अनेकं संघटनांनी नात्झी 'वंश-उच्छेदा'त मोठ्या उत्साहाने भाग घेतला होता. धरती-वादी राष्ट्राला स्थानिक- आंतरराष्ट्रीय आणि राजकीय एथनिक असा संयुक्त धोका असल्याकारणाने, आपली जी धोरणे आहेत ती बरोबर आहेत असे समर्थन या सर्व संघटना करीत असत. यापैकी रूमेनियनांनी ऑर्थाडॉक्स-इनोसंटस या ख्रिश्चन धर्मातील एका पंथाचे लोक आणि युक्रेनियन राष्ट्रवादी या दोघांचेही खून केले. त्याचवेळी क्रोशियातील उसताशे संघटनेने सर्व एथनिकस आपल्या देशातून नाहीसे होऊन देश साफ कसा होईल याकडे लक्ष दिले. या नरवधात जवळ जवळ चार लाख लोकांना बळी देण्यात आले आणि तितक्याच लोकांचे सक्तीने धर्मांतर करण्यात आले होते. या 'वंश-उच्छेदा'त इटालीयनही सहभागी होते. सुरुवातीला इटालियन फॅसिस्टांचा दृष्टीकोन वंशवादी असण्यापेक्षा तो सांस्कृतिक होता. असे होते तरी इथोपियात 'वंश-उच्छेद' करताना त्यांनी वंशवादाकडे आपला मोर्चा वळविला होता. दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी शेवटी इटालियन फॅसिस्टापैकी अनेकजण 'ज्यू धर्मियांकडे' वळले होते.

### डाव्या गटाचा धरतीवाद

डाव्या गटांचीही 'वंश-उच्छेदी' आवृती होती. दोन महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात, डाव्या गटात धरतीवादाचा उदय तसा हळूहळूच झाला आणि तोही अगदी तपशीलात जाऊन विकास पावला नाही. युद्ध-पूर्व काळातील समाजवादी आणि विशेष करून कम्युनिस्ट चळवळींनी 'राज्यवादां'चा निषेध केला असला तरी नव्या सोव्हियेट युनियनने त्याला अगदी लगेच आपलेलेस केले. इ. स. १९१८ चा सप्टेंबर महिना उजाडेपर्यंत सोव्हियटस या स्थानिक पातळीवरच्या संघटना, कामगार संघटना, आणि न्यायलयांचे स्वातंत्र्य, या साऱ्या गोष्टी तेथे केव्हाच निकालात निघाल्या होत्या. चेका या गुप्तपोलिसी संघटनेने खून करण्यास आरंभ केला होता. दया विरहीत कंठस्थान हेच कुलक या वर्गिय शत्रूंच्या नशिबी आहे असे

जाहीर करण्यात आले होते. श्रमछावण्या (CONCENTRATION CAMPS) स्वरूपी तुरुंगाची मोठ्या उत्साहाने उभारणी झाली होती आणि रेड टेरर (कम्युनिस्ट दहशतवाद) याला सुरुवात झालेली आहे असे जाहीर करण्यात आले होते. एक नैतिक तत्त्व यापेक्षाही राजकीय आवश्यकता या स्वरूपात 'राज्यवादा'कडे पाहिले जात होते. कडवे आणि पराकोटीला गेलेले उजवे गट या दृष्टीने राज्यवादाकडे पहात नसत. ते काहीही असो. बोलशेव्हिकांची भाषा सुरुवातीलाच काही प्रमाणात फॅसिस्टांच्या भाषेसारखी दिसण्यास सुरुवात झाली होती. ट्रॉटस्की यांचे WORK, DISCIPLINE AND ORDER WILL SAVE THE SOVIET SOCIALIST REPUBLCIK (काम, शिस्त आणि व्यवस्था यांच्या मदतीने सोव्हियट सत्ता वाचेल) अशा शिर्षकाचे एक भाषण प्रसिद्ध आहे. हे शिर्षक कोणी काही म्हणो फॅसिस्ट ढंगाचेच आहे. समांतर सैनिकांच्या गुणांची स्तुती ट्रॉटस्कीनी केली होती. आर्थिक प्रश्नात शिस्तंबद्ध सैनिकांच्या मदतीने त्या आर्थिक प्रश्नांचा समाचार घेऊन त्यांचा 'बिमोड' केला पाहिजे असे त्यांनी जाहीर केले होते. 'जुन्या लढवय्यांना' फॅसिस्ट लोक प्रतिष्ठा व खास हक्क बहाल करीत; तसेच बोलशेव्हिकानीही केले. कम्युनिस्ट पक्षाचे नेते लष्करी गणवेश परिधान करू लागले; आणि क्रांतिकारी लढवय्यांचे वर्णन करताना, लढाईतील पायदळांच्या रचनेत वापरण्यात येणाऱ्या उपमा वापरण्यास त्यांनी सुरुवात केली होती. उदा. किल्ल्यावर हल्ला चढविणे, हुजरातीची फौज, मोहीम, कामगारांची दले (ब्रिगेडस) . . . इत्यादी इत्यदी, या उपमा त्या वर्णनात समाविष्ट होत्या. सोव्हियट मॅन (मानव) आणि समाजवादी नैतिकतेची निर्मिती होण्यास हिंसेने मदत केली होती. कामगार वर्गाची **हुकुमशाही** ही क्रांतीनंतर निद्राव्यवस्थेत गेली होती, तिला मार्क्सवाद्यांनी पुन्हा जागृत केले.

तथापि फॅसिस्ट ज्यांना 'शत्रू' मानीत होते, त्यापेक्षा बोलशेव्हिकांचे 'शत्रू' वेगळे होते. युक्रेनियन आणि इतर राष्ट्रवादी यांच्या विरुद्ध क्रांतीनंतर झालेल्या युद्धात, बोलशेव्हिकस सहभागी झाले होते, तरी 'राष्ट्रीय शत्रू' नेमके कोणास म्हणावे याबद्दल त्यांना सुरुवातीच्या काळात तरी त्यांना काहीच कल्पना नव्हती. केवळ रशियन राष्ट्रच नाही तर रशियन राष्ट्राबाहेरचा कामगारवर्गही आपण स्थापन केलेल्या राज्यात समाविष्ट आहे असा त्यांचा दावा होता. आपल्या राज्यात अनेक प्रकारचे राष्ट्रीक आहेत हे त्यांना मान्य होते. एथनिकाच्यावर होणाऱ्या अन्यायाबाबत अंध असलेले संघराज्य त्यांना मान्य नव्हते. परंतु एकमेकांशी जवळीकेचे दुवे असलेले संघराज्य त्यांना मान्य होते. सोव्हियट युनियन हे सार्वभौम राष्ट्रीय प्रजासत्ताकांचे संघराज्य होते. त्यातील प्रत्येक प्रजासत्ताकाला स्वायतत्ता होती. त्याजबरोबर छोट्या राष्ट्रीकांना थोड्या खालच्या पायरीवरच्या स्वायतत्तेचा फायदा होता. एवम, कामगारवर्गाचे शत्रू हे कोणी एथनिक नव्हते, त्या वर्गाशी स्पर्धा करणारे राजकीय विरोधक, निरनिराळे सामाजिक वर्ग आणि परकीय सत्ता हे त्यांचे शत्रू होते. राजकीय विरोधकात प्रतिगामी व्हाईटस्, कॅडेटस, रेव्हाल्युशनरी सोशलिस्ट (क्रांतीकारी समाजवादी) मनेशेव्हिक,

काही वर्षांनंतर ट्रॉटस्काईट, आणि त्यानंतर 'डावे' आणि उजवे विरोधक या सर्वांचा समावेश होता. परंतु कामगार वर्गाला विरोध करणारे इतर सामाजिक वर्ग असा जो दुसरा शत्रू होता, त्या शत्रूच्या सैन्यात हे राजकीय विरोधक बिनीचे लढवय्ये होते. बुझ्वावर्ग, मध्यमवर्ग, संरजामदार आणि कुलक हे सारे वर्ग कामगार वर्गाची होणारी आगेकूच थांबवून कामगार वर्गाचा पाडाव कसा होईल यासाठी प्रयत्नशील होते. परंतु या शत्रूशिवाय आणखी एक शत्रू म्हणजे सोव्हियट रशियाशी शत्रूत्व करणाऱ्या परकीय सत्ता. याचे कारण सोव्हियट युनियन हे या शत्रूनी वेढविले राष्ट्र होते. या सत्ता सोव्हियट युनियनच्या शत्रूला रसद पुरवित. सोव्हियट युनियनला विरोध करणारे जे वर्ग होते हे परकीय सत्तेने प्रायोजित केलेले 'परके' 'देशद्रोही' 'शत्रूचे हेर' आणि शत्रूच्या फायद्यासाठी सोव्हियट युनियनमध्ये दंगा-धोका करणारे अशी नांवे त्यांना देवून, त्या सर्वांचा जवळ जवळ रोजची एक परीक्रमा या स्वरूपात त्यांचा निषेध केला जात होता.

एवंच 'कामगार' वर्ग याचा अर्थ 'लोक' झाला होता. परस्परांशी घनिष्ट संबंध असलेल्या स्थानिक आणि परकीय शत्रूकडून त्या 'लोकां'वर सातत्याने हल्ले होतच होते. फॅसिस्टांची आपल्या शत्रूबद्दलची जी प्रकल्पना होती त्याच्याशी या बोलशेव्हिक विचारांचे व कृतींचे साम्य हे वरवरचे नाही. त्यात अधिक काहीतरी आहे. इ. स. १९२० सालपासून लेनिन आपल्या वर्गिय शत्रूंचे वर्णन अशा शब्दात करीत असे की भविष्यकाळातील नात्झींच्या स्टॉर्म ट्रुपर्सक यांचे विचार कसे असतील यांचेच तो वर्णन करीत आहे असे वाटावे. वर्गिय शत्रू हे 'रक्तशोषक' 'खेकडे' 'जळवा' 'बांडगुळे' 'किटक' 'ढेकूण' 'माकडे' इत्यादी होते. एकाच वेळी धमकी देणारे आणि अमानूष. या त्या स्टॉर्म-ट्रूपूर्सच्या भाषेत हे वर्गिय शत्रू हे धमकी देणारे आणि अमानूष असे शत्रू होते. **लोकांना त्यांची लागण** होते म्हणूनच त्यांचे **'शुद्धीकरण'** करणे आवश्यक आहे. **लेनिन प्रेमींना हे वाचताना दु:ख व खेदही होईल. परंतु ते सत्य आहे.**

स्टॅलिन यांनी ही कृती आणखी कितीतरी पुढे नेली. सक्तीने करण्यात येत असलेले औद्योगिकरण आणि सामुदायिक शेती करण्याविरुद्ध वर्गिय शत्रूकडून विशेषत: जवळ जवळ सुधारणे पलिकडे असलेल्या कुलक वर्गाकडून- सातत्याने हल्ले होत आहेत असा युक्तिवाद स्टॅलिन यांनी केला होता. या ठिकाणी हे लक्षात घेणे आवश्यक आहे की कुलक या शब्दाने नेमका कोणता वर्ग वा व्यक्ती निर्देषित होते याचे कोणलाच ज्ञान नव्हते. लेनिने प्रामुख्याने या शब्दाचा 'शोध' लावला होता. स्टॅलिन राजवटीची जी धोरणे होती त्याला जवळ जवळ सर्वच शेतकरी वर्गाचा, स्थानिक अधिकाऱ्यांचा विरोध होता. रशियात भ्रमण करणाऱ्या समांतर-सैनिकांना कोण-कोठच्या वर्गात समाविष्ट होते याचे स्वत:च पृथ्थकरण करावे लागे. याचे कारण PURGING OF CLASS-ALIEN AND ANIT-KOLKHOZ ELEMENTS FROM THE COLLECTIVE FARMS (सामुदायी शेती व्यवस्थेतून परकी-वर्गियांना आणि सामुदायिक शेतीला विरोधक अशा घटकांना ते निवडून काढून त्यांना

हाकलून देणे) या शिर्षकाचे तक्ते भरून द्यावे लागत. अनेक वेगवेगळे निर्देषक वापरून वर्गिय हे लेबल तयार करण्यात येई. एका निर्देषकांत असा दावा केलेला आहे की 'जुन्या राजवटी'शी कोणत्याही प्रकारचा संबंध असणे हा एकच कळीचा मुद्दा आहे. याचा अर्थ असा होता की क्रांतीपूर्व रशियातील सर्व कनिष्ठ मध्यमवर्गिय आणि त्यांच्या वरच्या सामाजिक थरातील लोक हे त्या शिर्षकात समाविष्ट होते. उदा. यात मोठे जमिनदार, उमरावी हक्क असलेले जमिनदार, धर्मगुरु, चर्च संघटनेतील वडील मंडळी, ख्रिश्चन धर्मातील वेगवेगळ्या पंथातील विशिष्ट पंथाचे खास करून बॅपटीस्ट आणि इव्हनजलीकल पंथातील लोक, श्रीमंत शेतकरी, झारशाहीच्या अखेरच्या कालखंडातील पंतप्रधान स्टोलिपिन, यांनी काही सुधारणा जाहीर केल्या होत्या, त्या सुधारणानुसार अनेक शेतकऱ्यांतून साम्यकूलातून आपल्या जमिनी काढून घेऊन स्वतंत्र्य झालेले शेतकरी, उद्योजक, व्यापारी, धंदेवाईक, झारच्या शासनातील अधिकारी, कोस्सॅकस, हेडमन (गांवपाटील) मालमत्तेची देखभाल करणारे कारभारी आणि खेडेगांवातील प्रतिष्ठित वडील व्यक्ती अशा सर्व भिन्न-भिन्न प्रकृतींच्या व्यक्ती त्या वर्गीकरणात होत्या. त्यांच्या जोडीला, व्हाइटस, रेव्हाल्यूशनरी सोशलिस्ट, अगर युक्रेनियन राष्ट्रवादी, यांच्यापैकी ज्या कोणी यादवी युद्धाच्या काळात शत्रूपक्षाला पाठींबा दिला होता ते सर्व होते. या ठिकाणी आपणास असे दिसून येते की, 'शत्रू' संबंधात अगदी काहीश्या धायकूतीने चाललेल्या शोधात राजकीय लेबले आणि सामाजिक वर्गिय लेबले यांच्यात फारच गल्लत झालेली आहे. काही वेळेला कम्युनिस्ट पक्षातील श्रेष्टींची जी इच्छा होती, त्याही पलिकडे स्थानिक कम्युनिस्ट जात आणि आपल्या मनाला येईल त्यानुसार 'वर्ग' या शब्दाची व्याख्या करीत. अनेक वेळा स्थानिक संरजामदारांची वा 'आहेरे'ची वंशपरंपरा लक्षात घेऊन स्थानिक पातळीवरचे राग, लोभ, या कुटुंबाच्या दुसऱ्या अगर तिसऱ्या पिढीवरही उगवले जात होते. हे अशा प्रकारे होणारे नाते - रक्तामासांचे संबंध टिपण्यात येत, त्याचा बोलशेव्हिक अभिजनानी निषेध केला होता हे खरे आहे. परंतु प्रत्यक्षात चालू असलेल्या हत्याकांडात त्यांनी कधीही हस्तक्षेप केला नाही. उच्चपदास्थाविरुद्ध आणि परंपरागत हेवे दावे यांच्याविरुद्ध समाजाच्या तळागाळातून जे राजकीय युद्ध मोकाट सुटले होते आणि कम्युनिस्ट श्रेष्टींनी प्रोत्साहीत करून मोकाट सोडलेले तशाच प्रकारचे युद्ध यांचे बेमालून मिश्रण स्टॅलिनवादात होते असे एका मान्यवर सोव्हियट रशियाच्या समीक्षकाचे प्रतिपादन आहे.

### रक्त आणि सामाजिक वर्ग

एवंच स्टॅलीनने केलेली **कोट्यवधी सोव्हियट नागरिकांची** अमानुष कत्तल म्हणजे **केवळ सर्वस्वी** वाट चुकलेला समाजवाद नव्हता. कम्युनिस्ट समाजवादानेही आपल्याला परका असा 'दुसरा' कोण या संबंधात फारच प्रखर अशी भावना आपलीशी केली होती. बडे बुर्झ्वा अगर छोटे बुर्झ्वा, अगर जे कोणी 'कुलक' समजले जात होते ते, अगर 'झारच्या काळातील' जुन्या राजवटीतील अधिकारी हे सारे कामगारवर्गाचे शत्रू होते. ते 'शत्रू'

असल्याकारणाने स्टॅलीनच्या राजवटीत- (खरे म्हणजे त्याची सुरुवात, एका भारतीय बुजुर्गाच्या- जो लेनिनप्रेमी आहे- याच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास 'रितबरोबर पण हिशोबात गफलत'-अशा **महाचाणाक्ष लेनिनच्या काळात झालेली होती)** **कोट्यवधीच्या संख्येत** त्या शत्रूंची हत्या करून रशियन समाजाचे 'शुद्धीकरण' करण्यात आले होते. कामगारवर्गाचे परीवर्तन 'लोकांत' झाल्याकारणे, इतर वर्ग हे आपोआपच 'लोकांचे शत्रू' झाले होते. प्रख्यात लेखक जॉर्ज ऑरवेल यांची आठवण सर्व जाणकारांना या ठिकाणी होइेल. आशिया खंडात चिन आणि कंम्बोडियातील कम्युनिस्ट या संदर्भात आणखीनच पुढे गेले होते. 'वर्गिय शत्रू'कोण हे नेमके करण्याचा एक मार्ग म्हणून 'कंठस्नान घालणे' या मार्गास मान्यता देण्यात आली होती. इ. स. १९४८ साली 'चांगले' 'तटस्थ' आणि 'घृणास्पद' अशा वर्गिय वातावरणात वाढलेल्या वर्गात 'चिनी लोकसंख्येची वर्गवारी' करण्यात आलेली होती. एवम कोणाही चिनी व्यक्तिचे माता-पिता आणि अगदी अलीकडच्या काळातील त्यांचे आजी आजोबा हे कोण वा कोणाचे कोण होते हे लक्षात घेऊन, ती व्यक्ती 'लोकांच्या' बाजूला आहे की नाही हे ठरविण्यात येत होते. खमेर रूज (कंम्बोडिया) कम्युनिस्टांनी ही कंठस्नानी प्रवृत्ती आणखीनच टोकाला नेली. 'वंश-उच्छेद' या चालीवर त्यांनी एक प्रकारचा 'वर्ग संहार' कम्युनिस्ट वागणूकीत शास्त्रपूत केला. बुझ्र्वा वातावरणात वाढलेल्या एकंदर लोकसंख्येपैकी त्यांनी सुमारे पन्नास टक्के लोकांना यमसदनास पाठविले. परंतु या कम्युनिस्ट छाप कंठस्थानी प्रवृतीचा संबंध त्यांनी अधिक परंपरागत अशा धरतवादी राष्ट्रवादाशी जोडला, तेव्हा त्यांचा पराभव झाला. कम्बेडियातील व्हियटनामींना कंठस्नान घालून त्यांनी 'शुद्धीकरण' मोहीमेला सुरुवात केल्यानंतर, **कम्युनिस्ट व्हिएटनामने त्यांच्यावर स्वारी केली.** आणि कंबोडीयातील कम्युनिस्टांना त्यांनी पदच्युत केले. या संदर्भात कम्युनिस्ट पक्षातील मराठी भाषिक आर्य चाणक्य, भाई डांगे यांनी एक साधा चित्कारही कधी काढला नाही. मग एस. के. लिमये व त्यांची पिल्लावळ असल्या अतिसामान्य लोकांनी काय सांगितले हे विचारातही घेण्याचे कारण नाही. हे नमूद करण्याचे कारण एकच. स्टॅलिन प्रेमी पं. नेहरूंच्या भारतात कोठे गोळीबार झाला, त्यात काही लोक मारले गेले तर ही माणसे केवढा गदारोळ करीत असत याचे स्मरण या ठिकाणी होते. **ते गदारोळ करीत असत ते रास्तच होते.** परंतु आपण ज्यांची शपथ घेऊन ज्या तत्वप्रणालीचा पुरस्कार करीत आहोत, त्याबद्दल स्टॅलीन प्रेमी पंडीत नेहरू व अनेक नेहरू प्रेमी आणि खुद्द चाणक्य डांगेची अगदी चिडीचुप होते.

फारच थोड्या इतर समाजवादी पक्षांनी या 'धरती'वादाच्या रस्त्यावर आगेकूच केली; ज्या कोणी केली तीही फारशी नव्हती. अर्थात त्या पक्षांनी आपण कामगार वर्गियांची बिनीची आघाडी आहोत असा दावा जरुर केला होता. एवम अशा रितीने इतरपक्ष, यात अनेक संभाव्य मित्रपक्षांचाही समावेश आहे कामगारवर्ग सोडून दुसऱ्या सामाजिक वर्गाचे ते प्रतिनिधी आहेत, अशी समजुत करून घेण्यात आली होती. म्हणजेच ते शत्रू होते, स्पेन

मधील डावे PUEBLO प्युएबलो या शब्दाचा उपयोग करतात. या शब्दाचा अर्थ खेडे तसाच लोक असाही होतो. या शब्दाचा गर्भितार्थ असा आहे की 'लोक' या समूहाच्या सदस्यत्वातून 'इतरांना' वगळण्यात आलेले होते. या इतरात स्पॅनिश धर्मगुरु, जमिनदार आणि ज्या कोणा दुसऱ्या इतरांचे फॅसिस्ट या नावाने संबोधन करण्यात आले होते, त्या सर्वांचा समावेश होता. हे सारे प्युएबलो तमाविष्ट होत नाहीत हे कारण दाखवून त्यांचा अगदी पद्धतशीरपणे खून करण्यात आला होता. 'कम्युनिस्ट छाप मानवता झिंदाबाद.' यातही आणखी एक लक्षणिय मुद्दा आहे. स्पेनमध्ये तोवर फॅसिस्ट हा शब्द प्रयोग परकीय होता. तथापी दोन महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात 'इतरांचा' खून करण्यास प्रोत्साहन देणाऱ्या बहुतेक कम्युनिस्टांना वा डाव्यांना अशी जाणिव झाली की सत्ताग्रास करावयाचा असेल व ती सत्ता हातात राखावयाची असेल, तर मग त्यांना कामगार वर्गाबरोबरच इतरांचा पाठींबा असण्याची गरज आहे. म्हणून अधिक विस्तृत असा पाया असला तरच आपले उद्दिष्ट साध्य होईल हे त्या डाव्यांनी जाणले होते. एवंच त्यांनी अधिक विस्तृत पाया असलेले लोकसमूह संघटीत करण्यासाठी प्रयत्न करण्यास सुरुवात केली. या पायाभूत विस्तृत लोकसमूहाला स्थानपरत्वे वेगवेगळी नांवे देण्यात आली. कधी ते नुसतेच 'लोक' होते, कधी ते 'कामगार आणि कष्टकरी' होते, कधी ते श्रमजीवी, घाम गाळणारे, तळागाळातले होते, अगर कधी ते नुसतेच 'कामगार शेतकरी' होते. महाराष्ट्रातील चाणक्य व कम्युनिस्ट हे अगदी कंठखाने ज्यांची भलावण करीत त्या स्टॅलीन महाराजांनीही 'लोक' या बिरुदाने निर्देशित होणाऱ्या समुदायाच्या सत्तेस अभिवादन करण्यास सुरुवात केली. त्यासाठी रशियात एकेकाळी वापरात असलेला एक अधिक जुना, पण जो कामगार वर्गाचा त्या मानाने कमी निर्देश करणारा शब्द होता NARODNY नारोडनी या शब्दाचा वापर केला होता. नारोडनी या शब्दात शेतकरी आणि कामगार हे दोघेही अंर्तभूत आहेत. समाजवादी आंतरराष्ट्रीयता आणि प्रत्येक देशात असलेले एथनिक अल्पसंख्य या दोघांशीही समाजवादाची बांधिलकी होतीच. युएसएस आर- सोव्हियट प्रजासत्ताक या संघराज्याने आपल्या सिमेत जे कोणी 'उप-राष्ट्रीक' होते, त्यांना अधिक सकरणात्मक धोरणाने अनेक वेळा पाठींबा दिला होता. याला अर्थातच अपवाद होता, तो दुसऱ्या महायुद्धाच्या काळात 'देशद्रोही' मानल्या गेलेल्या 'राष्ट्रांचा वा राष्ट्रीकांचा. लोकशाही समाजवाद या विचारधारेवर श्रद्धा असणारे 'लोक' हा शब्द कोणासही वगळण्यासाठी वापरीत नव्हते. 'लोक' या शब्दात सर्वांना समाविष्ट करून घेण्याचे त्यांचे उद्दिष्ट होते. स्कँडेनोव्हियन देशातील लोकशाही समाजवाद्यांनी लोक (VOLK) या शब्दाचा जेव्हा वापर केला तेव्हा त्यांचा दावा असा होता की देशातील सर्वांचाच 'लोक' या समूहात अंर्तभाव आहे. म्हणूनच 'लोक' या संकल्पनेत 'लोकांना घरे' 'लोकांचे आरोग्य' आणि 'लोकांची सुरक्षितता,' या घोषणात सर्वांचाच-कोणालाही वगळण्यात आलेले नव्हते- समावेश होता.



अनुक्रमणिका

ते काहीही असो, आधुनिकत्वाचे जे मध्यवर्ती राजकीय संविधान आहे त्यातूनच कम्युनिझम आणि फॅसिझम यांची निर्मिती झालेली आहे. या दोन्हीही विचारसरणी 'आम्ही लोक' या संबंधी जी पर्यायी 'घरतीवादी' संकल्पना आहे, तिचे आपण प्रतिनिधित्व करतो असा दावा करतात. या संकल्पनेत 'लोक' या शब्दाला विशिष्ट अर्थ आहे. 'लोक' म्हणजे एकमेव 'कामगार वर्ग' आणि 'लोक' हे राष्ट्राचा अविभाज्य भाग. कम्युनिस्ट आणि फॅसिस्ट या दोघांच्याही दृष्टीकोनातून आपल्या हुकुमशाही राजवटी या 'लोकां'च्या शत्रूचे निर्दालन करणे, या नैतिक प्रकल्पाचे निशाण आपल्या खांद्यावर आहे अशी त्यांची भावना होती व तसा त्यांचा दावाही होता. उदारमतवादी लोकशाही, कम्युनिझम आणि फॅसिझम, या तिन्हीही विचारधारा राजकीय उद्दिष्टांबाबत एकाच कुटुंबाचे घटक होते. या सर्व विचारधारा वस्तुत: आणि आवश्यकपणे आधुनिक आहेत. परंतु लोकशाहीची ती काळी बाजू आहे, त्यातून उदारमतवादी-लोकशाहीवादी उद्दिष्टांची निर्मिती न होता, त्यातून 'घरतीवाद' निर्माण झाला.

### इ. स. १९४५ नंतरचे शुद्धीकरण

आपण असे पाहिले की आधुनिकत्वामुळे, लोकशाहीबद्दल दोन भिन्न संकल्पनांची निर्मिती होते. **एक** युरोप या खंडाच्या वायव्य भागात आणि गोऱ्या लोकांच्या वसाहतीतील राजवटी म्हणजे ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कॅनडा या दोन्ही ठिकाणी वर्गसंघर्षाविषयीची जाण तीव्र व सखोल होती. त्या देशातील समाजांनी त्या जाणिवेला संस्थात्मक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला होता. त्यांनी आपल्या समाजात उदारमतवादी लोकशाही विकसित केली. त्यांनी घरतीवादी स्वरूपाची लोकशाही स्विकारली नाही, परंतु गोऱ्यांनी ज्या देशातून वसाहती केल्या, त्या ठिकाणी मुळतील 'दुसरे' अगोदरच होते. त्यांना न सामावून घेणारी व त्यांच्या विरुद्ध असलेली, अशी आपल्या सर्व (गोऱ्या) जमातीबद्दलची 'घरतीवादी' संकल्पना या गोऱ्यांनी विकसित केली. त्याजबरोबर या 'दुसऱ्यां'च्या बाबतीत त्यांनी अगदी पराकोटीला गेलेले एथनिक शुद्धीकरण अंमलात आणले. या धोरणात 'वंश-उच्छेद'ही समाविष्ट होता. **दोन** मध्यपूर्व आणि दक्षिण युरोपमधील परिस्थिती वेगळी असल्याकारणाने वर्गसंघर्ष हा मध्यवर्ती राजकीय प्रश्न न ठरता, एथनिक स्तरीकरण- कोठचे एथनिक सामाजिक उतरंडीत कोठच्या स्थानावर- हा प्रश्न मध्यवर्ती महत्त्वाचा ठरला. आर्थिक वर्ग हे एकमेकांवर अवलंबून असतात. पण बहुतेक एथनिक अगर धार्मिक जमाती या एकमेकांवर अवलंबून असतातच असे नाही. कारण तशी जरुर असेलच असे नाही. एथनिक शुद्धीकरण जेथे अगोदरच झालेले आहे अशा स्वत:च्या घरतीवादी राज्यात, व समाजात, त्या आपले जीवन व्यतित करीत राहतात. या जमातींचे या प्रकारचे हे रहाणे हे दिवसेंदिवस वाढतच गेले होते. म्हणूनच जमातच्या जमात या जगातून नाहीशी होईल; अशा स्वरूपाचे राजकीय आणि एथनिक शुद्धीकरणाचे धोरण हे खरोखरीच लोकशाही विरोधी आहे असा सर्वसामान्य दृष्टीकोन आहे. परंतु दोन वेगळ्या व स्पष्ट प्रकारे दाखविता येईल की हा दृष्टीकोन बरोबर नाही. या उलट ती लोकशाहीच्या पृष्ठभागाखालची न दिसणारी बाजू आहे.

इ. स. १९४५ साली या 'वंश-उच्छेद'च्या इतिहासाचा शेवट झाला नाही. तोवरच्या शुद्धीकरणांनी जर्मनांना जबरदस्त हिंसकतेने प्रतितडाखा दिला होता. दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या काळात जर्मनी आणि ऑस्ट्रिया या दोन्ही देशाच्या पूर्वेकडच्या देशात १७७ लाख जर्मन राहात होते. यात सोव्हियट युनियनमध्ये रहात असलेल्या वीस लाख जर्मन समाविष्ट नाहीत. यापैकी ११ लाख युद्धात मारले गेले. ११७ लाख जर्मनीकडे पळ काढण्यात यशस्वी झाले. या पलायनाच्या धावपळीत २१ लाख मारले गेले का मृत्यूमुखी पडले वा बेपत्ता झाले. म्हणजे मूळ १७७ लाखापैकी फक्त २६ लाख पूर्व- युरोपमध्ये शिल्लक राहिले. सुमारे एक लाख क्रोशियन जमातीच्या लोकांना त्यांनी शरणागती पत्करली त्यावेळी सर्व जमातीने त्यांना कंठस्नान घातले. बल्गेरीयातून दिड लाख तुर्की लोकांना हाकलून देण्यात आले होते. **युगोस्लावियाचे विभाजन होईपर्यंत त्या विभागत, 'वंश-उच्छेद' व शुद्धीकरण थांबले होते.** परंतु बल्गेरीयातून तुर्की एथनिकसना सक्तीने देशांतर करण्याबाबत सक्ती करण्यात येत होती. इतकेही झाल्यानंतर जे कोणी तुर्क बल्गेरीयात मागे राहीले, त्यांना बल्गेरियन नावे घेण्याची सक्ती करण्यात आलेली होती. हे सर्व होत असतानाही इ. स. १९८९ साली जे तुर्क बल्गेरीयन बल्गेरीयातून हाकलले गेले होते, त्यापेक्षा कितीतरी अधिक संख्येने म्हणजे साडेतीनलाख तुर्क-बल्गेरीयांना, स्वदेशात स्थलांतर केले. लेनिन म्हणत असे रशियन सैनिकांनी, युद्धभूमीवरून माघार घेऊन आपले मत नोंदविले होते. (THEY VOTED WITH THEIR FEET) त्या सारखेच आहे. इस्लाम धर्मिय तुर्क-बल्गेरीयनांना, तुर्कस्थानातील 'इस्लामी' राजवट मानवणारी नव्हती, हे त्यांच्या स्थलांतरातून अगदी स्पष्ट होते. यानंतर झेकोस्लोवाकीयाचे दोन स्वतंत्र राज्यात विभाजन झाले. या विभाजित प्रत्येक राज्यात एकच एथनिक समाज विद्यमान होता. महत्त्वाचा मुद्दा हा की हे विभाजन, अगदी शांततेने व अगदी खेळीमेळीच्या वातावरणात झालेले होते. वीस ते तीस लाख जे कोणी पूर्व युरोपमध्ये होते, त्यापैकी एक तृतीयांश जर्मनांनी, ऐक्य झालेल्या जर्मनीतील 'आपल्या घराकडे' पळ काढावा लागला होता.

परंतु इतके होऊनही या वंशउच्छेद व शुद्धीकरण यांच्या इतिहासाचा शेवट झालेला नाही का? स्तरीकरण असलेले उदारमतवादी राष्ट्र-राज्य आतातरी विजयी ठरले नाही का? इ. स. १९४५ सालपर्यंत फॅसिस्ट विचारसरणी पार बदनाम ठरली होती. इ. स. १९८९-१९९१ पर्यंत स्टेट सोशलीझमचा (राज्य-समाजवाद) संपूर्णपणे पाडाव झाला होता. मग अशा परिस्थितीत सर्व पश्चिम युरोपमध्ये, जवळ जवळ सर्व मध्य युरोपमध्ये आणि पूर्व युरोपच्या काही भागात, अधिक लॅटीन अमेरीका, पूर्व आणि दक्षिण आशिया या विभागातील काही भाग या सर्व प्रदेशात उदारमतवादी लोकशाहीचे प्रभुत्व नव्हते का? आधुनिकीकरणातील काही मध्यवर्ती घटक, आर्थिक विकासाची पातळी, साक्षरता आणि शहरीकरण या सर्वांबरोबर लोकशाहीकरण सकरणात्मक सुसंवादी आहे. परंतु अभ्यासकांना असे आढळून आले आहे की लोकशाहीच्या दिशेने संक्रमण होण्यासाठी आवश्यक



अनुक्रमणिका

असलेला किमान आर्थिक विकास, हा विसाव्या शतकात सातत्याने होतच होता. परंतु असे आहे तरी उदारमतवादी लोकशाही ही यशस्वी करणे, हे अधिकच कठीण होऊन बसले आहे. उदारमतवादी लोकशाहीचा विस्तार शस्त्र बळाच्या जोरावरही काही वेळा झालेला आहे. जर्मनी, ऑस्ट्रिया, इटाली आणि जपान ही त्याची बोलकी उदाहरणे. विशिष्ट सांस्कृतिक साखळी करवी, शेजारच्या देशातून, स्वधर्मियात आणि सग्या-सोयऱ्यात या उदारमतवादी लोकशाहीचा प्रसार झालेला आहे. या संदर्भात अभ्यासकांनी ब्रिटीश परीणामाची ही नोंद घेतलेली आहे. उदा. भारतासारखे ब्रिटीश साम्राज्यात पूर्वी अंतर्भूत असलेले देश, अगर कॅरीबिअन बेटे, या देशातून 'ब्रिटीश परीणामा'चा भाग म्हणून उदारमतवादी-लोकशाही असण्याचा संभव अधिक. इतर साम्राज्यांच्या वसाहतीत ही परिस्थिती आढळून येत नाही. व्हेटीकन या ख्रिश्चन धर्मातील कॅथलीक धर्मपीठ आणि अमेरीकन परराष्ट्रीय धोरण यांचा कल आता लोकशाही आणि मानवी हक्क यांना पाठींबा देण्याकडे आहे. हा बदल अगदी अलीकडचा. धोरणातील या बदलामुळे दक्षिण गोलार्धात या दोन्ही गोष्टींना जबरदस्त उठाव मिळण्याच्या संधीत वाढ झालेली आहे. विवेचनाच्या या क्षणी तरी उदारमतवादी भवितव्य उज्ज्वल आहे असे दिसते. परंतु या अशा विशिष्ट प्रकारचे प्रोत्साहन हे सातत्याने चालूच राहील अशी खात्री देता येत नाही.

**एथनिक एकजिनसीपणाकडे आगेकूच**

ते काहीही असो, ज्या ठिकाणी लोकशाही विजयी झाली आहे, त्या ठिकाणी अनेकवेळा तिच्यात धरतीवादाची छटा असते. युरोपमध्ये प्रत्येक देशात एथनिक दृष्ट्या एकजिनसीपणा निर्माण व्हावा म्हणून गेले शतकभर आग्रहाने त्या दिशेने आगेकूच चालू होती. ती आता जवळ जवळ थांबण्याच्या अवस्थेत आलेली आहे. इ. स. १९९१ साली कोसोव्होया हा ९०% टक्के अल्बेनियन एथनिकसची एकजिनसी वसती असलेला भाग होता. स्लोवनिया ८८% टक्के स्लोवन एथनिक रहात होते. क्रोशियात ७८% क्रोशियन राहतात सर्बियात ६६% टक्के सर्ब राहतात, मॅसिडोनियात ६५% टक्के मॅसिडोनियन, बॉसनियात मुसलमानांची संख्या ४४% टक्के आहे. परंतु असे होते तरी बॉसनिया आणि क्रोशिया या दोन्ही विभागात शुद्धीकरण मोहीम चालू होती. आपल्या व्यक्तिरीक्त दुसरे जे एथनिक होते, त्या सर्वांची कत्तल त्या देशातून होऊन, ती मोहीम शिगेला पोचली. यातून जे कोणी सुटले त्यांना अत्यंत असाध्यपणे स्थलांतर करावे लागावे हाही त्या धोरणाचा आत्यंतिक असा परिणाम होता. अशा प्रकारे स्थलांतर करून गेलेल्या एथनिकांचे स्वत:चे असे छोटे राज्य तयार होईलही. एकदा कोसोव्हो मधिल सर्व अल्बेनियनन लोकांचा खून होऊन, अगर त्यांना देशाबाहेर हाकलून देऊन अथवा त्यांचे स्वत:चे असे छोटे राज्य तयार झाले म्हणजे मग पूर्वीच्या युगोस्लावियात जी राज्ये समाविष्ट होती, त्या प्रत्येक राज्यात एकच एथनिक जमात एकंदर लोकसंख्येच्या किमान ८०% टक्के आहे असे होणार आहे. एकेकाळच्या संयुक्त सायप्रसचे विभाजन होऊन दोन छोटी स्वतंत्र राज्ये निर्माण झाली आहेत. बहुतेक सर्व प्रसार

माध्यमे, वृत्तपत्रे आणि पश्चिमेकडचे राजकारणी या शुद्धीकरण मोहीमांचे खापर दुष्टकट कारस्थाने करणाऱ्या गुन्हेगारांच्या डोक्यावर फोडतात. येथे ज्या प्रदेशांचा उल्लेख करण्यात आलेला आहे, त्यातील प्रत्येक देशात, तेथील धरतीवादी चळवळींनी आपल्याला होत असलेला स्थानिक विरोध मोडून काढण्याकरता संघर्ष करावा लागलेला आहे. या धरतीवादी चळवळींना मिळालेले हे विजय हे फारच काळजीपूर्वक केलेल्या योजनेचे फळ होते. ते विजय पदरात पाडून घेण्यासाठी त्यांना सफेजंगीच्या लढाया कराव्या लागल्या होत्या. काही प्रमाणात त्यांना सक्ती व बळजबरीही करावी लागली होती; पण इतिहासात त्याची नोंद घेण्यात आलेली नाही. परंतु या काळ्याबाजूतही एक जनताप्रिय भाग होता. इ. स. १९९० च्या अखेरीस युगोस्लावियात झालेली निवडणूक ही अटीतटीची व महत्त्वाची होती. भूतपूर्व युगोस्लावियातील सर्व प्रजासत्ताकात राष्ट्रवादी पक्ष बहुसंख्येने निवडून आले होते. या संदर्भात सर्बिया व क्रोशिया या प्रजासत्ताकांचा उल्लेख केला पाहिजे. परंतु या दोन्ही प्रजासत्ताकात 'धरतीवादी' प्रवृत्ती अगोदर पासूनच अस्तित्वात होत्या. बाकीच्या राहिलेल्या जवळजवळ सर्व प्रजासत्ताकात या प्रवृत्ती झपाट्याने विकसित झाल्या. अर्थात इ. स. १९९१ सालानंतरच्या 'निवडणुक निष्ठावाद' (ELECTORALYISM), लष्करशाही आणि समांतर लष्करशाहीची भर पडली होती. या सर्वांची घसरण 'खूनी' शुद्धीकरणात झाली. समांतर लष्करशाही हा 'जनताप्रिय' धरतीवादाचा एक आवश्यक भाग आहे. 'लोकां'च्या मनात जे संशय निर्माण होतात, त्यांना निपटून काढण्यासाठी आणि शत्रूचे 'शुद्धीकरण' करण्यासाठी या समांतर लष्करशाहीच्या खास ताकदीचा वापर करण्यात येतो. परंतु या अमानुष घटना या फक्त पूर्वीच्या युगोस्लावियात सामिल असलेल्या देशातच घडल्या असे नाही. युरोपियन परंपरेच्या अगदी केंद्रस्थानी या चळवळी वसती करून असल्याचे आपण पाहिले आहेच. या चळवळींना 'विजय' प्राप्त झाला व होत आहे, यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. याचे कारण 'आम्ही लोक' 'ते शत्रू' या घोषवाक्यात अनस्यूत असलेल्या एका सामर्थ्यशाली तत्त्वप्रणालीची तरवार या चळवळी सातत्याने परजितच असतात. आधुनिक युरोपमध्ये तरी यापेक्षा काही वेगळे, कोठे घडले आहे का?

या नंतरच्या थोड्याच वर्षात सर्व युरोपमध्ये बहु-एथनिक असलेले तीनच विशिष्ट विभाग शिल्लक राहणार आहेत. **एक**. रशिया सोडून दुसऱ्या अनेक राज्यातून, रशियन एथनिकस् हे एक अल्पसंख्य जमात म्हणून राहतील. ते अल्पसंख्य असले तरी त्यांची संख्या तशी नगण्य नसेल, तीच गोष्ट दुसऱ्या काही स्थानिक एथनिक गटांची आहे. शिवाय खुद्द 'रशिया' या राज्यातल्या एथनिक जमाती अल्पसंख्य असल्या तरी त्यांचे प्रमाणही चांगले मोठे असेल. ही वस्तुस्थिती फार काळ टिकेल का? या संबंधी भाकीत करणे कठीण आहे. **दोन**. ब्रिटन, स्विझर्लंड, स्पेन आणि त्या मानाने म्हणजे इ. स. १८३० सालापासून या जुन्या गटात ज्या विषयी मतभेद आहे ते बेल्जियम ही पश्चिम युरोपमधील काही जुनी बहुएथनिक राज्ये आहेत ती राहतील. धरतीवादी विचारसरणीचा उदय होण्यापूर्वी बहुएथनिक अवस्थेत



अनुक्रमणिका

असलेली ही राष्ट्र-राज्ये आहेत. पश्चिम युरोपमधील उत्तर आयर्लंड या विभागाने खुनी शुद्धीकरण प्रवृत्ती जागृत ठेवलेली आहे. बास्क लोकांचा दहशतवादही अजून निकालात निघालेला नाही. युरोपियन युनियन मध्ये सामिल झालेल्या इतर सर्व देशात ८५% एकच एथनिक जमातीची वस्ती आहे. गेल्या चाळीस वर्षात, युरोपियन युनियन मधील देशात, एकमेकांच्या देशात स्थलांतर करून जाणे दिवसेंदिवस मंदगतीने कमीच होत चालले आहे. **तीन.** पश्चिम युरोपच्या सीमा पलिकडून स्थलांतर करून पश्चिम युरोपमध्ये येणाऱ्या लोकांची संख्या सध्या तरी फारशी मोठी नाही. परंतु दोन महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात स्थलांतर करून येणारे लोक आणि विद्यमान काळी स्थलांतर करून येणारे लोक यात एक मोठा फरक आहे. पूर्वी स्थलांतर करून येणाऱ्या एथनिकसचा राज्याबाहेरच्या आपल्या भाईबंदाशी संबंध असण्याच संभव होता. तसे असल्याकारणाने, राष्ट्राला बाहेरून येणाऱ्या धोक्याशी त्या एथनिकसचे गुटबंधन आहे असे मानण्यात येत असे. आजकाल स्थलांतर करून येणाऱ्या लोकांपासून असा धोका आहे असे मानण्यात येत नाही. अर्थात याला अपवाद आहे; तो **इस्लाम धर्मियांचा** विशेष करून फ्रान्सला हा धोका आहे असे वाटते. (फ्रान्सच्या पूर्वीच्या साम्राज्यात अनेक इस्लामी देश होते) आपल्या शेजारच्या देशातील **इस्लाम धर्मियांबद्दल ख्रिश्चननांना नेहमीच भिती वाटलेली आहे.** त्यांच्याशी या मनोवृत्तीचा संबंध असावा असे काहींना वाटते. **काहींच्या मते 'मुसलमान' हा जागतिक प्रश्न आहे. अर्नाल्ड टॉयनबी** या इतिहास पंडीताने अनेक वर्षापूर्वी दिलेल्या इशाऱ्याचे स्मरण या ठिकाणी वाजवी ठरेल. या पंडीताने असे प्रतिपादन केले होते की **मानवी संस्कृतीला दोन संभाव्य धोके,** एक कम्युनिझमचा, दुसरा **इस्लामचा.** त्यातला पहिला धोका निकालात निघालेला आहे. दुसऱ्याचे **इस्लाम या धोक्याचे** काय होते ते येत्या काही वर्षात समजून येईल. असे असले तरीही युरोपमध्ये स्थलांतर करून जाणाऱ्या **सर्वच** एथनिकबद्दल युरोपियनांना राग आहे. परंतु त्याची कारणे अधिक करून ऐहीक स्वरूपाची आहेत. स्थानिक बहुसंख्य एथनिकसना नोकरी वा घर उपलब्ध नसणे, ही त्यातली दोन प्रमुख कारणे आहेत. परंतु हे अशा स्वरूपाचे ऐहीक-हितसंबंधी गटातील संघर्षाची सोडवणूक करणे, हे राष्ट्राच्या शुद्धतेचे जे कोणी 'शत्रू' आहेत त्यांच्यापासून निर्माण झालेल्या धोक्यांचा निचरा करण्यापेक्षाही सोपे आहे.

युरोपने आधुनिकत्वाला केलेले जर काही योगदान असेल तर ते 'धरतीवादी' राष्ट्रवादाचे. अर्थात हा राष्ट्रवाद खूनी-शुद्धीकरणापर्यंत जाण्याची जी अवस्था कालांतराने आली ती त्यातून अर्थातच वगळावयाची. विद्यमानकाळी असे राष्ट्र-राज्य हे एकदा 'शुद्ध' झाले की, मग त्याला अर्थातच आणखी हिंसा करण्याची गरजच राहणार नाही. यदाकदाचित हिंसा करावी लागली तर ती अगदी अल्पप्रमाणात **विद्यमान काळात, ज्यांचे 'शुद्धीकरण' अगोदरच झालेले आहे, अशा अगणित लोकांच्या थडग्यावरच ही विद्यमान काळात अगदी कोठचाही दोष वा त्रूटी नसलेली राज्ये म्हणून जी समजली जातात ती उदारमतवादी राष्ट्रे-राज्ये बहरली आहेत.** खुद्द विद्यमान काळची अमेरीका,

ऑस्ट्रेलिया आणि जर्मनी या देशाबाबत ही वस्तुस्थिती आहे. दक्षिण आणि मध्य लॅटीन अमेरीका, आशिया खंड, पॅसिफिक महासागरातील बेटे आणि त्या लगतच्या प्रदेशातील काही भागात तेथे वस्ती करून असलेल्या मुळच्या रहीवाश्यातील छोट्या गटांचे शुद्धीकरण करण्याचे काम अजूनही चालूच आहे. या देशातून वसाहत करावयास आलेल्या लोकांच्या समांतर सैनिकांकडून हे 'शुद्धीकरण' करण्यात येते. सगळ्यात अत्यंत व प्रचंडही उपरोधिक अशी एक गोष्ट आहे. ती म्हणजे या प्रदेशात वसाहत करण्यासाठी आलेले लोक. या प्रदेशातील मूळ रहिवाशांचे 'शुद्धीकरण' करतात, व त्यानंतर याच प्रदेशात दुसरे अनेक लोक स्थलांतर करून कायम वसती करण्यासाठी येतात. सरतेशेवटी हे सर्व प्रदेश आपण 'बहुसांस्कृतिक' देश आहोत म्हणून मिरवतात. या प्रदेशातील मुळातील रहिवाशी ज्यांचे 'शुद्धीकरण' झालेले असल्याकारणाने त्यांचा आवाज ऐकूच येत नाही. परंतु नुकतेच स्थलांतर करून आलेले जे कोणी आहेत, त्यांचे दुसऱ्या कोठच्याही बाहेरच्या राष्ट्र-राज्याबरोबर गुटबंधन नसते. शिवाय आपणास स्थानिक स्वरूपाचे सार्वभौमत्व मिळालेच पाहिजे अशा धमक्या ते देत नाहीत. (याला अपवाद अर्थातच मुसलमानांचा ही जमात सुरुवातीला जेव्हा फारच नगण्य असते तेव्हा काहीही मागण्या करीत नाही. पण एकदा का ते जमेस धरावे इतके अल्पसंख्य झाले की त्यांच्या मागण्यास सुरुवात होते) उदा. अमेरीका ज्यास 'बहुसांस्कृतिकता' म्हणते ती बहुतांशाने अराजकीय स्वरूपाचे असते. अशा अर्थाने की या 'बहुसांस्कृतिका' पैकी कोणीही प्रतिस्पर्धी राज्याची मागणी करीत नाही. थोडक्यात अमेरीकेत स्थलांतर करून येणाऱ्या लोकांकडून प्रस्थापित राष्ट्र-राज्याला फारच अल्प धोका आहे. असे असल्याकारणाने सुरुवातीला स्थलांतर करून अमेरीकेत वसाहत करावयास गेलेले गोरे अमेरीकन, हे धरतीवादी राष्ट्रवादाच्या रूपाने आपली प्रतिक्रिया व्यक्त करीत नाहीत. प्रस्थापित अमेरीकन सरकारने बाहेरचे लोक इत:वर स्थलांतर करून अमेरीकेत येऊ नयेत, यासाठी सीमेवरची तटबंदी अधिक मजबूत केली. यामुळे 'बहु-सांस्कृतिक' 'उपरे' लोक समाधानी व खूष असतात. आता हे खरे आहे की 'खुनी-शुद्धीकरण' ही आजकाल फार क्वचितच आढळणारी गोष्ट झाली आहे. 'तिसऱ्या जगातील' अगर दक्षिण गोलार्धात प्रचलीत असलेल्या राजकीय सिद्धांतात 'धरतीवाद' राष्ट्रवाद डोकावतोच. पण त्यातील बहुतेक राष्ट्रवादांचे स्वरूप हे तसे फारच सौम्य आहे. मायलेशियातील पंतप्रधानांनी आपल्या देशात वर्चस्व गाजविणाऱ्या एकपक्षिय राजवटीचे समर्थन करताना पुढील स्वरूपाची गुढ भाषा वापरली होती. त्यांनी असे सांगितले की व्यक्तिपेक्षा गट व देश हा अधिक महत्त्वाचा आहे. असे प्रतिपादन करणारे तत्वज्ञान ही त्या एकपक्षिय राजवटी मागची धारणा आहे. मायलेशियन प्रंतप्रधान आपल्या या प्रतिपादनाला ते 'पाश्चिमात्य' नसून, ते 'आशियाई' आहे असे सांगणे त्यांना आवडते. गूढ भाषा असे येथे सांगितले ते एवढ्याचसाठी 'पाश्चिमात्य' वा 'आशियाई' म्हणजे नेमके काय याबद्दल या पंतप्रधानांनी काहीही सांगितलेले नाही. परंतु ही अशा प्रकारची विधाने करून आणखीन एक गुढ संदेश देतात. 'आशिया झिंदाबाद'. त्यांच्या



अनुक्रमणिका

एकंदर प्रतिपादनातून हेच सुचित होत आहे. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की धरतीवादी राष्ट्र ही संकल्पना ही प्रत्यक्षात अगदी सर्वस्वी युरोपिय आहे. दक्षिण आणि आग्नेय आशियात अनेक प्रकारची अशी राज्ये अस्तित्वात आहेत की, त्यापैकी जपान व कोरीयात यांच्या सारख्या काही राज्यात एकाच एथनिक जमातीचे (उदा. जपान व कोरीया यांच्या सारख्या काही राज्यात एकाच एथनिक जमातीचे) लोक, त्या देशाच्या लोकसंख्येत बहुसंख्येने आहेत. या उलट भारतासारख्या काही राष्ट्र-राज्यात, वेगवेगळे एथनिकक, हे बहुसंख्य आहेत. कोणत्याही एका एथनिकला बहुसंख्याक आहोत असे म्हणता येणार नाही. भारताशिवाय, इतर काही राष्ट्र- राज्यांचा तोंडावळा अजून नक्की झालेला नाही. परंतु विद्यमान काळी सुप्तावस्थेत असलेल्या शक्ती त्या देशात आपणास योग्य संधी केव्हा मिळते; यासाठी जरुर दबा धरून बसलेल्या आहेत, काही इस्लामी देशात, भारतात, आणि ईस्राईलमध्ये 'मूलतत्ववादी' लोक, आपल्या तत्वप्रणालीचे प्रतिपादन करून ठोसपणे आपला हक्क प्रस्थापित करू पहात आहेत. परकीय लोक आणि धर्मातीत (SECULARAIST) विचार सरणीचे लोक हे चुकीच्या मार्गावर नेणारे, अवनती, आणि पापी आचरण याकडे घेऊन जाणारे आहेत, असे या मुलतत्ववाद्यांचे सांगणे आहे. आपण धर्मनिष्ठ असून, सत्य आणि सद्‌गुणांचा ध्वज आपल्या खांद्यावर आहे असा ते दावा करतात. (धर्मातीत विचार सरणीच्या) विरोधात आहोत एवढेच नसून एखाद्या शक्तिशाली धर्मवादी (THEOCRATIC) राज्याने या सत्त्याचे प्रकटीकरण केलेच पाहिजे, या राज्याची असहिष्णुता, हा त्या राज्याचा सद्‌गुण आहे असे ते सांगतात. श्रीलंका, आणि इंडोनेसिया या राष्ट्र- राज्यातील ज्या विभागात एथनिक शुद्धीकरण करण्यात झालेले आहे, असे विभाग अस्तित्वात आहेत. साकल्याने विचार करीता, मध्यपूर्वेतील आणि आशिया खंडातील काही राज्ये ही 'धरतीवादी' राष्ट्रवादाच्या धोक्याला बळी पडण्याचा संभव आहे. हीच गोष्ट आफ्रिका खंडाबाबतचीही आहे. अर्थात या खंडात जमातवादी (TRIBALISM) हा महत्त्वाचा असा राजकीय धोका आहे. या कारणामुळे त्या खंडात अधून मधून एक सारखे अत्याचार व खून होत असतात. म्हणूनच तेथे धरतीवादी राष्ट्रवादाला पायबंद बसतो. या वस्तुस्थितीला अपवाद आहेत, ते ज्या राज्यात धार्मिक पंथ अस्तित्वात आहेत त्यांचा. प्रस्थापित अशा ज्या संयुक्त राजवटी या देशातून असतात, त्या टिकून रहाव्यात यासाठी या धर्मपंथियांचे धरतीवादी रसायन कारणीभूत म्हणूनच उपयुक्त ठरण्याचा संभव असतो. उदा. सुदान व नायजेरीया. दोनच प्रमुख व प्रभुत्व गाजविणारे एथनिकच आहेत अशा राष्ट्र-राज्यांची काही थोडी उदाहरणे आफ्रिकाखंडात आहेत. उदा. बुरूंडी आणि रुआंडातील अलिकडच्या काळातील घटना, 'बहुसंख्यांकाची लोकशाही' हे घोषवाक्य परजणाऱ्या 'हुतू' चळवळीमुळे घडलेल्या आहेत. प्रचंड प्रमाणावरील मानवी हत्त्या आणि सक्तीने इतर अल्पसंख्य एथनिकसना स्थलांतर करावयास भाग पाडणे हे त्या चळवळीचे फलीत होते, याची नोंद घेणे आवश्यक आहे.



अनुक्रमणिका

**राज्यवादाचा ऱ्हास**

धरतीवादाच्या सूत्रामध्ये आत्यंतिक राष्ट्रवाद हा जो घटक आहे तो दिवसेंदिवस कमकुवत होत आहे. काही धार्मिक मुलतत्वावादी आत्त्यंतिक राज्यवादाचा अजुनही पुकार करतात. फॅसिझम आणि कम्युनिझम या आत्यंतिक राज्यवादाचा पुरस्कार व समर्थन करणाऱ्या दोन प्रमुख राजकीय तत्त्वप्रणाली इतिहास काळात होत्या. अत्यंत शोकजनकपणे व मानवी संस्कृतीच्या सुर्दैवाने-भाई डांग्याचे चमचे काही म्हणोत- त्या कोसळल्या कारणाने सर्वच राज्यवादी प्रकल्प हे सध्या कमालीचे बदनाम झालेले आहेत. विद्यमान काळातील धरतीवादी हुकुमशाही राजवटी आपण लोकशाहीवादी आहोत असा बहाणा करतात, अगर आपल्या राजवटी थोड्याच दिवसात लोकशाहीच्या रोखाने आगेकूच करणार आहेत असे सांगतात. थोडक्यात फॅसिझम आणि कम्युनिझम हे ज्यांना नेमका अर्थ नाही अशी शिवीगाळ दर्शविणारी संज्ञा झाल्या आहेत. (स्टॅलीन प्रेमी पंडीत(?) भाई डांग्यांनी आणिबाणीच्या काळात, देशभक्त जयप्रकाश नारायण यांना फॅसिस्ट म्हणून शिवीगाळ केली होती, ती किती अर्थहीन होती याचे स्मरण या ठिकाणी वाचकास व्हावे) या सर्व प्रतिपादनाचा अर्थ असा होतो की आपण ज्यांना काही तत्त्वप्रणाली आहे अशा चळवळींचा (अर्थात याला काही थोड्या मुलतत्ववादी चळवळींचा अपवाद आहेच) विचार करीत नाही आहोत. नात्झी चळवळीवरती, व्यवहारी धोरणांचा व इतरही अनेक बाबींचा काहीही परिणाम होत नसे. तसेच या तत्वप्रणाली नसलेल्या चळवळींचे आहे. सध्या सर्वंकष सत्ता असलेले शक्तीशाली 'राज्य' ही शासनव्यवस्था त्याज्य ठरविण्यात आलेली आहे. तसे होण्याला काही घटनांचा संदर्भ व पार्श्वभूमी आहे. तथापी कालौघात या अशा शक्तिशाली राज्य व्यवस्थेला असलेला विरोध हळूहळू नाहिसा होईल. असे झाले म्हणजे मग 'धरतीवदी' राष्ट्रवादाचा पुरस्कार करणाऱ्या 'शुद्धीकरण' चळवळींचा गाडा ओढण्यासाठी आत्यंतिक 'राज्यवादी' मूल्यांचा उपयोग केला जाईल; आणि मग त्यातून फॅसिझम आणि कम्युनिझम यासारख्या हिंसक व कोणताही विधी निषेध न मानणाऱ्या तत्त्वप्रणालींची निर्मिती होईल.

भविष्यकाळात आत्यंतिक स्वरूपाचे एथनिक आणि राजकीय शुद्धीकरण केव्हा आणि कुठे उद्भविण्याचा संभव आहे या संबंधात, येथवर जो इतिहास कथन केलेला आहे त्यापासून आपणास काय शिकता येईल? हा अशा तऱ्हेच्या हिंसक घटनेचा निचरा होण्यासाठी, या घटनांना प्रतिबंध करण्यासाठी कोणत्या प्रकारची कारवाई करावी हे आपणास नक्की करता येईल का? **एक**-उदारमतवादी लोकशाहीचा उदय हा आधुनिकीकरणाचा अटळ असा परिणाम आहे. या प्रकल्पनेने जी खोटी संतुष्टता प्राप्त होते तिचा प्रथम त्याग केला पाहिजे. **दोन**-सामाजिक सुसंवाद व सामंजस्यातून उदारमतवादी लोकशाहीचा उदय झालेला नाही. सामाजिक संघर्ष विशेष करून वर्गविग्रहातून तिचा उदय झालेला आहे, या घटनांचा स्विकार केला पाहिजे. या अशा संघर्षाचा वस्तुनिष्ठ विचार करून आणि त्या संघर्षाला संस्थात्मक तडजोडीचे स्वरूप देऊन अगदी खुल्या दिलाने उदारमत-



अनुक्रमणिका

वादाला प्रोत्साहन देणे आवश्यक आहे. **तीन**-समजा एखाद्या देशात एकाच प्रकारचे एथनिक 'लोक' प्रभुत्व गाजवित आहेत. त्याजबरोबर या अशा देशात आणखी दोन प्रकारचे एथनिक अगर धार्मिक अल्पसंख्य राहात आहेत. या अल्पसंख्याकांपासून देशावर प्रभुत्व गाजविणाऱ्या बहुसंख्य एथनिक 'लोकांना' कोणत्या ना कोणत्या प्रकारचा धोका आहे असे संयुक्तिकपणे ज्या ठिकाणी/देशात सांगता येते, त्या देशात धरतीवादी लोकशाहीचा उदय होतो. या अशा प्रकारचा धोका त्यात काही अर्थ नाही असे म्हणून त्याकडे दुर्लक्ष न करता या हेरलेल्या धोक्याला वस्तुनिष्ठपणे सामोरे गेले पाहिजे. या देशात प्रभुत्व गाजविणाऱ्या बहुसंख्यांक एथनिकचे आपण प्रतिनिधी आहोत असे सांगणारे, अल्पसंख्यांबद्दल काही वेळा विपरीत गोष्टी प्रसूत करतात. उदा. देशातील अल्पसंख्य हे एका परक्या शत्रूशी सहकार करतात अथवा देशाचे शोषण करणाऱ्यांशी संबंधित आहेत, एखाद्या परक्या राष्ट्राशी अथवा 'आंतरराष्ट्रीय कट कारस्थान' यात सामिल आहेत, असे देशात प्रभुत्व गाजविणारे बहुसंख्य एथनिक भासवितात तेव्हा हा धोका निर्माण होतो. या अशा प्रकारे देशाचा शत्रू कोण आहे हे ओळखले व नक्की केले म्हणजे मग देशातील अंतर्गत संघर्षांना बाजूस सारून, सर्व धरतीवादी लोकांना एकत्र येण्यास खुला परवाना मिळतो. **चार**-या धोक्यात चार भिन्न व स्पष्ट असे धोके गार्भितपणे समाविष्ट आहेत. समजा एखाद्या देशात अल्पसंख्य एथनिक (वा धार्मिक पंथी) हे एका विशिष्ट भागात वस्ती करून आहेत, आणि त्यांना शेजारच्या राष्ट्र-राज्याचा पाठींबा आहे. मग अशा परिस्थितीत शेजारच्या राज्याकडे हा प्रदेश जाऊन, तो गमाविण्याचा धोका या मूळ राज्याला असतो. (भारतातील काश्मिर हे या संबंधातील एक चांगले उदाहरण) समजा या अल्पसंख्य एथनिकांना (धर्मियांना), शेजारच्या असलेल्या वा नसलेल्या, पण जगात इतरत्र पसरलेल्या समान एथनिकांचा (धर्मियांचा) पाठींबा असेल, तर अल्पसंख्याकांची ज्या प्रदेशात वस्ती आहे, त्याला मूळ राष्ट्र राज्यापासून अलग होऊन वा फुटून जाऊन एक नवे राज्य निर्माण होण्याचा धोका असतो. (काश्मिर व भारतातल्या मुसलमानांची बहुसंख्या असलेले इतर भाग हे याबाबतचे एक उदाहरण) समजा हे अल्पसंख्य एका विशिष्ट भागात एकवटलेले नसले तर एका अधिक विखुरलेल्या आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे हे शोषण आहे या स्वरूपात या संभाव्य धोक्याकडे पाहिले जाते. उदा. 'ज्यू वित्तिय भांडवलशाही' अगर 'ज्यू प्रणित बोलशेव्हिझम या प्रकारच्या आता इतिहासात जमा झालेल्या प्रकल्पना. **पांच**-देशातील नेते, व 'लोक' आणि या सर्वांची अल्पसंख्य एथनिकावर (धर्मियांवर) संयुक्तपणे होत असलेली सक्ती, सशक्त समांतर-सैनिक (अगदी स्पष्टपणे आधुनिक व 'जनताप्रिय'' असे संघटन) या सर्व गोष्ट देशातील प्रमुख सामाजिक संस्थांशी कशा प्रकारे संलग्न आहेत व त्यांची प्रकृती काय आहे, याबद्दलही जागरुकता ठेवणे, आवश्यक आहे.

एवंच आजच्या या जगाच्या अनेक भागाबद्दल काहीना काही प्रमाणात, कोणत्या ना कोणत्या प्रकारे सर्व मानवता प्रेमींना जरुर कर्तव्य आहे. अनेक विकसनशिल देशात, प्रभुत्व

गाजविणारी एकच एथनिक वा धार्मिक जमात असते. एखाद्या देशात एका विशिष्ट भागात एकत्रित झालेल्या अल्पसंख्याकांचा त्या स्थानिक भागावर जबरदस्त प्रभाव असतो. त्या अल्पसंख्याकांचे भाईबंद काही वेळा शेजारच्या देशात प्रभुत्व गाजविणारे बहुसंख्य असतात. (उदा. पाकिस्तान) काही विकसनशील देशांना परकीय साम्राज्यवाद्याकडून अथवा आंतरराष्ट्रीय भांडवलदाराकडून आपले शोषण होत आहे, असा अनुभव येत असतो. या अशा देशातील स्थानिक अल्पसंख्याकांचे या शोषण कर्त्याशी संबंध आहेत असे संयुक्तिकपणे दाखविले जाते. म्हणून या अल्पसंख्यांना आपली ताकद आपल्या संख्येच्या मानाने फार प्रचंड आहे असे वाटते. सरतेशेवटी समांतर लष्करी सैनिक ज्या शस्त्रांवर भिस्त ठेवून असतात, त्याचा विचार होणे आवश्यक आहे. या शस्त्रांच्या मदतीने तरुणांच्या काही गटाना, आपल्या स्वत:च्याच जमातीला धरतीवादीच्या तुरुंगात बंदीवान करून टाकता येते. पूर्वीच्या जगात, ही अशा प्रकारची शस्त्रे सहजपणे मिळविणे कधीही शक्य नव्हते. पण आता ती सहजपणे उपलब्ध असतात. या अशा प्रकारे उद्‌भवणाऱ्या धरतीवादी राष्ट्रवादाच्या दृष्टीने ही शस्त्रे सोईस्कर ठरलेली आहेत. परंतु हा असा राष्ट्रवाद खुनी-शुद्धीकरणाच्या रोखाने मुसंडी मारतो.

**वंश-उच्छेदाला प्रतिबंध**

**उत्तर गोलार्धात विद्यमान असलेल्या राष्ट्रांनी 'वंश-उच्छेद' प्रचंड प्रमाणावर केलेला असल्याकारणाने, त्यांचा या क्षेत्रातील अनुभवही दांडगा आहे.** म्हणूनच या उत्तरगोलार्धातील देशांना, वंश-उच्छेद सारखे आत्त्यंतिक व अमानुष प्रकार टाळण्याच्या कामात काही मदत करता येईल का? या लेखात चित्रित केलेलया 'जनता सार्वभौमत्वाच्या' इतिहासासंबंधी विचार करणे त्यासाठी आवश्यक आहे. पाश्चिमात्य देशात उदारमतवादी लोकशाहीची जी पद्धती प्रभावी आहे, तिने बहुसंख्याकीय आणि प्रादेशिक असे सार्वभौमत्व हा ढाँचा अतिशय 'पवित्र' मानलेला आहे. लोकशाही म्हटली की बहुसंख्याकांचे राज्य आणि प्रादेशिक सार्वभौमत्व त्यात अनस्युतच असते. परंतु त्याकारणाने या राज्यातून वरच्या थरावरचे आणि मोठ्या प्रमाणात केंद्रीकरण झालेले आहे. अर्थात ही परिस्थिती सार्वत्रिक नाही हे खरे आहे. परंतु मग स्थानिक पातळीवर एकत्रित झालेल्या अल्पसंख्याकाशी व्यवहार करताना, राज्यात सत्ता केंद्रित होणे ही परिस्थिती हा गुण ठरत नाही. त्या केंद्रीकरणाचा याबाबत काही उपयोग होत नाही. स्वित्झर्लंड आणि बेल्जियम यासारखे वाट-चुकलेले देश, वरील नियमाला अपवाद आहेत. या देशांनी अल्पसंख्याकांना सत्तेत भागीदार करून संघराज्यीय व सार्वमत्तीय राज्य पद्धती विकसित केल्या. ही व्यवस्था केवळ बहुंख्येवर अवलंबून नसल्याकारणाने, अल्पसंख्य-बहुसंख्य या संबंधातून निर्माण होणाऱ्या संघर्षाची प्रत्यक्षपणे योग्य सोडवणूक या राज्यव्यवस्थेला करता आली. केंद्रासंबंधी स्थानिक पातळीवर प्रश्न निर्माण न होणे या प्रकल्पनेला निपटून काढण्याबाबत भूतपूर्व कम्युनिस्ट युगोस्लावियाने काही बाबतीत आणखी पुढची पावले टाकली होती. आंतरराष्ट्रीय समाजाला या राज्यव्यवस्थेतील फायदेच समजले नाहीत असे म्हणावे लागते. बहुसंख्य एथनिक आणि





अनुक्रमणिका

प्रादेशिक सार्वभौमत्व या तत्वावर अधिष्टित अशी राष्ट्र - राज्यांच्या मालिकांची निर्मिती करण्यातले धोके त्यांना समजले होते असेही दिसत नाही. या दोन्ही गोष्टींची आंतरराष्ट्रीय समाजाला जाण असती, तर त्यांच्या चुकीच्या धोरणामुळे भयानक असे जे खूनी शुद्धीकरण उफाळून वर आले ते टाळता आले असते. एवंच इतर अन्य राजकीय राजवटी इतकीच लोकशाही राजवटही अनेक प्रश्न निर्माण करणारी असते.

दक्षिण गोलार्धातील विषमता अधिक रुंदावण्यापेक्षा काही स्थानिक संघर्षामुळे ती कमी होईल; तसेच समाजातील अंतर्गत संघर्ष विशेष करून वर्ग संघर्ष यांना संस्थात्मक स्वरूप काही स्थानिक संघर्षामुळे प्राप्त होईल, अशा प्रकारचे जे संघर्ष असतील त्याबाबत आंतरराष्ट्रीय राजवटी अधिक संवेदनाक्षम कशा राहतील यासाठी त्या देशातील नागरीकांनी प्रयत्नशील राहिले पाहिजे. अलीकडच्या काही वर्षात, भांडवलशाहीची 'मृतप्राय' अशा नियमांच्या पकडीतून मुक्तता करण्याच्या प्रयत्नात आंतरराष्ट्रीय संस्था आहेत. मुक्त बाजारपेठ ही 'झटका दायक औषध उपचारी' अर्थव्यवस्था करण्याचा प्रयत्न होणार आहे. परंतु बेकारी, व मजुरी यांची पातळी, कामगारांना संरक्षण आणि राजकीय प्रतिक्रीया या सर्वांबाबत त्या धोरणांचे परीणाम काय होतात याकडे साफ दुर्लक्ष करण्यात येत आहे. परकीय शोषणाविरुद्ध आत्यंतिक अशी स्थानिक राष्ट्रवादी प्रतिक्रिया या अशा धोरणातून निर्माण होण्याची संभाव्यता कितीतरी अधिक आहे. अन्य कोठल्याही धोरणातून अशा प्रतिक्रिया निर्माण होणार नाहीत. तसेच या धोरणाशी स्थानिक पातळीवरचे अल्पसंख्य संलग्न आहेत असा प्रचार या देशातील बहुसंख्य एथनिकांना संयुक्तिक वाटून, त्याला ते बळी पडण्याचा संभव अधिक आहे. उदा. इंडोनेशियातील आणि जवळपासच्या अन्य देशातील चिनी भांडवलदाराकडे- ते आशिया खंडातील 'ज्यू' आहेत, अशा स्वरूपात पाहिले जाते. सरतेशेवटी आपणखी एक मुद्दा नमूद करणे आवश्यक आहे. अवजड शस्त्रास्त्रे काही विकसन राज्यातील मध्यवर्ती सत्ता नागरीकांवर दडपशाही करण्यासाठी वापरतात. छोट्या शस्त्रास्त्रांच्या आधाराने समांतर-लष्करी दले फोफावतात. हे लक्षात घेऊन, आपल्या गोलार्धातील राज्यांकडून होणाऱ्या शस्त्र विक्रीवर उत्तर गोलार्धाने नियंत्रण ठेवले पाहिजे. याचे कारण या बंदुका रोखणारे लोक, आपण बिनीच्या जनता पक्षाचे प्रतिनिधी आहोत असा दावा करीत असल्याकारणाने, त्यांच्या बंदुका मतपेटी निकालात काढतात. शस्त्रास्त्र निर्मितीतील भांडवलदार हे उदारमतवादी लोकशाहीच्या गळ्याला नख लावून स्वत:ची तुंबडी भरतात.

हे धोरण अयशस्वी झाले तर? प्रचंड प्रमाणावरील मानवी हत्येला सामोरे जाण्यास लागण्याची शक्यता अधिक. आंतरराष्ट्रीय पातळीवर ताबडतोब न्यायालयीन कारवाई करणे, शक्तिशाली असा राजकीय-सैनिकी हस्तक्षेप करणे या गोष्टींना नैतिक पाठींबा देण्यासाठी उत्तर गोलार्धाने सज्ज असावयास हवे. विद्यमान कालाकडे आणि गत इतिहासाकडे अधिक वस्तुनिष्ठपणे आणि प्रामाणिकपणे पाश्चिमात्त्यांनी पाहिले पाहिजे. अमेरीका आणि पश्चिम युरोप व जवळपासचे देश या ठिकाणी आधुनिकीकरण होण्याच्या प्रक्रियेत एथनिक आणि राजकीय



अनुक्रमणिका

शुद्धीकरणास मध्यवर्ती स्थान होते. **म्हणूनच आधुनिक अशी बहुएथनिक उदारमतवादी, अगर सामाजिक लोकशाही साध्य करणे ही किती कठीण कामगिरी होती आणि आहे ही या वस्तुस्थितीची जाणिव पाश्चिमात्त्यांना असणे जरुरी आहे. भारताकडे त्यांनी उपेक्षेने पाहणे या संदर्भात हे अत्त्यंत निषेधात्मक आहे.** धरतीवादी राष्ट्रवाद हा सर्वसामान्यपणे समजला जातो वा मान्य केला जातो, त्यापेक्षा कितीतरी **अधिक जनताप्रिय** आहे. म्हणूनच या अगोदरच्या छेदकात सांगितलेली सर्व धोरणे जर अयशस्वी ठरली तर मग या खूनी-उद्रेकांना वाट करून देऊन, त्यातील भयानक हिंसकता कमी कशी होईल यासाठी योजना करणे आणि ती योजना तयार असणे हे आवश्यक आहे. एकतर दोन प्रतिस्पर्धी पक्षात वाटाघाटी होऊन या धरतीवादी उद्रेकाचा मोर्चा दुसरीकडे कसा वळविता येईल हे पहावयास हवे. परस्परांच्या संमतीने लोकसंख्या आणि मालमत्ता या दोहोंची अदलाबदल हा एक मार्ग आहे. हा मार्ग सामान्यपणे 'सेक्युलर' (?) विचारसरणीच्या लोकांना मान्य होत नाही. हिंदुस्थानची विभागणी होऊन 'भारत' तयार झाला त्यावेळी हा मार्ग सुचविला गेला होता. पण आपण सेक्युलर आहोत ही आपली आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा जपण्याकरता श्री जवाहरलाल नेहरू यांना तो मान्य नव्हता. पुढे जो वंश-उच्छेद झाला तो इतिहास आहे. दुसरे उदाहरण अगदी अलिकडच्या काळातले. सार्बियातील कॉसव्हो या विभागाचे. या ठिकाणाचे अल्बेनियन मुसलमान आणि ख्रिश्चन सर्ब यांच्यात वर उल्लेखिलेली अदलाबदल व्हावी, असे सुचविण्यात आले होते. पण दुसऱ्यांना नितिमत्तेचे धडे देणाऱ्या आत्मसंतुष्ट 'सेक्युलर' पाश्चिमात्यांनी तो मार्ग त्याज्य ठरविला, मग काय झाले तो आजचा इतिहास आहे. संकल्पित राष्ट्र-राज्यांच्या सीमा रेषांची पुर्नआखणी अभिप्रेत कोणती 'टोळी' (TRIBE) कोणत्या प्रदेशात राहाते हे लक्षात घेऊन, तो प्रदेश संलग्न असेल तर ते एक राज्य-राष्ट्र म्हणून त्याची निर्मिती व्हावयास हवी होती. असे झाले असते तर कृष्णवर्णिय आफ्रिकन टोळ्यांनी एकमेकांची केलेली प्रचंड कत्तल टळली असती. पण सेक्युलर आफ्रिकन नेत्यांनी आपल्या सत्तेला कात्री लागेल यासाठी हा मार्ग त्याज्य ठरविला. एवंच या उल्लेखिलेल्या मार्गाव्यतिरिक्त इतरही मार्गांचा शोध घेता येईल. दुष्ट प्रवृत्तीच्या कारस्थानांविषयी नैतिक निषेध नोंदविण्यापलिकडे जाऊन आंतरराष्ट्रीय पातळीवर अधिक काहीतरी करण्याची आवश्यकता आहे. रचनात्मक अगर सर्व घटक लक्षात घेऊन केलेल्या प्रत्यक्ष कारवाईची जोड, त्या दृष्ट प्रवृत्तीच्या व प्रकृतीच्या विरुद्ध दिलेल्या इशाऱ्यांना नसेल, तर मग त्या 'दुष्ट नेत्यां'च्या स्थानिक लोकप्रियतेत भर पडण्याचा संभव आहे. याचे कारण विकसनशील राज्यांना उपदेश करणारे पाश्चिमात्त्य राज्यकर्ते हे स्वत: ज्या राज्यात एथनिक शुद्धीकरण अगोदरच झालेले आहे, अशा राज्यातच रहात असल्याकारणाने त्या राज्यकर्त्यांनी त्या दुष्ट नेत्यांचा केलेला तो 'निषेध' दांभिकच आहे, असा दावा विकसनशील राज्यातील जनतेला, आणि पाश्चिमात्त्य जगतातील मानवता प्रेमी लोकांना आणि लोकशाही समाजवाद्यांना (कम्युनिस्ट, वा त्यांच्या सहप्रवाशांना नाही) करता येतोच.

---



अनुक्रमणिका

# विज्ञान आणि समाज

## गॅलिलिओ, त्याची कन्या आणि समाज

**– सौ. सुमती जोशी**

**गॅलिलिओ गॅलिलि** (जन्म १५ फेब्रुवारी १५६४ – मृत्यू ८ जाने. १६४२) या इटालियन शास्त्रज्ञाने विज्ञान जगताला दिलेले योगदान अनन्यसाधारण आहे. सोळाव्या शतकातील युरोपीय विचारप्रवाह हे दोन प्रभावी शक्तीनी नियंत्रित केले जात. त्यातील पहिली शक्ती म्हणजे पोपच्या अधिपत्याखालील रोमन कॅथलिक चर्च आणि दुसरी शक्ती म्हणजे ग्रीक तत्त्ववेत्ता **ॲरिस्टॉटल** याचे दोन हजार वर्षापूर्वीचे तत्त्वज्ञान.

'पृथ्वी ही विश्वाच्या केंद्रस्थानी आहे' या कल्पनेवर त्याकाळचे विश्वाबाबतचे सर्वमान्य सिद्धान्त अवलंबून होते. हाच विचार रोमन कॅथलिक चर्चला मान्य होता. परंतु पंधराव्या शतकात पोलिश शास्त्रज्ञ **निकोलाय कोपर्निकस** याने 'पृथ्वी म्हणजे निव्वळ एक ग्रह असून ती एका कक्षेत सूर्याभोवती फिरते' असे प्रतिपादन केले. आणि चर्चला मान्य असलेल्या संकल्पनेला पहिला हादरा दिला. त्यानंतरच्या शतकात **कोपर्निकसच्या** विचारांना **गॅलिलिओने** दुजोरा दिला. **गॅलिलिओने** जुन्या दुर्बिणीत पुष्कळ सुधारणा केल्या. नव्या प्रभावी दुर्बिणीच्या सहाय्याने त्याने आकाशस्थ ग्रहगोलाची सूक्ष्म निरीक्षणे केली. प्रत्यक्ष गणिती पद्धतीने 'या विश्वाच्या केंद्रस्थानी पृथ्वी नसून सूर्य आहे', हे **गॅलिलिओने** सिद्ध केले. **'डायलॉग कन्सर्निंग टू दि सिस्टिम्स ऑफ दि वर्ल्ड'** या आपल्या पुस्तकात त्याने हे वैज्ञानिक सत्य जगापुढे मांडले. रोमन कॅथलिक धर्माच्या विरोधात मत मांडल्यामुळे गॅलिलिओला पाखंडी ठरविण्यात आले आणि उरलेले पूर्ण आयुष्य कैदेची शिक्षा ठोठावण्यात आली. याखेरीज लंबकाचा शोध व त्याचे नियम, उंचावरून पडणाऱ्या वस्तूंविषयीचे नियम यासारख्या विज्ञानाच्या अनेक विषयात त्याने महत्त्वाची कामगिरी बजावली.

वैज्ञानिक सत्य जगापुढे मांडण्यासाठी सर्वांचा रोष पत्करणाऱ्या या महान शास्त्रज्ञाने नाव या नवीन सहस्त्रकात पुन्हा एकवार चर्चेत येण्याचे कारण मात्र अनोखे आहे. **गॅलिलिओची** मोठी मुलगी **मारिया सेलेस्टे** हिने आपल्या वडिलांना लिहिलेली पत्रे नव्याने प्रकाशात आली आहेत. त्या पत्रांच्या आधारे **'दावा सोबेल'** या लेखिकेने **'गॅलिलिओज डॉटर'** या शीर्षकाचे पुस्तक लिहिले आहे. चारशे वर्षांपूर्वी इटालियन भाषेत लिहिलेल्या आणि अगदी जीर्णावस्थेत असलेल्या या पत्रांचे भाषांतर करण्यात आले आहे. या पत्रांतील मजकुराचे कोटकोर विश्लेषण करून सतराव्या शतकात होऊन गेलेल्या या महान शास्त्रज्ञाच्या



अनुक्रमणिका

जीवनावर या पुस्तकाने नवा प्रकाश टाकला आहे. **मारिया सेलेस्टेच्या** पत्रातील भाषा संभाषणात्मक नाही. प्रार्थनेकरिता, परमेश्वराची करुणा भाकण्याकरिता भाषेचा जो ढाचा वापरण्यात येतो. तशा भाषेत ती पत्रे लिहिली आहेत.

हे पुस्तक सतराव्या शतकाच्या पूर्वार्धातील जुन्यापुराण्या, काळपट अवस्थेतील पेंटिंग्जच्या स्वरुपात वाचकांपुढे येते. लेखिका **दावा सोबेल** हिने जणु मेणबत्तीच्या मंद प्रकाशात त्या काळातील भिन्नभिन्न व्यक्तीरेखा. अत्यंत प्रभावाशाली चर्च. 'कार्डिनल' या सर्वोच्च धार्मिक अधिकाऱ्याच्या कार्याची मलीन बाजू या सर्वांना सजीव रूप दिले आहे. लेखिकेने सद्यस्थितीतील व्यक्तीरेखांचे रूप देऊन त्या रंगविलेल्या नाहीत, त्यामुळे समकालीन पातळीवर त्या आपल्या जीवनात येत नाहीत. याउलट त्या सर्व व्यक्ती तो विशिष्ट काळ त्यातील बारकाव्यानिशी आपल्यापुढे उभा करतात. सतराव्या शतकातील लिखाणाचे पूर्णत्त्वाने आकलन करून लेखिकेने या पुस्तकातून तत्कालीन इटलीचे दर्शन वाचकांना घडविले आहे. आपल्या प्रतिभेच्या जोरावर तो काळ सर्व वैशिष्ट्यांसह वाचकांपुढे जिवंत केला आहे. हा **दावा सोबेलच्या** पुस्तकाचे **विशेष** आहे. आणि तेच त्या पुस्तकाच्या यशाचे गमक आहे.

**गॅलिलिओ गॅलिलिला** तीन मुले होती. दोन मुली आणि एक मुलगा. व्हेनिसनिवासी **मरीना गॅम्बाशी** असलेल्या **गॅलिलिओच्या** संबंधातून या तीनही मुलांचा जन्म झाला होता. सर्वात मोठी मुलगी **व्हर्जिनिया** म्हणजे **गॅलिलिओची** प्रतिकृती होती. बुद्धिमत्ता, उद्योजकता आणि शहाणपणा या गुणांचा वारसा लाभल्यामुळे ती वडिलांची 'विश्वसनीय लेक' झाली होती. याउलट तिची धाकटी बहीण **लिव्हिया** हिने अगदी विचित्र वाटावे असे किंवा कदाचित् मानसशास्त्रीय असंतुलन दर्शविणारे मौन धरले होते. त्या दोघींचा भाऊ **विन्सेन्झिओ.** त्याची वागणूक कायमच स्वार्थी आणि दुर्मुखलेपणाची असे.

"या विश्वाच्या केंद्रस्थानी हालचालविरहीत अवस्थेत राहण्याऐवजी पृथ्वी ही सूर्याभोवती फिरत आहे." असा रोमन डॉमिनिकन महन्त **जिऑरडॅनो ब्रूनोचा** विश्वास होता. परंतु धर्माच्या आणि प्रचलित विचारप्रणालीच्या विरुद्ध असलेल्या या मताचा आग्रह धरल्यामुळे इ. स. १६०० साली रोममध्ये **ब्रूनोला** सुळावर चढवले होते. आणि योगायोग असा की त्याच वर्षी नवीन शतकांतील उन्हाळ्यात १३ ऑगस्ट या दिवशी **गॅलिलिओची** मोठी मुलगी **व्हर्जिनिया** हिने या जगात प्रवेश केला. ज्या जगाला अजूनही पृथ्वीचे खरे स्थान माहीत नाही अशा जगात **ब्रूनोच्या** पावलावर पाऊल टाकून भविष्यात चर्चबरोबर वैश्विक मतभेद मांडण्यात **गॅलिलिओ** गर्क होणार होता. गॅलिलिओने मरीना गॅम्बाचा 'धर्मपत्नी' म्हणून स्वीकार केला नव्हता; परिणामतः 'आपल्या अनौरस मुली धार्मिकदृष्ट्या विवाहायोग्य नाहीत' .असे त्याला वाटत असे. म्हणूनच **व्हर्जिनियाच्या** तेराव्या वाढदिवसानंतर लवकरच फ्लॉरेन्सच्या दक्षिणेला सुमारे एका मैलावर असलेल्या **आर्सेस्ट्री** या गावातील **सॅन मॅटिओ कॉन्व्हेंटमध्ये** त्याने आपल्या दोन्ही मुलींची व्यवस्था केली. दारिद्र्य आणि एकलकोंडेपणात

त्या दोघीनी आपले सर्व आयुष्य त्याच कॉन्व्हेंटमध्ये घालवले. (टस्कनीचा ड्युक **कॅसिमो डी मेडिसी'** याच्या आज्ञेवरून गॅलिलिओचा मुलगा **व्हिन्सेन्झिओ** याला कायदेशीरपणे औरसपणाचे हक्क मिळाले. त्यामुळे तो पिसा येथील विश्वविद्यालयात कायद्याचे शिक्षण घेण्यास गेला. पुढे त्याने एका श्रीमंत स्त्रीबरोबर विवाह केला. तिच्यापासून **व्हिन्सेन्झिओला** तीन मुलगे झाले)

वयाच्या सोळाव्या वर्षी **व्हर्जिनियाने** जेव्हा 'नन' म्हणून जीवन जगण्याची शपथ घेतली तेव्हा तिने **"मारिया सेलेस्टे"** हे नाव धारण केले. 'सेलेस्टियल' या शब्दाचा अर्थ 'खगोलीय– ग्रहगोलांशी सबंधित' असा आहे. म्हणजे **'सेलेस्टे'** हे नाव धारण करण्याची **व्हर्जिनियाची** कृती आपल्या वडिलांच्या आकाशस्थ ताऱ्यांविषयीच्या आकर्षणाची दखल घेणारी होती. पुढे संपूर्ण आयुष्यभर ईशआराधना आणि तपस्या करताना आधारस्थानी असलेल्या संताप्रमाणे ती गॅलिलिओप्रती समर्पित जीवन जगली. गॅलिलिओचेही तिच्यावर निरतिशय प्रेम होते. तिचे प्रगल्भ मन. स्वभावातील चांगुलपणा आणि त्याच्याप्रती असलेला तिचा हळुवार अनुबंध यामुळे तो मोहित झाला होता. कॉन्व्हेंट सोडून **व्हर्जिनिया** कधी गेली नाही आणि कॉन्व्हेंटमध्ये जाऊन वारंवार तिला भेटण्यासाठी गॅलिलिओला वेळ मिळत नसे. त्यामुळे आयुष्यभर पिता-पुत्री यांचा पत्रव्यवहार चालू राहिला. त्यापैकी **व्हर्जिनियाने** लिहिलेली **एकशे चोवीस पत्रे** उपलब्ध आहेत. यातील प्रत्येक पात्र हे तिच्या दैनंदिन जीवनाचे दर्शक आहे. दातदुखीपासून व्हिनेगारच्या वासापर्यंतच्या सर्व बारीक सारीक गोष्टींचा उल्लेख तिच्या पत्रात आहे. इतकेच नव्हे तर तिच्या कॉन्व्हेंटच्या गुप्त जगताची काळी बाजू उघड करून सांगणारे कितीतरी परिच्छेद त्यात आहेत. उदा. २२ नोव्हेंबर १६२९ च्या पत्रात ती लिहिते–

"माझी मागची दोन पत्रे योग्य पद्धतीने नियोजन करून लिहिण्याऐवजी मी सहज सुचेल त्याप्रमाणे खरडली होती; त्याबद्दल तुम्ही मला क्षमा करावी. या पत्रात मी माझे मन मोकळे करण्याचा विचार करीत आहे. आमच्या नव्या प्रमुख मठस्वामिनीने भ्रांतचित्त मनोवस्थेने तिचा ताबा घेतल्यावर अगदी अलिकडच्या काळात दोन वेळा आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न केला. परिणामत: माझ्या आणि इतर सर्वांच्याच मनात एक प्रकारची भीती निर्माण झाल्यामुळे मी हादरून गेले. खरोखरच या घटनांमुळे माझे अर्धेअधिक भान हरपले."

"पहिल्या वेळेस त्यांनी आपले डोके आणि चेहरा जमिनीवर इतक्या जोराने आपटला की त्या आघातामुळे त्या अतिशय विद्रुप दिसू लागल्या. दुसऱ्या वेळी एका रात्रीत त्यानी स्वत:वर तेरा वेळा वार करून घेतले. त्यामुळे गळ्यावर दोन व पोटावर अकरा जखमा झाल्या. अनेक जखमा झालेला त्यांचा देह जेव्हा रक्ताच्या थारोळ्यात पडलेला आम्ही पाहिला तेव्हा आमच्या उरात कसे धस्स झाले आणि भीतीने आमच्या मनाला कसा विळखा घातला हे मी सांगण्याची जरुरी नाही. ते तुम्ही कल्पनेने जाणून घ्याल."

"त्या अत्यंत गंभीरपणे जखमी झाल्या होत्या आणि त्या अशा तऱ्हेने विव्हळत होत्या की त्या आवाजामुळे आमची पावले त्यांच्या खोलीकडे वळली. त्यांचे विव्हळणे ऐकून आम्ही

अधिकच बेहोश झालो. कन्फेशनसाठी त्यांनी प्रीस्टची मागणी केली. कन्फेशन या धर्मविधीत पापाची कबुली धर्मगुरुजवळ दिली की मग त्या पापाबद्दल क्षमा मिळते. आपल्या गुन्ह्याचा कबुलीजबाब देताना आपण वापरलेले हत्यार आम्ही कोणीही पाहू नये या हेतूने त्यानी त्या प्रीस्टच्या हवाली केले. (ते हत्यार म्हणजे खिशात ठेवायचा छोटा चाकू असावा असा आमचा अंदाज आहे.) या सर्व घटनांवरून त्या चमत्कारिक तर होत्याच पण कावेबाजही होत्या असे मला वाटते. खरे पाहता त्या जखमांमुळे त्यांना मृत्यू येईल असे अपेक्षित होते. शल्यविशारदांच्या मते त्यांच्या सर्व जखमा धोकादायक होत्या. असे असूनसुद्धा परमेश्वराने त्यांना जिवंत ठेवले. खरोखरच परमेश्वरी न्याय फार विचित्र आहे. या सर्व घटना घडत असता आम्ही सर्वांनी रात्रंदिवस सातत्याने त्यांची जपणूक केली. परमेश्वरी कृपेने आम्ही सर्वजणी आता त्या धक्क्यातून सावरलो आहोत. त्या मात्र अजूनही त्याच भ्रांतीमध्ये अंथरुणाला खिळून आहेत. अजूनसुद्धा त्या काहीतरी भयंकर कृती करतील की काय अशी भीती मनात बाळगून आम्ही राहत आहोत.''

**मारिया सेलेस्टे** राहात असलेल्या धर्मस्थानाचा काही भाग अजूनही शिल्लक आहे आणि तेथे सात कार्मेलाइट धर्मगुरुंचे वास्तव्य आहे. लेखिका दावा सोबेल म्हणते, ''मी जेव्हा त्या स्थानाला भेट दिली तेव्हा मी तेथील आवाराच्या करड्या पंचकोनी फरशांवरून चालले. 'न जाणो, त्या नवीन ननने स्वत:ला शिक्षा करून घेण्यासाठी कदाचित फरसबंदी केलेल्या याच स्थानाची निवड केली असेल' असा विचार माझ्या मनात आला. **मारिया सेलेस्टेच्या** बारकाव्यानिशी केलेल्या वृत्तांतातही अनेक प्रश्न अनुत्तरित राहातात. तिच्या पत्रांची माहिती जेव्हा मला समजली तेव्हा **गॅलिलिओची** उत्तरेसुद्धा कोठेतरी, किंवा कदाचित व्हॅटिकन वाचनालयाच्या कोनाड्यात दडलेली असली पाहिजेत असे इतर अनेक लोकांप्रमाणे मीसुद्धा गृहित धरले. धार्मिक अधिकारी आणि परवानाधारक संशोधक यानी ऐतिहासिक कागदपत्रे पुन:पुन्हा पिंजून काढली आहेत. परंतु ती पत्रे काही मिळाली नाहीत. पाखंडी लोकांच्या मतांची चौकशी करणाऱ्या रोमन धर्मसंस्थेने **'गॅलिलिओ हा प्रचलित धर्म आणि रुढी याविरुद्ध मते मांडणारा आहे'** असा दाट संशय व्यक्त केला होता. अशा या माणसाची पत्रे **मदर अॅब्बेस** यानी नष्ट केली असतील असा निष्कर्ष सरतेशेवटी अधिकाऱ्यानी आणि संशोधकानी काढला. **गॅलिलिओने** सही केलेल्या कोणत्याही कागदाचे ऐतिहासिक महत्त्व लक्षात घेता असे कागदपत्र असते तर गेल्या दोन शतकात त्याना मोठमोठ्या आकड्यांच्या किंमतीची मागणी झाली असती. म्हणून अशा पत्रांचा संच अजूनही कुठेतरी दडलेला असण्याची शक्यता संभवत नाही.''

**गॅलिलिओने** विशेष प्रसंगाची घाईघाईने केलेली असंख्य टिपणे, त्याची नाटके, कविता, सुरुवातीच्या काळात दिलेली व्याख्याने आणि पुस्तकांची हस्तलिखिते नाहीशी झाली आहेत. त्याच्या समकालीन व्यक्तींशी झालेला पत्रव्यवहार आहे. त्याची संख्या दोन हजारावर आहे. या पत्रात **गॅलिलिओच्या** हस्तलिखितांबाबतचा जो उल्लेख आढळतो. त्यातील उल्लेखांच्या रुपातच त्यांचे अस्तित्व राहिले आहे. सुदैवाने प्रकाशित झालेली आणि

अतिशय महत्त्वाची अशी त्याची पाच पुस्तके शिल्लक आहेत. त्याबरोबर त्याने स्वत: हाताने बनविलेल्या मूळ दुर्बिणींपैकी एक दुर्बिणही उरली आहे. मृत्युनंतर प्रक्रिया करून ठेवलेले त्याच्या शरीराचे अवयवसुद्धा आहेत. (त्याच्या उजव्या हाताचे मधले बोट सोन्याचा मुलामा दिलेल्या काचेच्या आवरणात बंदिस्त केलेले असून संगमरवरी बैठकीवर ते बसवले आहे फ्लॉरेन्समधील विज्ञानाच्या ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयात ते पहावयास मिळते)

फक्त सिस्टर **मारिया सेलेस्टे** हिची पत्रे आज शिल्लक आहेत. पुठ्ठा आणि चामड्याची वेष्टने असलेल्या एका भागात ती एकत्रित केली असून फाटलेले जीर्ण झालेले वेड्यावाकड्या कडा असलेले पत्रांचे कागद आता फ्लॉरेन्सच्या राष्ट्रीय मध्यवर्ती वाचनालयाच्या दुर्मिळ हस्तलिखितात ठेवलेले आहेत. त्या पत्रांतील काळ्या शाईत लिहिलेली अक्षरे आता चॉकलेटी झाली असली तरी या सर्व पत्रांमधील हस्ताक्षर अजूनही वाचता येण्याजोगे आहे. काही पत्रांमध्ये **गॅलिलिओच्या** हस्ताक्षरातील भाष्य आहे. **मारिया** ज्या गोष्टींबद्दल बोलत असे त्याबद्दल कधीमधी तो समासामध्ये टिपणे काढीत असे किंवा इतर वेळी त्याचा पत्ता लिहिलेल्या पानावर आजूबाजूच्या मोकळ्या जागी पत्रातील मजकुराशी संबंधित नसलेली आकडेमोड किंवा भौमितीय आकृत्या काढीत असे. यापैकी कित्येक पाने बारीक भोके पडून खराब झाली आहेत किंवा फाटली आहेत. तर काही पाने आम्लामुळे किंवा बुरशीमुळे काळपट झाली आहेत. काही पानांवर सांडलेल्या तेलाचा लेप बसला आहे. इतर काही पत्रातील अक्षरे ओलसरपणामुळे धूसर झाली आहेत. काही तर चक्क पावसात भिजली आहेत. आणि काही पानांवर अश्रूंचे डाग पडल्यासारखे दिसत आहेत. जवळजवळ चारशे वर्षांनंतरसुद्धा पत्र बंद करण्याकरता वापरलेली लाल लाख अजूनही त्या पानांच्या दुमडलेल्या कोपऱ्यात चिकटलेली दिसत आहे.

संक्षेपरूप न करता आहेत त्याच स्वरूपात या पत्रांचे भाषांतर कधीच प्रकाशित झाले नसले तरी त्यामुळे **गॅलिलिओच्या** चरित्राची नव्याने मांडणी करता येते. सतराव्या शतकातील कॅथलिक सिद्धान्ताशी असलेल्या ज्याच्या संघर्षाचे पडसाद आजही उमटतात त्या गॅलिलिओचे व्यक्तीमत्त्व आणि मानसिक अस्वस्थता याचे वेगळे दर्शन या पत्रांमुळे होते. पोप जॉन पॉल (दुसरा) याने या पत्रांचे निरीक्षण व अभ्यास करून १९९२ साली सांगितले. "कॅथलिक चर्च आणि गॅलिलिओ' या परस्परामधील मतभेदांचे स्पष्टीकरण 'विज्ञान आणि श्रद्धा' यामधील मूलभूत विरोधाच्या प्रतिबिंबाच्या स्वरूपात झालेले या पत्रामध्ये दिसते."

**मारिया सेलेस्टेच्या** पत्रांवरून **गॅलिलिओच्या** व्यक्तीमत्त्वाचे जे दर्शन होते त्यावरून आपल्या लक्षात येते की **गॅलिलिओला** मात्र अशा प्रकारचे विभाजन अभिप्रेत नव्हते. अखेरपर्यंत तो स्वत: कॅथलिक पंथाचा सच्चा अनुयायी राहिला. प्रार्थनेच्या सामर्थ्यावर त्याचा विश्वास होता. शास्त्रज्ञ होणे ही आपल्या आत्म्याची नियती आहे असा त्याचा समज होता आणि एक शास्त्रज्ञ या नात्याने असलेले आपले कर्तव्य करण्यासाठी तो सतत प्रयत्नशील होता. सूर्यावरील डागांच्या स्वरूपाविषयी चिंतन करताना इ. स. १६१२ साली गॅलिलिओ जर्मनीमधील वार्ताहराला लिहितो, "परमेश्वराने दिलेली ती सर्वात उच्च दर्जाची देणगी या

स्वरूपात आपण तिचा स्वीकार केला पाहिजे. यामध्ये कोणताही बदल करण्याची ताकद आपल्यात नाही.''

**गॅलिलिओचा जन्म इ. स. १५६४** साली पिसा येथे झाला. प्रारंभी पिसा येथे व नंतर पादुआला गणिताचा प्राध्यापक म्हणून त्याने आपल्या कारकीर्दीची सुरुवात केली. नैसर्गिक जगाचे गणिती भाषेत वर्णन करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांपैकी तो एक होता. लोक त्याला **'प्रायोगिक भौतिकशास्त्राचा पिता'** असे गौरवतात. परंतु बहुतेक लोक कोणत्याही एकट्या व्यक्तीने आजपर्यंत कधीही दावा केला नसेल इतक्या खगोलशास्त्रीय शोधांच्या दीर्घ मालिकेशी त्याचे नाव निगडीत करतात. **इ. स. १६०९** साली जेव्हा **व्हर्जिनिया** नऊ वर्षांची होती तेव्हा त्याने **दुर्बिण** बनवली. आपल्या घराच्या मागील बाजूस असलेल्या अंगणात आकाशाच्या दिशेने ती ठेवली. घनदाट ताऱ्यांच्या मालिकेच्या स्वरुपात दिसणारी आकाशगंगा, चंद्रावरील डोंगर आणि दऱ्या त्याने पाहिल्या. गुरू या ग्रहाभोवती नियमितपणे फिरणाऱ्या चार उपग्रहांच्या लघुरुपातील ग्रहगोलसंस्था सुद्धा **गॅलिलिओने** आपल्या दुर्बिणीतून पाहिली. त्याविषयी **गॅलिलिओ** लिहितो, ''मी परमेश्वराचे अमर्याद आभार मानतो. तो इतका दयाळू आहे की त्याने मला एकट्याला गेली कित्येक शतके अव्यक्तात लपलेल्या अद्भूत गोष्टी न्याहाळणारा पहिला प्रेक्षक केले.''

या शोधामुळे गॅलिलिओचे जीवन पूर्णपणे बदलले. **कॉसिमी-डी-मेडिसी येथे इ. स. १६१० साली प्रमुख गणिती आणि तत्त्वज्ञ म्हणून त्याची नेमणूक झाली.** या पदावर रुजू होण्यासाठी जिने बारा वर्षे त्याचे साहचर्य केले त्या **मरीना गॅम्बाला** मागे ठेवून आपल्या मुलांना बरोबर घेऊन तो फ्लॉरेन्सला गेला. **मरीना गॅम्बाने** पादुआमधील मागणी घालणाऱ्या इसमाबरोबर विवाह केला. **''कौतुक करण्यासारखा विलक्षण पुरुष जणु दुसरा कोलंबस'' अशी गॅलिलिओची ख्याती झाली.** परंतु धार्मिक बाबतीत आगळीक केल्यामुळे त्याने काही शत्रू निर्माण केले. लोकांना तो संशयास्पद वाटू लागला. त्याच्या निरीक्षणांमुळे सुमारे अर्ध्या शतकापूर्वी मांडलेल्या परंतु पुराव्याआधी बासनात गुंडाळल्या गेलेल्या **कोपर्निकसच्या** सूर्यकेंद्रित विश्वाला विश्वसनीयता लाभली. स्वतःच्या कल्पना प्रसिद्ध करण्याची **गॅलिलिओची** ठोस पद्धती, कधीकधी केलेला ढोबळ विनोद तर कधी मेजवानीच्या वेळी खुल्या गप्पा आणि व्यासपीठावरील वादविवाद यामुळे विश्वविद्यालयाच्या कोनाड्यातून नवीन खगोलशास्त्र जनसामान्यांपर्यंत पोचले.

इ. स. १६१६ साली पोप आणि चौकशी करणारा कार्डिनल यानी आदरयुक्त पद्धतीने परमेश्वरी साम्राज्यावरील त्याचे हल्ले कमी करण्याची ताकीद **गॅलिलिओला** दिली. त्याच वर्षी ५ मार्च रोजी पवित्र धर्मसमुदयाने एक आज्ञापत्र प्रकाशित केले. त्या आज्ञापत्रात **'कोपर्निकसचे खगोलशास्त्र खोटे असून पवित्र बायबलमधील अवतरणाच्या विरुद्ध आहे.'** असे उघड करून सांगितले होते. त्यामुळे या विषयावर **मौन धारण करून गॅलिलिओने** आज्ञापालन केले. पुढील सात वर्षे त्याने त्याचे प्रयत्न इतर दिशेने सुरू केला. खलाशाना रेखांश शोधता यावेत यासाठी गुरु ग्रहाच्या चंद्राचा उपयोग नौकाशास्त्रात कसा



अनुक्रमणिका

करता येईल ते शोधण्याचा प्रयत्न केला. त्याने काव्यशास्त्राचा अभ्यास केला. साहित्यिक परिक्षणे लिहिली. आपल्या दुर्बिणीत योग्य बदल करून त्याने संयुक्त सूक्ष्मदर्शक तयार केला. त्याबद्दल गॅलिलिओ म्हणतो, "याच्या सहाय्याने मी अनेक सूक्ष्म जीवांचे आश्चर्यकारक आणि आनंददायक निरीक्षण केले. त्यापैकी फ्लीआ हा सूक्ष्मजीव फार भयंकर दिसतो तर ग्नॅट आणि पतंग फार सुंदर दिसतात. सूक्ष्मदर्शकातून माशा आणि छोटे कीटक कसे चालतात हे पाहून मला फार संतोष झाला."

इ. स. १६२३ साली **गॅलिलिओला** सूर्य केंद्रस्थानी असणाऱ्या विश्वाचा विचार करण्यासाठी सबळ कारण मिळाले. नवीन **पोप आठवा अर्बन** याने शास्त्रीय संशोधनाविषयीची आस्था आपल्या पवित्र अधिकारात आणली. त्याच्या पूर्वीच्या अधिकाऱ्यानी या विषयात कधीच लक्ष घातले नव्हते. गॅलिलिओचा अर्बनशी वैयक्तिक परिचय होता. त्याने त्याला आपली दुर्बिण दाखवली होती. एका रात्री फ्लॉरेन्समधील राजदरबारातील शाही मेजवानीनंतर 'बर्फ का तरंगतो' या विषयावर झालेल्या वादविवादात भाग घेऊन गॅलिलिओने अर्बनला वश करून घेतले होते. अर्बन सुरुवातीपासूनच गॅलिलिओची खूप स्तुती करीत असे. त्याने गॅलिलिओवर एक कवितासुद्धा रचली होती. त्या कवितेत गॅलिलिओच्या दुर्बिणीतून दिसणाऱ्या अनोख्या सृष्टीचाही उल्लेख होता. या सर्व घटनांमुळे मारिया सेलेस्टे आपल्या वडिलांवर खूष झाली होती. तिचा आनंद व्यक्त करताना ती म्हणते,

"आगळेवेगळे व्यक्तीमत्त्व लाभलेले आणि आता सर्वोच्च पद भूषविणारे कार्डिफ **अर्बन** यानी आपल्याला लिहिलेल्या पत्रांची भेठ आपण मला पाठवलीत. ती पत्रे वाचून मला अनिर्वचनीय आनंद झाला कारण त्या पत्रातून कार्डिफ यांची आपल्याविषयीची प्रेमभावना आणि आपल्या कर्तृत्त्वाविषयीची विलक्षण आस्था व्यक्त होते. मी ती पत्रे पुन:पुन्हा वाचली. एकांतात मी त्या वाचनाचा आनंद लुटला. ती पत्रे मी फक्त सिस्टर अर्केन्जेला (तिची स्वत:ची बहिण लिव्हिया) हीला दाखवली. अत्युच्च क्षमता असलेल्या व्यक्तीनी आपल्या वडिलांविषयी दाखविलेली आस्था पाहून माझ्याप्रमाणे तीसुद्धा आनंदित झाली. इतर कोणालाही ती पत्रे न दाखवता आपल्या आग्रहाखातर मी ती आपल्याला परत करीत आहे."

कविमनाचे पोप अधिकारावर असल्यामुळे दीर्घकाळापासून नियोजिलेला; सूर्य केंद्रस्थानी असलेल्या व पृथ्वी केंद्रस्थानी असलेल्या अशा दोन परस्परविरोधी खगोलशास्त्रीय गृहितकावरचा प्रबंध लिहिण्यास गॅलिलिओला प्रोत्साहन मिळाले. त्याच्याच शब्दात सांगायचे तर त्या जगातील दोन प्रमुख विचारप्रणाली होत्या. 'कॅथॅलिक चर्चचे शत्रू' या आपल्या वडिलांच्या संभाव्य भूमिकेमुळे 'ख्रिस्ताची वाग्दत्त वधू' या भूमिकेशी जुळवून घेणे मारिया सेलेस्टेला फार अवघड झाले असेल. परंतु आपल्या वडिलांची चर्चविषयीची अपरंपार निष्ठा तिला माहित होती; म्हणून त्यानी सातत्याने केलेल्या प्रयत्नांना तिने मान्यता दिली. मानवाला आध्यात्मिक मार्गदर्शक करण्यासाठी परमेश्वराने पवित्र बायबल लिहिले आणि 'या विश्वाची उकल करून सांगणे' हे मानवाच्या बुद्धिमत्तेला आव्हान ठेवले असा गॅलिलिओचा विश्वास

होता हे तिने स्वीकारले होते. या विषयावर काम करण्याची आपल्या वडिलांची असाधारण क्षमता तिला ठाऊक होती. आपल्या वडिलांना प्रकृतिस्वास्थ्य मिळावे त्यांना दीर्घायुष्य लाभावे, त्यांच्या प्रत्येक योग्य इच्छेची परिपूर्ती व्हावी यासाठी ती प्रार्थना करीत असे. कॉन्व्हेंटमध्ये ती औषधे तयार करीत असे. आपल्या वडिलांना अभ्यास करण्यासाठी शारीरिक स्वास्थ्य प्राप्त व्हावे आणि वरचेवर होणाऱ्या तापासारख्या आजारावर नियंत्रण ठेवता यावे. म्हणून ती त्यांना वेगवेगळ्या गोळ्या आणि औषधे स्वत: तयार करून देत असे. १६३० सालच्या शरदऋतूत जेव्हा फ्लॉरेन्समध्ये गाठीच्या प्लेगची साथ आली तेव्हा त्या साथीपासून आपल्या वडिलांचे रक्षण करण्यासाठी तिने सर्वतोपरी प्रयत्न केले. गॅलिलिओ मात्र त्यावेळी नुकताच लिहून झालेला 'जगातील दोन प्रमुख प्रणालींबद्दलचा संवाद' हा प्रबंध छापण्याचा परवाना मिळवण्याच्या प्रयत्नांत होता.

मारिया सेलेस्टेने आपल्या वडिलांना लिहिलेले एक पत्र असे होते :-

"प्रिय बाबा यांस,

आपल्या गरीब, दुर्दैवी सेवकाच्या अचानक झालेल्या मृत्यूमुळे आपण किती अस्वस्थ व दु:खी झाला असाल या विचाराने मला आपली फार काळजी वाटत आहे. आणि मला अंतर्यामी दु:खही होत आहे. (प्लेगच्या) या धोक्यापासून स्वत:चे संरक्षण करण्यासाठी तुम्ही सर्वतोपरी काळजी घ्याल असे मी गृहित धरते आणि यासाठी तुम्ही स्वत: जास्तीत जास्त प्रयत्न करावेत अशी मी आपल्याला कळकळीची विनंती करीत आहे. सध्याच्या धोक्यापासून स्वत:ला वाचवण्यासाठी आवश्यक असणारे प्रतिबंधक उपाय आणि इलाज तुम्ही योजाल असाही मला विश्वास वाटतो म्हणूनच या विषयावर मी अधिक भाष्य करीत नाही. परमेश्वराची कृपा संपादन करणे हा यावरील सर्वात उत्तम उपाय आहे आणि तो तुम्ही पश्चात्तापाने आणि अनुतापाने संपादन करा असा सावधगिरीचा इशारा आपल्याविषयीचा आत्यंतिक आदर आणि कन्येला शोभणाऱ्या आत्मविश्वासातून मी आपल्याला देत आहे. नुसते मानसिकच नाही तर शारीरिक दृष्टयासुद्धा नि:संशय हेच अत्यंत प्रभावी औषध आहे."

"मी हे पत्र सातव्या प्रहरी (मध्यरात्री) लिहित आहे. जर माझ्या हातून काही चुका झाल्या असतील तर आपण मला क्षमा करावी असे मी आग्रहपूर्वक सांगेन. संपूर्ण दिवसभरात मला स्वत:करता एखाद्या तासाचासुद्धा वेळ मिळत नाही. माझी रोजची कामे तर असतातच पण त्याचबरोबर चार युवतीना ग्रेगोरियन गीते शिकविण्याची कामगिरी माझ्यावर सोपवण्यात आली आहे आणि मॅडोनाच्या आज्ञेनुसार चर्चमध्ये उपासनागीते म्हणणाऱ्या गायकमंडळीना दैनंदिन मार्गदर्शन करण्याचीही जबाबदारी माझ्यावरच आहे. लॅटिन भाषेच्या आकलनाची माझी क्षमता फार कमी असल्यामुळे या कामासाठी मला फार मेहनत घ्यावी लागते. या सर्व गोष्टी खरोखरच माझ्या अत्यंत आवडीच्या आहेत यात शंकाच नाही परंतु या सर्वांबरोबर मला इतरही कामे करावी लागतात. या सर्व गोष्टीतून एक अतिशय चांगली गोष्ट निष्पन्न झाली आहे. आणि ती म्हणजे मी कधीही पंधरा मिनिटेसुद्धा रिकामी बसलेली नसते. फक्त

माझं डोकं ठिकाणावर ठेवण्यासाठी मला पुरेशा झोपेची जरुरी असते. तुम्हाला फार थोडी झोप कशी पुरते याचं रहस्य जर तुम्ही मला सांगितलेत तर मी तुमची फार ऋणी होईन कारण झोपेत फुकट गेलेले सात तास मला जास्त वाटतात.

याच पत्रात **मारिया सेलेस्टे** यानी खालील नोंद केली आहे.

"विविध पेस्ट्रीज घालून जे बास्केट मी आपल्याकडे पाठविले ते बास्केट माझे स्वतःचे नाही म्हणून तुम्ही ते रिकामे बास्केट मला परत द्यावे अशी माझी इच्छा आहे."

'गाठीच्या प्लेगवर मात करण्यासाठी प्रार्थना आणि अनुताप हाच उत्तम उपाय आहे' ही मारिया सेलेस्टेची सूचना दूषित रोगट हवामान, कुयोग निर्माण करणारी ग्रहांची युती, दुष्काळ, भिकारी, वेश्या अशा तत्कालिन प्लेगच्या कारणांशी सुसंगत होती. रक्तस्त्राव करणे, आर्सेनिकेचे स्फटिक मनगटावर आणि कपाळावर लावणे, मौल्यवान खडे ठेवलेल्या छोट्या पिशव्या हृदयावर ठेवणे, प्राण्यांची विष्ठा, मोहरी, काचांचा चुरा, टर्पेंटाइन, कांदा यापासून तयार केलेला उटण्यासारखा पदार्थ वापरणे यासारख्या त्या काळात उपलब्ध असलेल्या उपचारांची ताकद प्रार्थनेमुळे वाढते. प्लेग या रोगाला बळी पडलेल्यांना प्रार्थनेसाठी अजिबात वेळ मिळत नसे. त्यामुळे इतरांकरता आपल्या पापांचा कबुली जबाब देणे आणि पश्चाताप व्यक्त करणे या गोष्टीचे महत्त्व अपरंपार वाढले.

'फ्लॉरेंटाइन मॅजिस्ट्रसी ऑफ पब्लिक हेल्थ' या संस्थेत काम करणारे अधिकारी संपूर्ण शहरावर पहारा करीत, या रोगाच्या रुग्णाना प्लेग हॉस्पिटलमध्ये पाठवीत. त्यांचे कपडे जाळून टाकत आणि सर्व घर जंतुनाशकानी स्वच्छ करून घराला टाळे लावून टाकीत, यावेळी कुटुंबातील इतर व्यक्तीना मात्र घरात कोंडून ठेवीत. टाळे लावलेल्या आणि विशिष्ट खूण केलेल्या या घरातील रुग्णाच्या नातेवाईकाना सुटकेसाठी एकवीस दिवस प्रतिक्षा करावी लागे. या काळात त्यांना मॅजिस्ट्रसीमार्फत अन्न आणि पैसे यांचे वाटप केले जाई. या बंदिवासातील माणसे रस्त्यावरून दोरीला लावलेल्या बास्केटमधून खाद्यपदार्थ मिळवीत आणि त्याच पद्धतीने घरातील प्रेते खिडकीतून बाहेर सोडीत.

प्लेगची साथ आली त्या वर्षीच्या शरद ऋतूत सॅन मॅट्टिओच्या कॉन्व्हेंटच्या बंदिस्त परिसरात एकीलाही प्लेगची बाधा न झाल्यामुळे तेथील सर्व सिस्टर्सची प्रकृति चांगली राहिली. मॅजिस्ट्रसीने राहाण्याच्या धार्मिक स्थानांकरता खबरदारी घेणारे कडक नियम केल्यामुळे सिस्टर्सना त्याचा निश्चितच फायदा झाला. या ठरावानुसार फक्त नन्सच्या आत्यंतिक जवळच्या नातेवाईकांना त्यांच्याजवळ जाऊन त्यांच्याशी बोलण्याची परवानगी असे. कोणत्याही परिस्थितीत नन्स आणि त्यांना भेटायला आलेल्या व्यक्ती यांच्यामध्ये नेहमीच जाळीचे कुंपण असे, अशा भेटीच्या वेळी आता तर ती जाळी पार्चमेंट किंवा कागदाने झाकणे सक्तीचे केले होते.

यावेळी मारिया सेलेस्टेने आपल्या वडिलांना लिहिले, "या परिस्थितीत तुम्ही आमची भेट घेण्यासाठी येण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही आणि मी सुद्धा 'तुम्ही आम्हाला भेटायला

या' असे म्हणणार नाही. अशा भेटीमुळे आम्हाला कोणालाही फारसा आनंद होणार नाही कारण सध्या आम्हाला कोणालाच मोकळेपणाने बोलता येणार नाही.''

इ. स. १९३० या संपूर्ण सालात सॅन मॅट्टिओच्या कॉन्व्हेंटमध्ये फक्त एका मृत्यूची नोंद झाली. प्लेगची साथ येण्याआधी कितीतरी आधी ताप आणि जुलाबाने आजारी पडलेल्या एका ननचा नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीस मृत्यू झाला.

भुकेलेल्या थंडीने गारठलेल्या आणि संकटात सापडलेल्या नन्सनी पत्र लेखनाच्या मोहिमेद्वारा अनेक ठिकाणी मदतीची याचना केली. **मारिया सेलेस्टेने** प्रत्यक्ष पत्रलेखन केले आणि ॲब्बेसने त्या पत्रांखाली स्वत:ची स्वाक्षरी केली. १ नोव्हेंबर या संतदिनापासून त्यांच्या विनंतीपत्राना प्रतिसाद मिळण्यास सुरुवात झाली. ग्रँड डचेस **मॅडम ख्रिस्टिना** यानो कॉन्व्हेंटमध्ये भरपूर ब्रेड पाठविण्याची व्यवस्था केली आणि त्यापाठोपाठ अठरा पोती धान्यही पुरवले. तसेच प्रत्यक्ष पैशाच्या स्वरुपातही सहाय्य केले. फ्लॉरेन्सच्या आर्चबिशपनेसुद्धा मदत करण्याचे कबूल केले. त्याने सिस्टर्सच्या कुटुंबियांच्या नावाची यादी मागितली. येत्या हिवाळ्यात त्यांना कॉन्व्हेंटला आर्थिक मदत करायला सांगावी असा आर्चबिशपचा उद्देश होता. गॅलिलिओने यापूर्वीच उदार अंत:करणाने कॉन्व्हेंटला भरपूर सहाय्य केले असल्यामुळे असा मार्ग अवलंबला तर आपल्या वडिलांवर गैरवाजवी आर्थिक ताण पडेल या विचाराने **मारिया** अस्वस्थ झाली. सॅन मॅट्टिओची आर्थिक परिस्थितीची पुनर्जुळणी करण्यासाठी **मारिया सेलेस्टेने** वेगळा मार्ग शोधला. काही सिस्टर्सच्या कुटुंबियानी वैयक्तिक कारणासाठी घेतलेले पैसे दीर्घकाळ वापरले होते. इतक्या वर्षात त्या मुद्दलावर चक्रवाढव्याजही जमा झाले होते. कॉन्व्हेंटच्या तात्काळ गरजा भागवण्यासाठी या पैशांची मागणी करावी असे तिला वाटले आर्चबिशपना ही योजना अमलात आणण्याची आज्ञा तिला करता येत नव्हती. म्हणून ही कल्पना तिने आपल्या वडिलांना **गॅलिलिओला** सांगितली आणि **गॅलिलिओने** ती स्वत:ची कल्पना म्हणून सादर करावी अशी इच्छा तिने व्यक्त केली. या मार्गाने गेल्यावर इच्छित बेत फलित झाला.

**गॅलिलिओच्या** वैयक्तिक आणि व्यावसायिक निसशांबाबतही मारियाने प्रार्थना आणि सावधगिरीच्या सूचना नोव्हेंबर महिन्याच्या प्रारंभी लिहिलेल्या पत्रात व्यक्त केल्या होत्या.

''सध्या येत असलेल्या अनंत अडचणी आणि दुर्दैवरूपी सुरीच्या धारदार बाजूना मुठीत पकडून तुम्ही स्वत:ला जखमी करून घेऊ नका. याउलट या सुरीची मूठ पकडून तुम्हाला जाणवणाऱ्या तुमच्यातील उणीवा दूर करा म्हणजे तुम्हाला अडचणींवर मात करता येईल. ज्याप्रमाणे रानमांजरासारख्या तीक्ष्ण दृष्टीने तुम्ही आकाशाचा वेध घेतलात त्याप्रमाणे पृथ्वीवर निर्माण झालेला खोट्या कल्पनांचा गोल भेदून भौतिक गोष्टींचा डामडौल आणि पोकळ गर्वाची जाणीव तुम्हाला करून घेता येईल.

**'डायलॉग'** हे स्वत:चे पुस्तक प्रकाशित करताना होणाऱ्या प्रतिबंधामुळे **गॅलिलिओ** निराश झाला. फार पूर्वी पादुआ येथे त्याने गतिविषयक अभ्यास चालू केला होता त्यावर आधारित नवीन पुस्तक लिहिण्यास आता त्याने सुरुवात केली. त्याने आपल्या

शास्त्रीय पत्रव्यवहारही सुरू ठेवला. तसेच ग्रँड ड्युकसाठी ज्या योजना आखल्या जात त्याविषयी नियमितपणे त्याचा सल्ला घेतला जाई. उदा. सांता मारिया या कॅथिड्रलचा दर्शनी भाग दुरुस्त करण्याच्या योजनेवर त्याने वास्तुविद्याविशारदाला सल्ला दिला होता.

**मारिया सेलेस्टेने** आपल्या वडिलाना वचन दिले. ती म्हणते, "तुम्ही मला कळकळीने सांगता त्याप्रमाणे मी माझी स्वत:ची उत्तम काळजी घेईन. पण तुम्ही मला जो उपदेश करता, तोच उपदेश अंशरूपाने तरी तुम्ही ध्यानात आणला पाहिजे असे मला मनापासून वाटते. तुमचे स्वत:चे प्रकृतिस्वास्थ्य निश्चितपणे धोक्यात येईल इतक्या प्रमाणात तुम्ही स्वत:ला तुमच्या अभ्यासात व्यस्त ठेवले आहे. ज्ञान मिळवण्याकरता आणि नवनवीन गोष्टींचा शोध घेण्याकरता लागणारा उत्साह देण्याची शक्ती असणारे माध्यम म्हणून जर तुमच्या शरीराचा वापर करायचा असेल तर त्या शरीराला आवश्यक असणारी विश्रांती तुम्ही त्याला दिली पहिजे. तीव्र बुद्धिमत्तेच्या सहाय्याने जे बौद्धिक काम तुम्ही असोशीने करता तेच काम जर तुमचे शरीर क्षीण झाले तर तुमच्या बुद्धिमत्तेला करता येणार नाही."

**मारिया सेलेस्टे** तिच्या औषधाच्या दुकानात तयार करता येईल ते किंवा अन्य मार्गाने मिळवता येईल ते प्रत्येक नवीन प्लेग प्रतिबंधक औषध गॅलिलिओला देण्यासाठी प्रयत्नशील असे. पिस्टोयाच्या परमपूज्य मठस्वामिनी **ॲब्बेस उर्सुला** यांनी शरीराची झीज भरून काढणारे औषधी पाणी तयार केले होते. हे पाणी भोजनोत्तर घ्यावयाच्या मद्याप्रमाणे (लिक्युअर) असून **उर्सुलाच्या** अनुयायांच्या दृष्टीने ते पवित्र अवशेषांइतकेच महत्त्वाचे आणि मौल्यवान होते. उर्सुलाच्या पंथाबाहेरच्या लोकांना हे पाणी देण्याचे धारिष्ट कोणी दाखवत नसे. या पाण्याची बाटलीसुद्धा **मारिया सेलेस्टेने** आपल्या वडिलांकरता पाठवली (अर्थात् ती बाटली तिने कशी मिळवली ते तिने कोठेही स्पष्ट केलेले नाही) त्याचप्रमाणे आणखी एका औषधाचा उपयोग प्लेगचा प्रतिबंध करण्याकरता होतो असे तिला काही वाटत नव्हते. सुके अंजीर, बदाम, सतापाची पाने (Rue) आणि मीठ यांचे मिश्रण करून या सर्व घटकाना एकत्रित बांधण्यासाठी आवश्यक असेल तेवढा मध या सर्वांचे चाटण तिने आपल्या वडिलांकरता तयार केले, ते त्यांच्याकडे पाठवले आणि त्याचे फायदे सांगून ते कसे घ्यावयाचे तेसुद्धा त्यांना सांगितले. "रोज सकाळी अनशापोटी अक्रोडाच्या आकाराएवढे चाटण तुम्ही घ्या आणि त्यानंतर अनुपान म्हणून थोडीशी ग्रीक किंवा दुसरी कोणतीतरी उत्तम वाइन घ्या. यामुळे आश्चर्यकारक प्रतिकारशक्ती मिळते असे जाणकार सांगतात. खरोखरच या औषधाला शासकीय मान्यता मिळाली होती."

**गॅलिलिओ** अधूनमधून पैसे, खाद्यपदार्थ, मिष्टान्ने इतकंच काय पण **आपण स्वत: तयार केलेली पालकाची पाककृती मारिया सेलेस्टेला भेट म्हणून पाठवीत असे** त्याचबरोबर कधी कधी उबदार दुलई पाठवून तिने टाकून दिलेल्या जुन्या रजईची जागा तो भरून काढीत असे. बारीक सारीक डबे, तिची औषधे भरण्यासाठी काचेच्या कुप्या, त्याच्या स्वत:च्या बागेतली पिवळसर हिरवट रंगाची महाळुंगाची फळे यासारख्या वस्तुसुद्धा

**गॅलिलिओ** तिच्याकडे पाठवीत असे. यापैकी महाळुंगाच्या साली वडिलांच्या आवडीनुसार पाकवून ती ताबडतोब त्यांच्याकडे परत पाठवीत असे. आधीच कबूल केलेली दुर्बिण पाठवायला जर वडील विसरले तर पुढच्या वेळी ती दुर्बिण बास्केटमध्ये घालून पाठविण्याची आठवण ती वडिलांना करून देत असे. या सर्व वस्तूबरोबर वडिलांच्या मुलीविषयीच्या स्वाभाविक प्रेमापेटी गॅलिलिओ तिच्या कर्तृत्वाची मुक्त कंठाने प्रशंसा करीत असे. पण तिने मात्र या स्तुतीचा कधी स्वीकार केला नाही. ती म्हणत असे, "तुम्ही माझी पत्रे सांभाळून ठेवता हे ऐकून माझा फार गोंधळ झाला आहे. तुमच्या माझ्याप्रती असलेल्या निरतिशय प्रेमामुळे माझी पत्रे प्रत्यक्ष आहेत त्यापेक्षा तुम्हाला ती अधिक गुणसंपन्न वाटतात."

इ. स. १६३० च्या डिसेंबर महिन्यात ॲपेनाइनमधून येणाऱ्या थंडगार वाऱ्याचा तडाखा टस्कनीला बसल्यामुळे गॅलिलिओ त्याच्या घरात कोंडला गेला होता. कॉन्व्हेंटला भेट देता येत नसल्यामुळे त्याने आपल्या प्रकृतीची खुशाली घरकाम करणाऱ्या सेविकेबरोबर पाठवली. तिची क्षमता आणि समजूतदारपणा पाहून मारिया सेलेस्टे प्रभावित झाली.

१६३१ सालच्या जानेवारी महिन्याच्या प्रारंभी प्लेगची साथ आटोक्यात येत असल्याची जाणीव झाल्यामुळे प्लेगचे संपूर्ण उच्चाटन करावयाचे दंडाधिकाऱ्यांनी ठरविले. या निर्णयानुसार सर्व नागरिकांना चाळीस दिवस पूर्णपणे क्कारंटाइन पाळण्याची आज्ञा केली. तसेच शेजारी आणि मित्रमंडळी यांना साध्या भेटीगाठी घेण्यासाठी एकमेकांच्या घरी जाण्यास मज्जाव करण्यात आला. चर्चमध्ये जाण्यासाठी किंवा खाद्यपदार्थ आणि औषधे खरेदी करण्यासाठी फक्त माणसाना घराबाहेर पडण्याची परवानगी देण्यात आली. अशाही परिस्थितीत मारिया सेलेस्टे आपल्या वडिलांच्या गरजांविषयी जागरूक राहिली. ती म्हणते, "विरंजन केलेल्या कॉलर्स मी आपल्याकडे परत पाठवीत आहे. खूप घासल्या गेल्यामुळे माझी इच्छा होती तितक्या त्या स्वच्छ निघाल्या नाहीत. तुम्ही माझ्यावर निरतिशय प्रेम करता, माझी कोणतीही विनंती मान्य करता, माझी प्रत्येक गरज अतिशय तळमळीने भागवता. त्याचप्रमाणे मलासुद्धा आपली सेवा करण्याइतका आनंद या जगातल्या इतर कोणत्याही गोष्टीतून मिळत नाही हे कृपा करून तुम्ही ध्यानात घ्या आणि तुम्हाला इतर कशाचीही गरज असेल तर मला कळवा."

तिने स्वत:ला कॉन्व्हेंटमध्ये बंदिस्त करून घेतल्यामुळे त्यांच्यातील भावनिक जवळीकीला अडथळा आला नाही. परंतु आर्सेट्री आणि **गॅलिलिओचे** घर यामध्ये बेलॉसगार्डो नावाचा फ्लॉरेंटाइन डोंगर असल्यामुळे प्रत्यक्ष जा-ये करण्यासाठी मात्र आडकाठी निर्माण झाली. एका पत्रात मारिया सेलेस्टे आपल्या वडिलांना लिहिते, "रात्रंदिवस माझे सर्व विचार आपल्यावर केंद्रित झालेले असतात. माझी आत्यंतिक इच्छा असूनसुद्धा तुमची दैनंदिन खुशाली दूर अंतराच्या अडथळ्यामुळे समजत नाही याचे मला अनेकदा वाईट वाटते."

मारियासारखीच इच्छा असल्यामुळे **गॅलिलिओलासुद्धा** मानसिक त्रास होत असे. खेचराच्या पाठीवर स्वार होऊन त्याच्या घरापासून तिच्या कॉन्व्हेंटपर्यंत जाण्यासाठी

पंचेचाळीस मिनिटे लागत. सुरुवातीला हा प्रवास फार दूरचा आणि कठीण वाटत नसे. पुढे पुष्कळदा त्या प्रवासाच्या विचारानेच तेथे जाण्याचा बेत त्याला सोडून द्यावा लागे. पुढे त्याने स्वत: आर्सेट्रीला जाऊन राहाण्याचे ठरवले.

सॅन मॅट्टिओच्या कॉन्व्हेंटमध्ये बंदिस्त राहूनसुद्धा आपल्या कल्पकतेने आणि उत्साहाने तिने स्थानिक स्थावर जंगम बाजाराचा बारकाईने शोध घेतला. शहरात राहाणारे धनिक आर्सेट्रीमधील त्यांचे बंगले शहरी जीवनापासून सुटका मिळवण्यासाठी आठवड्याच्या अखेरीस वापरीत आणि त्या प्रदेशातील उपजाऊ शेते प्रत्येक कुटुंबात वंशपरंपरेने पुढच्या पिढीकडे सोपवली जात. त्यामुळे तिला फारच थोड्या स्थावर मालमत्ता विक्रीसाठी उपलब्ध असल्याचा शोध लागला. वेगवेगळ्या कायदेशीर परिस्थितीच्या दबावाखाली काही जमिनींचा चर्चच्या नावे दस्तऐवज केला असल्यामुळे त्या जमिनींच्या मालकीहक्काचा प्रश्न पुष्कळच वादग्रस्त होता. असे असूनसुद्धा आर्सेट्रीच्या पश्चिमेकडील उताराकडील सर्वात उंच शानदार ठिकाणी इसाऊ मार्टेलिनी यांच्या मालकीचा एक बंगला सध्या उपलब्ध आहे असे मारिया सेलेस्टेला समजले. तो बंगला इतक्या दिमाखदार जागी होता की 'जिअेलो' ज्युवेल म्हणजे रत्न असे त्याचे सार्थ नामकरण केले होते. कॉन्व्हेंटच्या जवळच शेती करणाऱ्या कुलीन मध्यमवर्गीय कुटुंबाने चौदाव्या शतकात तो बंगला बांधला होता. (शहरातून होणाऱ्या नियतकालिक हद्दपारींपैकी एका हद्दपारीनंतर जेव्हा मेडिसी सर्व ताकदिनिशी परत अधिकारावर आला, तेव्हा) दोन शतकानंतर झालेल्या फ्लॉरेन्सच्या तहाच्यावेळी विध्वंस होण्यापासून तो बंगला थोडक्यात वाचला. तहानंतर कितीतरी वर्षे 'जिअेलो' पडीक अवस्थेत होता. त्यानंतर त्याची पुन्हा नव्याने बांधणी केली आणि सुशोभन केले. त्यावेळी प्रत्येक खोलीच्या जाड भिंतीना दिमाखदार कमानी केल्या. त्या कमानीना ल्युनेट म्हणत. जिअेलोत हेरिंग जातीच्या माशाच्या हाडाप्रमाणे रचना केलेल्या विटांच्या जमिनी आणि सुरेख नक्षीकाम केलेले लाकडी छत तयार केले. जिअेलोत तावदाने असलेल्या गज लावलेल्या रुंद खिडक्या इतक्या खालच्या बाजूस बांधल्या होत्या की त्या जणु काही रस्त्यावर डोकावत आहेत असे वाटत असे.

घराच्या दक्षिणेकडील भरपूर सूर्यप्रकाश असणारी बाग गॅलिलिओला सर्वात जास्त आवडत असे. आल्प्स पर्वतावरून येणाऱ्या पावसामुळे या बागेला खात्रीशीर पाणी मिळत असे. विहीरीजवळील अंगणासमोरच्या घराच्या पडवीत कुंडीतील फळझाडांची रोपे कडक हिवाळा सुरक्षिततेत घालवू शकतील अशी व्यवस्था जिअेलोमध्ये होती. **मारिया सेलेस्ट** आपल्या वडिलांच्या आगमनाची वाट पाहत होती.

"आपल्यापासून दूर असल्यामुळे आम्हाला वाईट वाटतंय या दिवशी जर आपण एकत्रित येऊन एकमेकांच्या सहवासात राहिलो असतो तर आपणा सर्वांना जो आनंद झाला असता त्या आनंदाची मी वाट पाहत आहे. परमेश्वरी इच्छा असेल तर लवकरच या परिस्थितीत बदल होईल. तुम्ही नेहमीच आमच्याजवळ असाल अशा आशेमुळे मला आनंद होत आहे."



अनुक्रमणिका

बेलॉसगार्डो येथे असताना गॅलिलिओ शंभर स्कुडी, दोन समान हप्त्यात प्रत्येक मे आणि नोव्हेंबर महिन्यात भरत असे. गॅलिलिओ २२ सप्टेंबर १६३१ रोजी मार्टेलिनी बरोबर केलेल्या करारानुसार त्याला पूर्वी भरत असलेल्या भाड्याचा काही अंश म्हणजे प्रतिवर्षी पस्तीस स्कुडी जिअेलोच्या भाड्यापोटी द्यावयाचे ठरले होते. **गॅलिलिओला** आता सत्तरावे वर्ष लागले होते. आपल्या आयुष्याचा उर्वरित भाग आपण या निवांत आणि आनंददायक वातावरणात राहू अशी त्याची इच्छा होती. घराची जी खोली **गॅलिलिओने** 'अभ्यासकक्ष' म्हणून निवडली तिच्या खिडकीतून अगदी थोड्या अंतरावर आणि द्राक्षाच्या बागेच्या डावीकडील डोंगरउतारावर सॅन मॅट्टिओची कॉन्व्हेंट त्याला दिसत असे.

१६३० च्या ऑगस्टपासून फ्लॉरेन्समध्ये प्लेगची साथ आली आणि १६३१ च्या शरद ऋतूत **गॅलिलिओ** आर्सेट्रीत राहू लागला. या दरम्यानचा काळ त्याच्या **'डायलॉग'** या पुस्तकाचे प्रकाशन आणखी एका वर्षाकरता स्थगित करण्यात आल्यामुळे प्रगतीचा मार्ग खुंटलेला हा काळ **गॅलिलिओने** सावकाश आणि फार बिकट अवस्थेत घालवला. 'या काळात माझे काम एका कोपऱ्यात पडून राहिले आहे आणि मी सतत प्रकृति अस्वास्थ्यात राहत असल्यामुळे माझे आयुष्यही फुकट चालले आहे.'' असा कडवट विचार त्याच्या मनात येत असे.

उद्विग्नतेने **गॅलिलिओने** ग्रँड ड्युककडे मदतीची याचना केली. 'ही मदत मिळाली तर दीर्घकाळ केलेल्या कष्टाचे फलित माझ्या हयातीतच मला पहायला मिळेल.' असे त्याला वाटे. (चर्चने) मज्जाव घातलेल्या **कोपर्निकसच्या** मताबद्दल **गॅलिलिओने** गृहीतकाच्या स्वरूपात काय वक्तव्य केले आहे यावर भर देत या पुस्तकाची प्रस्तावना आणि समोराप याला मान्यता मिळाली पाहिजे असा आग्रह मुद्रणाधिकाऱ्यांनी धरल्यामुळे पुस्तकछपाईस बराच विलंब झाला.

रोममधील पवित्र धर्मस्थानातील अधिकाऱ्याने अखेरीस फ्लॉरेन्समधील चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्याला लिहिले. ''**गॅलिलिओच्या** पुस्तकाच्या पहिल्या पानावर छापण्यासाठी परमेश्वरी आदेशानुसार मी ही प्रस्तावना पाठवत आहे. त्या प्रस्तावनेतील अर्थाला बाध येणार नाही या पद्धतीने लेखकाला त्यात बदल करण्याची किंवा चांगले शब्दप्रयोग वापरण्याची मोकळीक आहे.'' या प्रस्तावनेच्या समारोपाकरता प्रत्यक्ष परिच्छेदच लिहून पाठवला. 'प्रस्तावनेला अनुरूप असाच आपल्या पुस्तकाचा शेवट असायला हवा.' म्हणूनच पायथागोरिअन चर्चेशिवाय आता तरणोपाय नसला तरीसुद्धा **गॅलिलिओने** ईश्वराच्या विश्वव्यापकत्त्वाशी संबंधित कारणमीमांसा आपल्या पुस्तकात द्यावी त्यामुळे बुद्धिमान माणसे शांत होतील अशीही इच्छा त्या अधिकाऱ्यांनी व्यक्त केली. (**पायथागोरस** हा ग्रीक तत्त्व इ. स. पूर्व ५६० ते ४८० या काळात होऊन गेला. त्याने, सूर्य, चंद्र व तारे यांच्या वर्तुळाकार गतीविषयी अभ्यासपूर्ण भाष्य केले होते)

आपल्या **'डायलॉग' या पुस्तकात किती बळजबरीने** गॅलिलिओने **पायथागोरसच्या गतिविषयक भाष्याचा** उल्लेख केला होता. याची **फादर मास्टर** यांना

कल्पना होती. **कोपर्निकसच्या** सूर्यकेंद्रित विश्वाची संकल्पना गॅलिओने आपल्या पुस्तकात स्पष्ट केली होती. **ॲरिस्टॉटल** आणि **टोलेमी** यांच्या मताला चर्चने मान्यता दिली होती. धार्मिक संकल्पनेत ग्राह्य असणाऱ्या या मतांबद्दल काहीसा विरोध दर्शविणारे **'डायलॉग'** मधील लेखन होते. त्यामुळे 'डायलॉग' हे पुस्तक पूर्णपणे वाचल्यावर पायथागोरस आणि **कोपर्निकस** यानी चर्चला मान्य असणाऱ्या **ॲरिस्टॉटल** व **टोलेमीच्या** विचारांचे संपूर्णपणे खंडन केले आहे असे वाचकाना वाटत असे अर्थात 'कोपर्निकसचे मत सर्वार्थाने खरे आहे. असे सूचित करण्याचा अधिकार **गॅलिलिओला** दिला नव्हता. 'हे माझे एक गृहीतक आहे. परंतु परमेश्वरी साक्षात्काराशिवाय यातील सत्य कळणार नाही' असे **गॅलिलिओने** आपल्या पुस्तकात नमूद करावे असे चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्याचे मत होते.

सरतेशेवटी परवानगी दिल्यानंतर १६३१ सालच्या जून महिन्यात **'डायलॉग' या पाचशे पानी पुस्तकाच्या एक हजार प्रती छापण्याची** दमणूक करणारी प्रक्रिया सुरू झाली आणि नऊ महिने ती चालू राहून अखेर १६३२ सालच्या फेब्रुवारी महिन्यात पूर्ण झाली. या प्रकाशनाची अखेरची प्रक्रिया चालू असताना **गॅलिलिओला** प्रोत्साहन देणारे हुरूप आणणारे एकही पत्र **मारिया सेलेस्टेने** लिहिले नाही. या काळात वडील आणि मुलगी इतक्या जवळ राहात होते की पत्र लिहिण्याला कारणच उरले नाही. स्वत:च्या घराच्या दरवाज्यापासून कॉन्व्हेंटच्या जाळीच्या दारापर्यंत अवघ्या काही मिनिटात **गॅलिलिओला** चालत जाता येत होते. तो जर फारच कामात असेल किंवा शारीरिक वेदनांमुळे अतिशय त्रास होत असेल तर **तसा निरोप गॅलिलिओ** आपल्या नोकराकरवी पाठवत असे. ३० ऑगस्ट १६३१ रोजी **मारिया सेलेस्टेने** बॅलॉसगार्डो येथे आपल्या वडिलांना पत्र पाठविले होते. या पत्रानंतर पुन्हा कधीही आपल्याला वडिलांना पत्र लिहावे लागणार नाही असा विचार तिने केला असावा. परंतु **गॅलिलिओच्या** आर्सेट्रीत स्थायिक होण्यामुळे त्यांच्यातील पत्रव्यवहार संपला नाही, फक्त वर्ष - दीड वर्षापुरता त्यात खंड पडला. १६३३ च्या प्रारंभी **'डायलॉग'** च्या प्रकाशनाने जनमानसात खळबळ उडाल्यामुळे आर्सेट्रीमध्ये राहणाऱ्या **गॅलिलिओची** शांतता भंग पावली.

प्रारंभी अल्पकाळात पुस्तकाला उत्तम यश लाभले आणि चांगले शकुन झाले. २२ फेब्रुवारी १६३२ रोजी पिट्टी यथील राजवाड्यात ग्रँड ड्युक याना गॅलिलिओने स्वत: पुस्तकाची पहिली प्रत दिली. **फ्लॉरेन्समध्ये दुकानात विक्रीकरता आल्याबरोबर पुस्तक विकले गेले.** इतर शहरांतील मित्राना गॅलिलिओने पुस्तकाच्या प्रती पाठवल्या. **बोलोग्ना येथील गणितज्ज्ञाने तर डायलॉग या पुस्तकाची तुलना गॅलिलिओच्या अत्यंत आवडत्या. 'आरलँडो फ्युरिओसो' या इटालियन खंडकाव्याशी केली.** "कुठच्याही पानापासून पुस्तक वाचायला सुरुवात केली तरी पुस्तक खाली ठेववत नाही" या शब्दात त्याने त्या पुस्तकाचा गौरव केला.

"प्लेगची साथ असलेल्या भागातून आलेल्या बोटीतून उतरवलेल्या पुस्तकांच्या गठ्ठ्यातील पुस्तके सुटी करून त्यांना वाफारा द्यावा" असे रोमन क्वाटंटाइन अधिकाऱ्यांनी सांगितल्यामुळे रोमकरता पाठवायच्या प्रती मात्र मे महिन्यापर्यंत तशाच ठेवल्या होत्या. त्या पवित्र शहरी (रोम) जाणाऱ्या आपल्या मित्राच्या सामानातून अनेक भेट द्यावयाच्या प्रती पाठवून **गॅलिलिओने** हा सुद्धा अडथळा दूर केला. त्या मित्राने पुस्तकाच्या प्रती अनेक धुरिणांना पोचत्या केल्या.

धूमकेतू सूर्यावरील डाग यांसारख्या पूर्वीच्या वादग्रस्त मुद्यांवर ज्यानी गॅलिलिओला प्रखर विरोध केला होता अशा काही जेसुइट खगोलअभ्यासकांच्या डायलॉग वाचल्यावरच्या प्रतिक्रिया प्रक्षोभक होत्या. **'डायलॉग'** मुळे पोप अर्बन यांच्या रागालासुद्धा चिथावणी मिळाली. युद्धावर केलेल्या अफाट खर्चामुळे पोपच्या अधिकारात घेतलेल्या कर्जाची रक्कम जवळजवळ दुप्पट होण्याच्या मार्गावर होती, तसेच 'स्पॅनिश लोक आपल्याविरुद्ध कारस्थान रचित आहेत' अशा पोपच्या मनात असलेल्या विभ्रमाची एक नवीन उंची गाठली होती. अशा अत्यंत अयोग्य क्षणी पोपचे लक्ष **'डायलॉग'** या पुस्तकाकडे वळले.

**पोप अर्बन** यांनी स्वत: **गॅलिलिओचे** पुस्तक वाचले नव्हते. 'हे पुस्तक बेहद् अपमानकारक आहे' असे त्या पुस्तकाचे मूल्यमापन काही निनावी सल्लागारानी केले होते. **'डायलॉग'** मध्ये **कोपर्निकसच्या** विचारांशी खोली प्रभावीपणे दाखविली असल्यामुळे हे पुस्तक चर्चला बदनाम करणरे आहे' असे मत रोममधील **गॅलिलिओच्या** प्रतिस्पर्ध्यानी दिले. युरोपमध्ये धार्मिक आघाडीवर आलेल्या मरगळीकरता पोपला आधीच दोषी ठरविले होते. त्यात एका नवीन अपमान करणाऱ्याला काहीही शिक्षा न करता सोडून देणे पोपला शक्य नव्हते. **'डायलॉग'** हे पुस्तक यापुढे विकता येणार नाही (ते आधी विकले गेले असूनसुद्धा) आणि **'डायलॉग' च्या लेखकाने धार्मिक चौकशी समितीपुढे हजर झाले पाहिजे'** अशी आज्ञा सप्टेंबर महिना संपायच्या आत फ्लॉरेन्समधील चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्याकडे आली होती.

'आपली चौकशी सौम्यपणाने व्हावी' असा अर्ज **गॅलिलिओने** व्हॅटिकन चर्चकडे केला. आता फ्लॉरेन्समध्ये पुन्हा एकदा प्लेगची साथ आली होती. अशा वेळी प्रकृतिअस्वास्थ्य असलेल्या वयोवृद्ध **गॅलिलिओची** अत्यंत दगदग आणि त्रासदायक अशा रोमपर्यंतच्या प्रवासातून अर्बन सोडवणूक करील काय? **'डायलॉग'** ला शासनाची मान्यता मिळावी म्हणून ज्या कायदेशीर मार्गाने प्रयत्न करावयास हवे होते ते सर्व मार्ग **गॅलिलिओने** अवलंबले होते. असे असूनसुद्धा आता जर त्या पुस्तकाविरुद्ध काही आक्षेप निर्माण केले तर त्याचा प्रतिवाद **गॅलिलिओला** लिखित स्वरूपात करता येईल की नाही? नाही, निश्चित नाही, **गॅलिलिओचा** रोमपर्यंतचा प्रवास सुखकर आणि त्याच्या गतीने व्हावा एवढीच सवलत पोपने त्याला देऊ केली होती. इ. स. १६३३ च्या जानेवारी महिन्याच्या अखेरीस सुरू झालेला **गॅलिलिओचा** प्रवास दोन आठवडे चालू राहिला आणि त्यानंतर दोन आठवडे ॲक्वापेंडेंट या गावाजवळ अत्यंत गैरसोयीच्या बराकीमध्ये क्वारंटाइन अवस्थेत

त्याला काढावे लागले. या मुक्कामात **गॅलिलिओला** ब्रेड, अंडी आणि वाइन याखेरीज दुसरे काहीही खायला मिळत नसे. **मारिया** वडिलांना लिहिते–

"तुम्ही रोमला केव्हा येणार ही बातमी देणारे पत्र अजून मला मिळाले नाही. (आम्ही सर्व, विशेषत: मी तुमच्या या पत्राची किती आतुरतेने वाट बघत असेन याची तुम्हाला कल्पना करता येईल) तुमच्या शब्दांची आसुसलेपणाने वाट बघत मी कशी राहत असेन हे तुम्हाला समजावे म्हणून मी पुन्हा तुम्हाला पत्र लिहावयास बसले आहे."

संपूर्ण फेब्रुवारी महिना गॅलिलिओला चौकशी करणाऱ्या अधिकाऱ्यांसमोर न बोलावता रोममधील टस्कनीच्या दूतावासामध्ये अटकाव करून ठेवले होते. त्यामुळे न्यायनिवाडा करण्याच्या प्रदीर्घ प्रक्रियेचे रुपांतर अखेर संथ आणि शांत मध्यंतरात झाले आहे. त्याचे पर्यवसान **गॅलिलिओला** अधिक मान्यता आणि प्रसिद्धी मिळण्यात होईल असा विचार **मारिया सेलेस्टेने** केला. ५ मार्चला तिने लिहिले,

"मला फार बरं वाटतं आणि मी पुन्हा एकदा परमेश्वराचे आभार मानते. तुमच्या चौकशीचे प्रकरण इतक्या शांत आणि संथपणे पुढे सरकत आहे की यातून आनंददायी आणि तुमची भरभराट होणारे काहीतरी निष्पन्न होईल. परमेश्वरी सहाय्य आणि अत्यंत पवित्र कल्याणकारी व्हर्जिन मेरीच्या कृपेमुळे हे घडून येईल अशी आशा मला वाटते."

रोममध्ये राहात असणाऱ्या **गॅलिलिओच्या** जीवनात काहीही विशेष घडले नाही. १५ फेब्रुवारी हा **गॅलिलिओचा** वाढदिवससुद्धा कोणताही वैशिष्ट्यपूर्ण प्रसंग न घडता गेला. त्यावरील खटला चालू असताना दिलेल्या संदर्भात आणि त्याच्या स्वत:च्या निवेदनात आपले वय सत्तर असल्याचे म्हटले तरी **गॅलिलिओ** आता एकोणसत्तर वर्षाचा झाला होता.

संपूर्ण आठवड्यात घडलेल्या घटनांबद्दल **मारियाने** आपल्या वडिलांजवळ जी काही बडबड केली असती, त्या सर्व गोष्टी एकत्रित करून दर शनिवारी एक प्रदीर्घ बातमीपत्र सादर करण्याचा परिपाठ **मारियाने** चालू ठेवला. आपल्या वडिलांच्या अनुपस्थितीमुळे होणारे दु:ख हलके करण्यासाठी तिने स्वत:ला पूर्वीपेक्षाही अधिक कामात गुंतवून ठेवले. कॉन्व्हेंटमधील आचारी, व्यवस्थापिका यांची प्रमुख मार्था हिच्या ऑफिसमधील सर्व कामे एका मिनिटाचीसुद्धा विश्रांती न घेता संपूर्ण दिवसभर **मारिया सेलेस्टे** पार पाडीत असे. टस्कन दूतावासात वाट बघत **गॅलिलिओने** दोन महिने काढले. अखेर १६ एप्रिल १६३३ रोजी चौकशी करणाऱ्या पवित्र अधिकाऱ्याने प्रश्न विचारण्यासाठी **गॅलिलिओला** बोलावले. आपल्या अतिशय आवडत्या वडिलांना **मारिया सेलेस्टे** लिहिते –

"तुमच्या **'डायलॉग'** या पुस्तकातील लेखनामुळे निर्माण झालेल्या घोटाळ्यामुळे तुमच्यावर ज्या अटी लादल्या आहेत आणि तुम्हाला पवित्र ऑफिसच्या खोल्यांमध्ये बंदिस्त करून ठेवले आहे. तुम्हाला जरासुद्धा मानसिक शांतता मिळत नाही आणि कदाचित् शारीरिक सुखसोयीपासूनही तुम्हाला वंचित ठेवले गेले आहे याची माझी खात्री झाल्यामुळे मला खूप वाईट वाटत आहे. तुमचे दु:ख हलके केले तर ते तुम्हाला सुसहय होईल म्हणून तुमच्या पराकाष्ठेच्या दु:खात मी सहभागी होत आहे हे सांगण्यासाठी मी आता लिहावयास



अनुक्रमणिका

बसले आहे. तुमच्या या हालअपेष्टांचा (सुगावा) मी इतर कोणालाही लागू दिला नाही. या गोष्टी मी माझ्यापुरत्याच मर्यादित ठेवल्या आहेत. तुम्हाला सुखसमाधान देणाऱ्या गोष्टींबद्दलच मी इतरांजवळ बोलते. आम्ही सर्वजण तुमच्या पुनरागमनाची वाट पाहत आहोत. अत्यंत उत्साहाने पुन्हा एकदा तुमच्याशी वार्तालाप करण्याचा आनंद लुटण्यास आम्ही उत्सुक आहोत.''

आपल्या वडिलांवरील न्यायालयीन खटल्याची चौकशी नुकतीच सुरू झाली आहे हे समजल्यामुळे सचिंत झालेल्या मारियाने अत्यंत संयमपूर्वक हे पत्र लिहिले. या पत्रांतील अक्षर नेहमीपेक्षा खूपच बारीक आहे ते जणू काही मारिया सेलेस्टेच्या दु:खित अंत:करणाचे आणि मानसिक स्थितीचे द्योतक आहे. हे वर्ष संपण्यापूर्वी चर्चच्या दबावामुळे गॅलिलिओला द्यावा लागणारा कबुलीजबाब स्वत:च्याच घरात कायम स्थानबद्धतेत ठेवल्याची शिक्षा, डायलॉग या पुस्तकावर घातलेली बंदी, पुढे **दोनशे वर्षांपर्यंत निषिद्ध पुस्तकात त्याचा झालेला समावेश** या सर्व घटनांमुळे पितापुत्रीच्या एकमेकांवरील प्रेमाची सत्त्वपरीक्षा होणार होती याची त्या दोघांपैकी कोणालाही कल्पना नव्हती.

रोमन इन्क्वीझिशनच्या अधिकाराला आणि नावलौकिकाला गालबोट लागल्याशिवाय **गॅलिलिओला** दोषमुक्त करता आले नसते. म्हणून खाजगीत **गॅलिलिओशी** तडजोड करण्यात आली. ''गॅलिलिओने आपण काही चुका केल्या आहेत असा कबुली जबाब द्यावा आणि त्याकरता आपल्याला शासन करू नये अशी विनंती करावी. त्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी गॅलिलिओला सामोपचाराने वागवावे'' असे उभयतात ठरले. **गॅलिलिओने** त्याची अम्मलबजावणी केली. ''**डायलॉग** हे पुस्तक आपण पुन्हा एकवार एकाग्रतेने वाचले तेव्हा माझ्या लक्षात आले की ते लिहिताना काही ठिकाणी मी फारच आगळीक केली आहे. प्रत्येक व्यक्तीला स्वत:च्या मताबद्दल अभिमान असतो म्हणून मी त्या पुस्तकात माझे मत व्यक्त केले असले तरी तसे करण्यामागे माझा कोणताही अशुभ उद्देश नव्हता. असा लेखी कबुली जबाब **गॅलिलिओने** दिला या सर्व सोपस्कारानंतर आपल्याला अगदी सौम्य शिक्षा होईल अशी **गॅलिलिओची** अपेक्षा होती. परंतु या अपराधासाठी **गॅलिलिओला** बेमुदत नजरकैदेची शिक्षा दिल्यामुळे तो व्यथित झाला. **गॅलिलिओच्या** रोममधील वास्तव्यात त्याची सिअेत्राच्या आर्चबिशपशी ओळख झाली होती त्याने **गॅलिलिओची** शिक्षा सौम्य करण्यासाठी युक्ती योजली **गॅलिलिओला** आर्चबिशपच्या देखरेखाखाली ठेवण्यात आले. आर्चबिशपच्या शहाणपणामुळे आणि माणुसकीच्या वागणुकीमुळे **गॅलिलिओचे** उर्वरित आयुष्य सुसह्य झाले. त्याने **गॅलिलिओला** त्याचे लक्ष विज्ञानावर केंद्रित करावयास लावले आणि फार पूर्वीपासून मनात असलेला गतिविषयक प्रबंध लिहिण्यास उद्युक्त केले. तसेच इ. स. १६३३ साली **गॅलिलिओला** स्वत:च्या घरीच स्थानबधतेत राहण्याची परवानगी मिळाली. अखेरपर्यंत विज्ञानसंशोधन व लेखनात कालक्रमणा करून **गॅलिलिओने** स्वत:च्या जीवनाला अर्थ प्राप्त करून दिला.

---



अनुक्रमणिका

# इतिहास आणि तत्त्वज्ञान

## इतिहास काळ आणि ज्ञान – प्राचीन भारतातील –

**– श्रीकृष्ण खोत**

प्राचीन भारतात इतिहासाबद्दल नसलेल्या दिलचस्पीची नोंद वारंवार घेण्यात आलेला आहे. चीन व पाश्चिमात्य देशातील परिस्थितीबरोबर तिची तुलनाही करण्यात येते. ज्ञानाच्या इतर शाखात विपुल प्राचीन भारतीय साहित्य उपलब्ध आहे; हे लक्षात घेतल्यानंतर ऐतिहासिक लिखाणाची वानवा नजरेत आल्याशिवाय रहात नाही. विशेषत: मुसलमानानी हा देश पादाक्रांत करण्यापूर्वीच्या काळात या अशा लिखाणाची कमतरता लक्षणीय आहे त्याजबरोबर इतिहास या विषया विषयीची उदासिनता, त्याच्याशी संलग्न आहे याची नोंदही घेण्यात आलेली आहे. या चमत्कारिक घटीताबद्दल अनेक स्पष्टीकरणे देण्यात आलेली आहेत. त्यापैकी काही स्पष्टीकरणें भारतीय तत्त्वज्ञानातील प्रचलित असलेल्या विशिष्ट सिद्धांताकडे बोट दाखवितात अशी समजुत आहे. या लेखात या स्पष्टीकरणाचे नामकरण 'तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरणे' असे करून, त्यांची अत्यंत साक्षेपी तपासणी करण्यात आलेली आहे.

ऐतिहासिक वाङ्मयाचे तीन प्रकारचे वाचक असतात. हे प्रकार एकमेकांपासून अलग व स्पष्ट असे नसून, ते काही प्रमाणात एकमेकात मिसळलेले आहेत. अशा वाचकांना या विषयाबद्दल असलेली विशिष्ट दिलचस्पी लक्षात घेऊन या लेखाचा प्रपंच केलेला आहे. **एक** काही वाचकांना भारतीय तत्त्वज्ञान या विषयाबद्दल दिलचस्पी असते. भारतीय तत्त्वज्ञानातल्या विशिष्ट सिद्धांताना असलेल्या प्रतिष्ठेमुळे प्राचीन भारतातील इतिहास लेखन विकास थोपवून धरण्यात आला, अशी सूचना करण्यात येते. या सुचनेमुळे हे वाचक असहाय्यपणे चांगलेच बुचकळ्यात पडतात. **दोन** काही वाचक हे भारतीय तत्त्वज्ञानाचे खास अभ्यासक व तज्ज्ञही नसतात. पण त्याना प्राचीन भारतीय संस्कृतीबद्दल अधिक अशी सर्वसाधारण दिलचस्पी असते. या अशा वाचकाना भारतीय इतिहास का उपलब्ध नाही? या संबंधात जी तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरणे देण्यात येतात, त्यांचे मूल्यमापन होण्याबाबत खास कर्तव्य आहे. **तीन** भारतीय तत्त्वज्ञान आणि संस्कृती याविषयी काही वाचकाना खास दिलचस्पी नसते. असे असले तरी हे वाचक भारतीय इतिहास उपलब्ध नाही. या संबंधात स्पष्टीकरण देण्याचे जे प्रयत्न होतात, त्याने चांगलेच बुचकळ्यात पडतात. त्याचे कारण असे आहे की, या स्पष्टीकरणाद्वार एखाद्या संस्कृतीस इतिहास या विषयाशी आपल्याला असलेले कर्तव्य विकसित करण्यासाठी कोणती निश्चित अशी परिस्थिती आवश्यक आहे हे या प्रयत्नाद्वारे शक्य होईल असे वाटत

असते.

इतिहासकार आणि तत्त्वज्ञ या दोघांनाही अनेक वर्षे घनिष्टपणे परिचित असलेल्या सर्व-साधारण तर्कधिष्टित संरचनेच्या अनुषंगाने या लेखात युक्तिवाद व प्रतिपादन करण्यात येणार आहे. उदा. एखादे ऐतिहासिक घटीत अस्तित्वात आहे व त्याचे स्पष्टीकरण देण्याची आवश्यकता असते. (तत्त्वज्ञ यास EXPLANANDUM या शब्दाने संबोधितात) आणि काही गृहीत धरलेल्या स्पष्टीकरण देणाऱ्या ज्या घटना आहेत त्या सादर केल्या जातात. या घटनांच्या अंगी असे गुण असतात की, त्यामुळे जे घटीत आहे. ते अपेक्षितच होते, असे सांगून त्याचे स्पष्टीकरण दिले जाते. (तत्त्वज्ञ या घटनांना EXPLANANS या नावाने संबोधितात) आपण त्याना मराठीत **स्पष्टीकरण आवश्यकता – EXPLANANDUM** आणि **स्पष्टीकरण घटना – EXPLANANS** या शब्द समूहाने संबोधू या. या अगोदरच असे नोंदविण्यात आले आहे की, विचारार्थी असलेल्या विवेचनात सादर केल्या जाणाऱ्या सर्वच 'स्पष्टीकरण घटना' या केवळ मूळ भारतीय तत्त्वज्ञानीय सिद्धांताकडे बोट दाखवितात असे नाही. दुसऱ्याही अनेक घटना व वस्तुस्थिती यांचा उल्लेख करण्यात आलेला आहे. उदा. लिखित भाषेचा त्यामानाने कालांतराने झालेला उपयोग, रखरखाटी उन्हाळी हवामान, त्यामुळे हस्तलिखितांची निगा राखून, ती मुळच्या अवस्थेत टिकवून धरणे कठीण जाते, राजकीय स्वातंत्र्य ज्या संस्कृतीत आहे त्याचा आभाव, आणि लिखित साहित्यावर असलेला **ब्राम्हणी** वरचष्मा इत्यादी. या लेखात आपणास फक्त काही स्पष्टीकरणाशी कर्तव्य आहे. ही स्पष्टीकरणे या ना त्या प्रकारे काही विशिष्ट तत्त्वज्ञानीय सिद्धांताचा निर्देश करतात. पण त्याजबरोबर केवळ हेच तत्त्व- ज्ञानीय सिद्धांत हे स्पष्टीकरणाच्या दृष्टीने प्रस्तुत आहेत अशा दावा करण्याच्या ती आवश्यकपणे बांधलेली आहेत असे नाही. या तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरणांचे मूल्यमापन व तपासणी करण्यापूर्वी, तर्कदृष्ट्या उपस्थित होणाऱ्या प्रश्नासंबंधी प्रथम विचार करणे आवश्यक आहे. स्पष्टीकरणाची गरज आहे असे 'स्पष्टीकरण- आवश्यक' असे काही खरोखरच आहे का? हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास प्राचीन भारतात इतिहास नव्हता, ही खरोखरीची सत्य अशी वस्तुस्थिती आहे का?

२

प्राचीन भारतात 'इतिहास'च नव्हता असा दावा अनेकांनी केला आहे हे निश्चितपणे खरे आहे. त्याजबरोबर या अर्थाची विधाने, अनेक लोक, गेले कित्येक वर्षे करीत आहेत हेही खरे आहे. याठिकाणी नोंद घ्यावी असा एक मुद्दा आहे. तो म्हणजे ही अशी विधाने करणाऱ्यात अत्यंत प्रभावशाली व्यक्ती या तत्त्वज्ञच होत्या. भारताचा इतिहास उपलब्ध नाही या घटीताला काही ना काही तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरण असावयास हवे, या प्रतिपादनातील सत्याबद्दल त्यांची खात्री पटलेली होती. या अशा प्रकारचा युक्तिवाद व त्याच्या अनुषंगाने दावा करणाऱ्यासाठी लिखित स्वरूपाचा जुन्यात जुना पुरावा, महान मुसलमान प्रवासी अल्बेरूनी (महमद अल-बिरूनी) यांनी प्राप्त करून दिलेला आहे. अल्बेरुनी यांनी भारताला

पहिली भेट इ. स. १०२० च्या सुमारास दिली होती. त्यांच्या लिखाणात पुढील नोंद आहे. *'इतिहास कोणत्या कालक्रमानुसार घडला याकडे दुर्दैवाने हिंदु फारसे लक्ष देत नाहीत. इतिहासात राजे, कोणत्या काळी व कोणत्या अनुक्रमाने येऊन गेले हे सांगण्याबाबत ते फारच निष्काळजी व उदासीन असतात. त्यांनी माहिती ध्यावी असा आपण जेव्हा फारच आग्रह करतो, तेव्हा त्याना काय सांगायचे तेच समजत नाही. काय सांगावे हे माहीत नसल्याकरणाने कपोल कल्पित कथा सांगण्याचा मार्ग अगदी न चुकता ते स्विकारतात.'*

**जेम्स मिल** यांचे **हिस्टरी ऑफ इंडिया** (भारताचा इतिहास) हा ग्रंथ वर उल्लेखिलेल्या दावा व युक्तिवाद यांचे समर्थन करणारा आणखी एक ग्रंथ. अर्थात हा ग्रंथ अल्बेरूनीच्या लिखाणानंतर अनेक शतके होऊन गेल्यानंतर लिहिण्यात आला होता. महत्त्वाचा मुद्दा हा आहे की **मिल** यांनी भारताला कधीही भेट दिली नव्हती. शिवाय त्यांना एकही भारतीय भाषा अवगत नव्हती. इतके असूनही गंमत अशी आहे की भारताचा इतिहास लिहिण्याच्या कामात या दोन्ही गोष्टी ही आपली खास व विशिष्ट शिफारसपत्रे आहेत अशी फुशारकी ते मारतात. आपला इतिहास हा समीक्षात्मक आहे (CRITICAL HISTORY) आहे आणि पोर्वात्याबद्दल काहीही माहिती नसणे ही आपल्या नि:पक्षपातीपणाची ग्वाही आहे असे ते मानीत होते. भारतांशी परिचय होऊन त्या देशाविषयी प्रत्यक्ष ज्ञान झाले म्हणजे त्यातून लाडक्या विश्वासाची (FOND CREDULISM) निर्मिती होते. परंतु तसे ज्ञान नसल्याकारणाने, त्यापासून निर्माण होणारे अडथळे व त्रुटी आपल्या लिखाणात नाहीत असे मिल्स यांनी म्हटले होते. ते पुढे जाऊन असाही युक्तिवाद करतात की पाश्चिमात्य सभ्यतेशी तुलना करता, भारतीय विशेष करून हिंदु सभ्यता ही कमालीची निकृष्ट आहे. म्हणूनच ब्रिटिशांचे भारतावर राज्य असणे ही गोष्ट समर्थनीय आहे. हिंदुचा इतिहास उपलब्ध नाही हा त्यांच्या सांस्कृतिक निकृष्टते बाबतचा पुरावा आहे.

*"दैनंदिन मानवी व्यवहारात, तर्क-बुद्धी-युक्तिवाद (reason) या गोष्टी जेव्हा भरपूर प्रमाणात प्रभाव टाकण्यास सुरुवात करतात, त्यावेळी लिखित साहित्याला विशेष महत्त्व प्राप्त होते. इतिहास काळात ज्या घटना आणि कृती होतात त्याची नोंद अचूकपणे टिकवून धरण्याच्या कामी लिखित साहित्याला अत्युच्च महत्त्व प्राप्त होते. असे लिखित साहित्य उपलब्ध असणे महत्त्वाचे आहे याचे कारण या घटना व कृतीमुळे राष्ट्राच्या हितसंबंधाचा पुरस्कार होतो अगर त्याला कधी बाधाही येते. परंतु ही स्मरणे टिकवून धरावीत हे भान येण्यापूर्वी मानवी मनाकडे एका विशिष्ट पातळीवरची संस्कृती असली पाहिजे. . . . अनेक राष्ट्रे उर्मट असतात. त्यापैकी काहींचा लिखित साहित्याशी अनेक वर्षांचा परिचय असतो. पण ही राष्ट्रे देखील इतिहासाकडे दुर्लक्ष करून, पुराणकथा आणि कवीनी रचलेली कवने यावर फारच खूष असतात.*

*हिंदूच्या वाङ्मयात एकही इतिहास ग्रंथ नाही ही वस्तुस्थिती सर्वमान्यच आहे. भविष्य-काळाच्या मार्गदर्शनासाठी गतइतिहासाची नोंद असते. . . . हिंदुनी इतिहासाचे हे मूल्य*

*जाणण्याइतकी बौद्धिक परिपक्वतेची पातळी गाठली नव्हती.''*

याबाबतीत संस्कृतीच्या मोजमापात मोगल संस्कृतीदेखील वरच्या पातळीवर आहे असे प्रतिपादन **मिल्स** यांनी केलेले आहे.

*''अनुभवावर आपले सर्वज्ञान उभे असल्याकारणाने, भविष्यकाळाच्या मार्गदर्शनासाठी गत– इतिहासाची नोंद हे एक परिमाण आहे. लिहिण्याच्या कलेची उपयुक्तता ही या परिमाणात प्रमुखस्थानी आहे. वाङ्मयाच्या या अत्यंत महत्त्वाच्या शाखेबाबत हिंदु हे सर्वस्वी दरिद्री आहेत. आशिया खंडातील इतर कोणत्याही देशात नसेल इतक्या परिपूर्णतेने इतिहास रचनेतील कौशल्य भारतीय मुसलमानानी प्रत्यक्ष कार्यवाहीत आणून दाखविले.''*

भारतासंबंधी **मिल** यांचा इतिहास हा प्रमाण ग्रंथ बनला होता; आणि अनेक दशके या ग्रंथाने आपले हे स्थान टिकवून धरले होते. इस्ट इंडिया कंपनीचे हेलीबरी (HAILEY BURY) या ठिकाणी असलेल्या कॉलेजात हा ग्रंथ अनेक वर्षे पाठ्यपुस्तक म्हणून वापरण्यात येत असे. अशा प्रकारे भारतीय प्रशासकांच्या अनेक पिढ्यांच्या भारतीय संस्कृतीकडे पाहण्याच्या दृष्टीकोनाला या ग्रंथाने आकार दिला होता. इ. स. १८३५ साली इंग्लिश शिक्षण पद्धतीचा भारताला परिचय करून देण्यात **थॉमस बॅबिंग्टन मेकॉले** यांचा वाटा सिंहाचा होता, त्यानाही **मिल** यांच्या ग्रंथाचे कौतुक होते. भारतातील ब्रिटिश राजवटीचे अस्तित्व योग्यच आहे असे समर्थन देण्यात अनेक युरोपिय माणसांचा स्वार्थ गुंतलेला नव्हता, व तसे करण्यात त्याना रसही नव्हता. परंतु अशा युरोपियनांपैकी अनेकांच्या दृष्टीकोनावर **मिल** यांच्या ग्रंथाचा जबरदस्त प्रभाव होता. त्या लोकांपैकी एक अत्यंत महत्त्वाचे नाव – **हेगेल** हे तत्त्वज्ञ.

**हेगेल** यांना भारताबद्दल दिलचस्पी असण्याचे एक कारण **हर्डर** आणि **श्लेगेल** या दोन तत्त्वज्ञ – इतिहासकाराना असलेला त्यांचा विरोध. या दोघांच्या लिखाणाचे **हेगेल** हे फार धारदार समीक्षक होते. **हर्डर** आणि **श्लेगेल** यांनी भारतीय विचारसरणी विषयी विवेचन केले होते. त्याचे स्वरूप रोमँटीक अनोखेपणा व वैचित्र्य याकडे झुकणारे होते. हेगेल याना भारताविषयी दिलचस्पी असण्याचे हे आणखी एक कारण. **हेगेल** यांचे स्वत:चे इतिहास–विषयक तत्त्वज्ञान हे गुंतागुंतीचे आहे. या तत्त्वज्ञानात गर्भितपणे असे सुचित करण्यात आले आहे की पाश्चिमात्य विचारांच्या विकासातून विश्व चैतन्याचे (WELT GEIST) स्पष्टीकरण जगाच्या प्रचितीस येते. युरोपशी तुलना करता, पूर्व (ORIENT) स्थितीशील आहे. युरोपच्या इतिहासाची प्रकृती प्रगतीत अनुस्यूत असलेले गतिशास्त्र पूर्वेकडे आढळत नाही. त्याठिकाणी त्याचा आभावच आहे. तत्कालीन पौर्वात्य पंडितानी जे विवरणात्मक लिखाण केले होते, ते लिखाण आपल्या सिद्धांताचे समर्थक आहे असे आपणास आढळून आले आहे असा **हेगेल** यांचा दावा होता. **हेगेल** हे स्वत: भारतशास्त्रज्ञ (INDOLOGIST) नाहीत. त्याना एकही भारतीय भाषा लिहिता वाचता येत नव्हती. असे असल्याकारणाने त्यानी ब्रिटिश लिखाणा–

तील संदर्भावर-यात **जेम्स मिल** यांचे लिखाणही समाविष्ट आहे– माहिती मिळविण्यासाठी फार मोठी भिस्त ठेवली होती. एवंच त्यानी आपल्या LECTURES ON THE PHILOSOPHY OF HISTORY (इतिहासाच्या तत्त्वज्ञानासंबंधी व्याख्याने) या व्याख्यान मालेत पुढे निर्देश केलेल्या मतांची भलावण केली आहे, यात आश्चर्य करण्या–सारखे काहीच नाही.

*अत्यंत बारीक अशा तपशीलानी भरलेला आपल्या देशाचा इतिहास चीन या राष्ट्राकड आहे. . . . याउलट भारताचे आहे. भूमिती, अंकगणित, बीजगणित आणि खगोलशास्त्र या ज्ञानशाखात हिंदूनी किती श्रेष्ठ दर्जाची किर्ती संपादन केली होती हे अगदी अलीकडेच भारतीय वाङ्मयाचा जो शोध लागला आहे त्याने दाखवून दिले आहे. तत्त्वज्ञान याविषयातही त्यानी फार मोठी मजल मारली होती. हिंदूनी व्याकरण या ज्ञानशाखेत इतकी प्रगती केली होती की संस्कृत या भाषेइतकी संपूर्णपणे विकसित अशी दुसरी कोणतीही भाषा आहे असे दिसत नाही. परंतु इतिहास या विषयाकडे संपूर्णतः दुर्लक्ष करण्यात आले होते, अगर तसा तो अस्तित्वाच नव्हता असे आपणास आढळून आले आहे याचे कारण इतिहास या विषयाची समज याचा अर्थ एखाद्या घटनेकडे अगर विषयाकडे स्वतंत्र्यपणे पहाणे, त्याकडे वस्तुनिष्ठतेच्या प्रकाशात पहाण्याची ताकद असणे आणि इतर विषयाबरोबर अगर वस्तुजालाशी इतिहासाचे कोणते तर्काधिष्टित संबंध आहेत याचे आकलन असणे– आवश्यक आहे. म्हणूनच काही विशिष्ट लोकाना इतिहास आणि सर्व सामान्यपणे गद्यलेखन या विषयात गती असते. हे लोक विकासाच्या एका टप्प्यावर येऊन ठेवलेले असतात (आणि हा टप्पा या लोकाना आरंभबिंदू करता येईल) विकासाच्या या अवस्थेत आपल्या स्वतःचे अस्तित्व स्वतंत्र्य आहे म्हणजेच आत्मजाणीव स्वतःकडे आहे या स्वरूपात व्यक्तीला आपले आकलन करून घेता येते.*

*अशी समज हिंदुच्याकडे नसल्याने इतिहास लेखनाची कुवत त्यांच्याकडे नाही. जे काही घडते ते गोंधळलेली स्वप्ने या स्वरूपात त्यांच्या मनात विरून जाते वा विरळपणे पसरते. आपणास ज्यास ऐतिहासिक सत्य आणि पडताळा (veracity) म्हणजे घटनांचे विचारपूर्वक आकलन, आणि त्यांचे विश्वसनीय सत्य असे प्रतिनिधित्व– म्हणतो यापैकी काहीही हिंदूच्यात आपणास शोधूनही पहाता येणार नाही.*

हे अगदी वांशिक (Racist) असे एकोणिसाव्या शतकातील विवरण आहे. विसाव्या शतकातील बौद्धिक आदान-प्रदानात हे हळूहळू जाहीरपणे तरी अस्विकृत ठरविण्यात आले होते. परंतु असे आहे तरी **मिल** आणि **हेगेल** यांच्या विचाराचा प्रभाव कायमच होता. **मॅक्स वेबर** यांच्या लिखाणात या दोन्ही दृष्टीकोनांच्या प्रभावाचे मोठे लक्षवेधी मिलन झालेले आहे. THE RELIGION OF INDIA (भारताचा धर्म) हा **वेबर** यांचा त्यांच्या भावी लिखाणाला आधारभूत ठरलेला महत्त्वाचा ग्रंथ. भारतासंबंधी या ग्रंथात जी माहिती आहे ती प्रामुख्याने



अनुक्रमणिका

ब्रिटिश संदर्भ ग्रंथातून घेण्यात आलेली आहे. परंतु ग्रंथ लेखन कसे करावे, याबद्दलच्या मार्गदर्शक पद्धती संबंधात जर्मन इतिहासशास्त्र परंपरेचे ते वारसदार होते. या परंपरेची मुळे **हेगेल** यांच्या विचारात होती. प्राचीन भारतीयांच्या बौद्धिक कर्तृत्वासंबंधी **वेबर** यांनी जो दावा केलेला आहे त्यात **मिल** आणि **हेगेल** या दोघांच्याही विचारांचे प्रतिध्वनी आपणस ऐकू येतात.

*"अनुभवजन्य, भावनांचा स्पर्श नसलेल्या साध्या, सरळ घटनेतील अर्थाची गळचेपी होई अशा घटनेच्या व्याप्ती पलीकडच्या फॅन्टसीत शिरून या घटनेच्या अर्थाचा महत्वाचा शोध घेण्याच्या कामात मुलतः शाब्दिक कसरतीच्या खेळाकरवी ही गळचेपी केली जात असे. परंतु बीजगणित व्याकरण (यात वक्तृत्व, आणि नाट्य, आणि त्यापेक्षा जरा कमी प्रमाणात काव्यातील गणमात्रा आणि डौलदार लेखन यांचा समावेश आहे) इतकेच नव्हे तर शरीर– शास्त्र, वैद्यक (अर्थात शस्त्रक्रिया कौशल्य यातून वगळावयाचे), पशुवैद्यक इत्यादी ज्ञान– शाखात भारतीय वैज्ञानिक वाङ्मयाने उत्कृष्ट अशी भर टाकलेली आहे. तथापि हे सारे जरी असले तरी इतिहास या विषयात एक शास्त्र या स्वरूपात— या प्राचीन साहित्यात काहीही आढळत नाही."*

भारतीयांची अनैतिहासिकता याबाबतचे संविधान अगदी सुरुवातीला साम्राज्यशाहीच्या सेवेसाठी अवतीर्ण झाले होते. पाश्चिमात्य संस्कृतीचे मोठेपण सिद्ध व्हावे यासाठीही ते कामी आले. हे संविधान कालांतराने आधुनिक भारतशास्त्राची एक सर्वमान्य स्वरूपाची गोष्ट बनली. या अशा विचारसरणीत केवळ पाश्चिमात्यच सामील झाले होते असे नाही. बिगर पाश्चिमात्यानीही या संविधानाचा पाठपुरावा केला होता, उदा. **हाजमे नाकामूरा** (HAJME NAKAMURA) हे या क्षेत्रातील नामवंत जपानी अभ्यासक व पंडित. पौर्वात्य देशातील लोकांचे विचार करण्याचे मार्ग (WAYS OF THINKING OF EASTERN PEOPLES) हा त्यांचा तौलनिक अभ्यास प्रसिद्ध आहे. या ग्रंथात या सुपरिचित संविधानाला पुन्हा एकदा जोरदार पाठिंबा व्यक्त करण्यात आलेला आहे. *"भारतीय इतिहास ग्रंथाना-तसे म्हणजे जे संख्येने फारच अल्प आहेत – फॅन्टसी व पुराणे यांची रंगछटा आहे. हे ग्रंथ इतिहास या शास्त्राची निर्मिती नसून, ती तशी कलानिर्मितीच आहे. . . . नेमकी व स्पष्ट आकडेवारी, घटनांचा क्रम, या घटना कोठे घडल्या, त्यांचे स्थळ व काल यांच्याशी संबंधित असलेले इतर तपशील या सर्वांकडे हे इतिहास ग्रंथ साफ दुर्लक्ष करतात. . . . हे ग्रंथ वास्तवापासून दूर असून ते तसे म्हटले तर केवळ फॅन्टसीची निर्मिती आहेत. . . . गतइतिहासाच्या संदर्भात सर्वच दस्त– ऐवजातून, इतिहास विषयक ग्रंथाना फारच कमी महत्त्वाचे, व जे लक्षणिय समजले जात नाही असे स्थान देण्यात आलेले आहे.*

आजकाल 'भारतीयांची अनैतिहासिकता' या दृष्टीकोनाची कोणत्या ना कोणत्या स्वरूपाची आवृत्ती, विद्यमानकाळातील अनेक भारतशास्त्रज्ञांच्या लिखाणातून व त्या क्षेत्रात खरोखरीच इतकी जनताप्रिय बनली आहे की सर्वच त्या दृष्टीकोनाचा हवाला देतात. उदा.

एक अमेरिकन पंडित **जेराल्ड लारसन** यांनी इ. स. १९८० साली एक निबंध प्रसिद्ध केला. त्यात त्यानी अगदी बिनधास्त अशा छातीठोकपणे, आपण करीत असलेल्या विधानांच्या सत्यतेसंबंधात कोणत्याही स्वरूपाचा पुरावा देण्यासाठी कसलीही हालचाल न करता पुढील विधान केलेले आहे.

*"दक्षिण आशियातील देशात 'त्या देशातूनच उत्स्फूर्तपणे उदयास आलेल्या संकल्पना–पद्धतीमध्ये इतिहास या ज्ञानशाखेत नेमकेपणे दर्शित करावे (निदान एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या अगोदरच्या कालात) असे काहीही नाही. त्याचे काहीही असो इतिहास व त्यावरील भाष्य यामुळे जे गुण प्राप्त होतात अगर प्राप्त होत नाहीत ते आपण बाजूस ठेवू या. पण नंतर असे आढळून येते की दक्षिण आशियाई लोकांना या अशा स्पष्टीकरणाचा कधीकाळी केला असल्यास क्वचितच उपयोग केलेला आहे असे दिसते. . . . दक्षिण आशियाई पर्यावरणात, ऐतिहासिक भाष्य, हे भाष्यच नव्हे असे मानले जाते. थोडक्यात ते **'शून्य'** या वर्गात आहे."*

परंतु मुद्दा असा आहे की, हे सर्व युक्तिवाद व दावे खरे आहेत का? वस्तुस्थिती अशी आहे की यातले अनेक लेखक केवळ आपल्या पूर्वसूरींची साक्ष काढीत असतात. परंतु असे करताना आपण कोणाची साक्ष पेश करीत आहोत, त्या व्यक्तींचा नामनिर्देषही करीत नाहीत. म्हणूनच या सादर करण्यात आलेल्या पुराव्यासंबंधी अधिक तपशीलात जाऊन तपासणी करण्यास आपण प्रवृत्त व्हावयास हवे. येथवर उद्धृत केलेल्या उदाहरणात काही वेगळे व स्पष्ट असे ऐतिहासिक सिद्धांत आहेत. परंतु या अलग व वेगळ्या सिद्धांताचे मिश्रण तयार होण्याचा धोका आहे. या सिद्धांतात खालील तीन सिद्धांत समाविष्ट आहेत.

(सिद्धांत – सि १) प्राचीन भारतात इतिहास ही ज्ञानशाखा नव्हती.

(सिद्धांत – सि २) प्राचीन भारतात इतिहासशास्त्र (HISTRIOGRAPHY) अगर वैज्ञानिक इतिहास लेखन नव्हते.

(सिद्धांत – सि ३) प्राचीन भारतात 'इतिहास' या विषयाला फारसे महत्त्व नव्हते.

आपण क्षणभर असे गृहीत धरू या का सि२ बरोबर आहे. असे असले तरी तो मोठा लक्षवेधी सिद्धांत आहे असे नाही. याचे कारण ज्याचे स्पष्टीकरण असावयास हवे, अशा स्वरूपाचा भारत व पाश्चिमात्यात असलेल्या फरकाचे– अर्थात तो असल्यास– काहीही दर्शन त्याने होत नाही. आता हे खरे आहे की प्राचीन ग्रीक व रोमन लोकानी इतिहास लिहले. परंतु आधुनिक पाश्चिमात्य इतिहासशास्त्र आणि वैज्ञानिक इतिहास या विषयीच्या संकल्पना अठराच्या शतकाच्या अखेरीस व एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाला विकसित झाल्या होत्या. म्हणूनच प्राचीन भारताप्रमाणेच प्राचीन ग्रीक व रोमन आणि चीनच्या इतिहास लेखनातही त्या गोष्टीबाबत कमतरत्ता होती याबद्दल आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही. एवंच दिलचस्पी वाटावी असे भारतीयांची अनैतिहासिकता या संदर्भात दोन सिद्धांत रहातात

सि१ आणि सि३.

३

सिद्धांत सि १ हा बरोबर आहे असे मानायचे का? तसे असते तर मग प्राचीन भारताला इतिहास नव्हता असे मानावे लागेल. या प्रनाचे उत्तर एका शब्दात 'नाही' (इतिहास होता) हेच आहे. प्रख्यात भारतीय इतिहासकार **आर. सी. मुझुमदार** यांनी IDEAS OF HISTORY IN SASKRIT LITERATURE (संस्कृत वाङ्मयातील इतिहासाबद्दलची कल्पना) या लेखात याबद्दल सविस्तर विवेचन केलेले आहे. सिद्धांत१ चे मूल्यमापन करणे हे थोडेसे गुंतागुंतीचे काम आहे. याचे कारण त्यात अगदी दोन भिन्न प्रश्न गुरफटल्यासारखे अनुस्यूत आहेत. (१) गतकालाबद्दल प्राचीन भारतीयाना भान होते का? (२) प्राचीन भारतीयाना हे भान असले तर मग आधुनिक पाश्चिमात्य ज्यास 'इतिहास' विषयक लेखन समजतात त्या पद्धतीने त्यांनी गतकाळाबद्दल लेखन केले होते का? भारतीयाना गतक'लाबद्दल भानच नव्हते हे अगदी भन्नाट, अविश्वसनीय वाटावे असे विधान ठरेल याचे कारण देव आणि राक्षस, राजे आणि हिरो, यांच्या कथा सांगणारे विपुल संस्कृत वाङ्मय उपलब्ध आहे. शिवाय या सर्व कथा अत्यंत गुंतागुंतीच्या आहेतच. शिवाय अनेक पिढ्याना आणि अनुक्रमाने येणाऱ्या संबंधानी या सर्व कथा जोडलेल्या आहेत. तथापि आधुनिक इतिहासात, घडलेला खरा इतिहास आणि मिथ स्वरूपी इतिहास यात फरक केला जातो. तसा फरक करणारे असे काहीही त्या विपुल संस्कृत साहित्यात नाही, हा मुद्दा अर्थातच मान्य करावा लागेल. पाश्चिमात्य वाङ्मयात ज्यास 'इतिहास' या नावाने संबोधिले जाते, त्यासारखे काही लिखाण प्राचीन भारतात होते का?

या प्रश्नाचे उत्तर 'खरोखर होते' हेच आहे. प्राचीन भारतीय राजांच्या पदरी व त्यांच्या दरबारात लेखनिक असत. राजाच्या साम्राज्यात आणि राजवटीत घडणाऱ्या महत्त्वाच्या घटनांची अगदी काळजीपूर्वक नोंद हे लेखनिक करीत. आपणास या नोंदी आज उपलब्ध नाहीत हे खरे आहे. पण एकेकाळी त्या अस्तित्वात होत्या. प्राचीन ग्रंथातून ज्या वाङ्मयाची एका विशिष्ट वर्गात गणना होत असे, त्याचा प्रछन्न आदराने 'इतिहास' या नावाने उल्लेख केला जात होता. आपण आजकाल ज्यास 'इतिहास' ही संज्ञा वापरतो, त्यापेक्षा प्राचीन भारतातील 'इतिहास' या संज्ञेची व्याप्ती कितीतरी मोठा होती. तसे असले तरी "आधुनिक संज्ञा' आणि 'प्राचीन संज्ञा' या दोन संज्ञाना सर्वस्वी अलग करता येणार नाही. तशा त्या एकमेकात घुसतातच. इ. स. बाराव्या शतकात **कवी कल्हणाने,** आपल्या स्थानिक काश्मीरी राजांचा इतिहास– राजतरंगिणी– रचला होता. श्रीलंका या देशाची पाली भाषेतील बखर 'महावंश' ही उपलब्ध आहे. या पाली ग्रंथातील अगदी सुरुवातीचा भाग इ. स. सहाव्या शतकात रचला गेला होता. श्रीलंका या बेटावरील बुद्ध धर्माचा इतिहास त्या वृत्तांतात कथन केलेला आहे. अर्थातच येथे उल्लेखिलेले ग्रंथ हे आधुनिक अर्थाने समीक्षक इतिहास नाहीत.







ग्रीक आणि रोमन इतिहासकारांच्या ग्रंथातही याच प्रकारच्या त्रुटी आढळून येतात याचा उल्लेख यापूर्वी येऊन गेलेला आहे. शिवाय **कल्हणाच्या इतिहास लेखनातील मर्यादा काहीही असोत. पण इतिहासकाराने वैयक्तिक अलिप्ततेची मशागत करणे आणि दप्तरे रुमाल शिलालेख ताम्रपट यातून उपलब्ध असलेला पुरावा स्वतः तपासून मगच त्याचा उपयोग इतिहास लेखनात केला पाहिजे हा मुद्दा कवी कल्हणाने आपल्या लिखाणात स्पष्टपणे नमूद केलेला आहे.** म्हणूनच प्राचीन भारतात इतिहासच नव्हता आणि प्राचीन भारतीयाना इतिहासाचे भान नव्हते, असे म्हणणे हे अगदी काटेकोरपणे सांगावयाचे झाल्यास बरोबर नाही.

इतिहास याविषयाशिवाय अन्य विषयाशी संबंधीत असे विपुल भारतीय वाङ्मय उपलब्ध आहे. परंतु त्यामानाने इतिहास विषयक वाङ्मय उपलब्ध नाही. आपल्याला आज उपलब्ध असलेल्या सर्व माहितीत लक्षात येईल अशी ही आश्चर्यकारक गोष्ट आहे. भारतीय इतिहासकार **आर. सि. मुझुमदार** यांनी या संदर्भात पुन्हा एकदा असे स्मरण दिले आहे की.. *'भारतीय इतिहासातील सर्वात मोठा कालखंड म्हणजे अगदी प्राचीन काळापासून, तो तेराव्या शतकात मुसलमानानी भारत वर्षात सत्ता प्रस्थापित करण्यापर्यंतचा कालखंड. या जवळजवळ चार हजार वर्षांच्या कालखंडात आपणास कसल्याही प्रकारचा इतिहास विषयक दस्तऐवज उपलब्ध नाही. ग्रीक, रोम आणि चीन या देशात आपणास हा पुरावा उपलब्ध आहे. एक वेळ दस्तऐवज वा अन्य पुरावा बाजूस ठेवा. त्यामानाने कमी तपशीलात जाऊन केलेले कथाकथनही (NARRATIVE) उपलब्ध नाही. . . . (प्राचीन भारताने आपणासाठी विपुल साहित्य मागे ठेवलेले आहे, हा मुद्दा हे विधान करताना जमेस धरलेला आहे. ) असे आहे तरी, सुमारे दोन हजार वर्षांहून अधिक काळात झालेल्या बौद्धिक व वाङ्मयीन चळवळीबाबत, त्यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या साहित्याचा प्रचंड खजिना आधुनिक भारताकडे प्राचीन भारतीयानी वारसा हक्काने सुपूर्द केलेला आहे.'*

अर्थात अशी शक्यता आहे की एकेकाळी विपुल असे भारतीय इतिहास विषयक वाङ्मय अस्तित्वात होते. परंतु ते आता आपणास उपलब्ध नाही. हे होण्याची कारणे काहीही असोत. परंतु आज आपणाकडे सर्व संकटातून-यात इस्लामी संकट गृहीत धरलेले आहे- बचावून जे महाप्रचंड असे प्राचीन भारतीय वाङ्मय आपल्याकडे आलेले आहे, त्या साहित्यात जे इतिहासविषयक ग्रंथ आपण गमावून बसलो असू त्याबद्दल फारच थोडे उल्लेख वा संदर्भ असतात. म्हणूनच विद्यमानकाळी जे साहित्य उपलब्ध आहे त्यामानाने फार प्रचंड असे इतिहासविषयक लिखाण एके काळी उपलब्ध होते असे गृहित धरण्यास तर्क-बुद्धीला पटतील अशी विश्वसनीय फारच थोडी कारणे आपणाकडे आहेत. इतिहास-विषयक लिखाणाची दिसून येणारी वानवा असण्याचे एकच अगदी उघड व विश्वसनीय कारण आहे. ते कारण भारतीयाना इतिहासाचे भान नव्हते हे नाही. आपण हे कारण किती चुकीचे व खोटे आहे हे पाहिलेच आहे. भारतीयांच्या लेखी इतिहास या विषयाला विशेष

करून 'मूल्य' नव्हते. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास वर उल्लेखिलेला सि३ हा सिद्धांत बरोबर आहे. या प्रतिपादनाचे समर्थन करणारा लक्षवेधी पुरावा उपलब्ध आहे. उदा. वस्तुस्थिती अशी आहे की ज्ञानाचा स्वतंत्र्य मूळ स्रोत या स्वरूपात इतिहास अगर स्मरणे या दोघानाही अभिजात भारतीय तत्त्वज्ञानाने मान्यता दिलेली नाही.

हे प्रतिपादन जर मान्य केले तर मग भारतीय हे 'इतिहास' हा विषय ज्यास काही 'मूल्य' आहे असा विषय का मानीत नव्हते हा प्रश्न लगेच उपस्थित होतो. म्हणजेच आपण खऱ्याखुऱ्या 'स्पष्टीकरण– आवश्यकतेची' (EXPLANARDUM) नेमकी जागा प्रस्थापित करण्यासाठी 'स्पष्टीकरण घटना' (EXPLANANS) चा पुरवठा भारतीय तत्त्वज्ञानाची अनेक अंगे करतील असे आपण समजतो. प्राचीन भारतीयाना इतिहासाला 'मूल्य' नाही असे का वाटत होते? या प्रश्नाचा उत्तरांचा संच आपणास वेगवेगळ्या अस्सल भारतीयच तत्त्वज्ञानांतील सिद्धांताचा जो प्रभाव होता व त्याची जी स्पष्टीकरणे आहेत त्यात शोधून पहाता येईल. या संदर्भात नेमके कोणते सिद्धांत याबाबत जबाबदार समजले जातात हाच मुद्दा मुळात वादग्रस्त आहे. याचे कारण "काल" आणि "स्वत:" (TIME AND SELF) याबद्दल विशेष करून जे सिद्धांत आहेत ते जबाबदार आहेत असे समजले जाते. सर्वसाधारण स्वरूपाची जी स्पष्टीकरणे आहेत, त्या तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरण घटना (explanans) आहेत असे या लेखात गृहीत धरण्यात आलेले आहे. सादर केलेल्या उदाहरणांपैकी काही थोड्या उदाहरणांची तपशीलात जाऊन अधिक कसोशीने तपासणी करण्याचा या लेखाचा एक उद्देश आहे. या कार्यास सुरुवात करण्याअगोदर या लेखात वापरलेल्या विवेचन पद्धतीत अनुस्यूत असलेल्या तत्त्वांचे (Methedological Principles) स्पष्टीकरणे देणे आणि त्यांच्यातील वेगळेपणा स्पष्ट करणे हे इष्ट ठरेल.(तत्त्व१) कोणतीही विश्वसनिय तत्त्वज्ञानिय स्पष्टीकरण घटना (EXPLANANS) ही प्रमुख व महत्त्वाच्या भारतीय तत्त्वज्ञानातील संहीताशी मिळती-जुळती (Compatible) असली पाहिजे.

(तत्त्व२) कोणत्याही विश्वसनीय तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरण घटनेला (Explanans) प्रमुख व महत्त्वाच्या भारतीय तत्त्वज्ञानातील संहितेत **आधार** असला पाहिजे.

या तत्त्वाविषयी अगदी झटपट अशी दोन भाष्ये. **(एक)** या ठिकाणी प्रमुख व महत्त्वाच्या भारतीय तत्त्वज्ञानीय संहिता याचा अर्थ उघड व स्पष्ट आहे. पूर्वसूरींनी घालून दिलेल्या कित्यानुसार, हिंदु तत्त्वज्ञानातील सहा दर्शनांच्या ज्या प्रमुख संहिता आहेत असा अर्थ या शब्दप्रयोगाच्या व्याप्तीत अंतर्भूत करण्यात आलेला आहे. सांख्य, योग, न्याय, वैशेषिका, मीमांसा आणि वेदांत. ही ती सहा दर्शने होत. त्याच्या जोडीला बुद्ध धर्मिय आणि जैन धर्मिय तत्त्वज्ञानातील प्रमुख संहीताही समाविष्ट आहेत.

**दोन** वर उल्लेखिलेल्या दोन तत्त्वापैकी तत्त्व२ हे अर्थात अधिक शक्तिशाली आहे. याचे कारण प्रमुख भारतीय तत्त्वज्ञानीय संहीताशी 'स्पष्टीकरण घटना' विसंवादी असता कामा

नयेत, ही तत्त्व१ ची आवश्यकता आहे; पण तत्त्व२ हे त्याच्याही पुढे जाऊ इच्छिते. इतिहासातील मुकेपणातून (Historical Silence) प्राप्त होणारी प्रतिपादने तत्त्व२ मध्ये बसत नाहीत. (इतिहासातील मुकेपणा याचा अर्थ एखाद्या मुद्याबद्दल कोणत्या तत्त्वज्ञानाने भाष्य केलेले नसले, तर तो भाग विचारात घेतला जाणार नाही. थोडक्यात संशयाचा फायदा देण्यात येणार नाही) कदाचित आदर्श अशा एखाद्या स्पष्टीकरण घटनेने तत्त्व१ आणि तत्त्व२ या दोन्ही तत्त्वाचे समाधान करावे असे असले तरी एका मुद्याची नोंद घेणे फलदाई आहे. तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरण घटनासाठी जे उमेदवार आहेत. त्यांच्या दृष्टीने त्यामानाने कमकुवत असे तत्त्व१ हे सत्य असणे हे केवळ आवश्यक आहे.

४

'काला'विषयी भारतीय तत्त्वज्ञानात ज्या वेगवेगळ्या कल्पना आहेत, त्याला एक लोकप्रिय अशा प्रकारची एक तत्त्वज्ञानिय स्पष्टीकरण घटना आवाहन करते. उदा. खाली उदधृत केलेले सर्वसामान्य प्रकारचे स्पष्टीकरण विचारात घेऊ या.

*भारतीयांचा इतिहास या विषयाबाबतचा दृष्टीकोन समजावून घेण्यात 'माया' आणि 'चक्राकार काल' या दोन्ही विषयीच्या संकल्पना समजावून घेणे हे इतके महत्त्वाचे आहे ते यासाठीच, इस्लाम आणि ज्यू-ख्रिश्चन परंपरेपेक्षा हिंदु परंपरा वेगळी आहे. हिंदु आणि बुद्ध या दोन्हीही धर्मियात इतिहासाला अतिभौतिक लक्षणियत्व नाही. जो कोणी कालातून मुक्त झला आहे तो जीवनमुक्त– जीवनमुक्ती हा परमोच्चा असा मानवी आदर्श आहे. हिंदु अति–भौतिक विचारात अत्यंत प्रगत पातळीवर काल-चक्राकार आहे ही संकल्पना टिकून आहे. तसे असल्याकारणाने आपण ज्यास इतिहास म्हणतो त्याच्यातील (आणि हिंदु विचारातील) फरक उद्भवतो. (हिंदुची इतिहासाबद्दलची कल्पना) भारतीय सांस्कृतिक परंपरेचा वेगळेपणा दाखविणारे लक्षण आहे. . . . मानव हा इतिहासाचा विषय आहे आणि तो इतिहासही घडवितो, या आधुनिक कल्पनेला हिंदुच्या या योजनेत स्थानच नाही.*

पुन्हा एकदा अनेक वेगवेगळ्या सिद्धांतांचे येथे मिश्रण करण्यात आलेले आहे. परंतु त्याविषयी कोणतीही मदत व स्पष्टीकरण देण्यात आलेले नाही. **'चक्राकार काल'** या संकल्पनेवर भारतीयांची गृहीत धरलेली श्रद्धा हे भारतीयांच्या अनैतिहासिकतेचे कारण आहे का? की 'काल' ही 'माया' आहे ही 'श्रद्धा' आहे? की 'काला' बाहेर जो मानव आहे तो 'आदर्श मानव' ही हिंदुची श्रद्धा आहे? आपण या सर्वच शक्यतांचा क्रमाक्रमाने विचार करू या.

**काल** हा **चक्राकार** आहे हा सिद्धांत भारतीयांचा आहे हे आता सर्वसामान्यपणे मान्य झालेले आहे. परंतु त्याचा संदर्भ देऊन भारतीयांच्या अनैतिहासिकतेचे स्पष्टीकरण देता येत नाही. **(एक) काल-चक्राकार** आहे याचा अर्थ आदी-अंत नाही, अशा पद्धतीने घटना पुन्हा पुन्हा घडणे हा असेल तर काल-चक्राकार आहे यावर भारतीयांची श्रद्धा नव्हती.

निर्मिती आणि विनाश हे दोन्ही अनुस्यूत असलेल्या **महाप्रचंड ब्रम्हांड** (COSMIC) चक्रांचा पुराणातील कथा कथनामध्ये निर्देश केलेला आहे हे खरे आहे. परंतु ते चक्राकारी **बदल** हे सरळ रेषेत जाणाऱ्या काळात (Linear Time) होणारे आहेत. प्रमुख व महत्त्वाच्या तत्त्वज्ञानिय दर्शनांनी मांडलेल्या 'काल' विषयक वेगवेगळ्या सिद्धांतातील तपशीलाना **ब्रम्हांडी चक्रांच्या** प्रकल्पनेकडून आकार प्राप्त झालेला नाही.

**दोन** भारतीय तत्त्वज्ञ काल-चक्राकार आहे यावर श्रद्धा ठेवतात असे मानले तरी त्यातून भारतीय अनैतिहासिकतेचे स्पष्टीकरण कसे मिळेल ते स्पष्ट होत नाहीच. ते काहीही असो. ग्रीक-तत्त्वज्ञांपैकी अनेकांची **काल-चक्राकार** आहे या संकल्पनेवर श्रद्धा होती. असे होते तरी ग्रीकांनी 'इतिहास' हा विषय विकसित केला होताच. याशिवाय यानंतरच्या कालात 'काला'कडे बघण्याचा पाश्चिमात्य दृष्टीकोन दोलायमान अवस्थेत होता. सुटलेला बाण आणि चक्र या रुपकांपैकी कोणते स्विकारायचे याबद्दलची पाश्चिमात्यांची वृत्ती दोलायमान होती. परंतु या अशा परिस्थितीतही 'इतिहास' या विषयाचा झालेला विकास हा त्या संस्कृतीशी मिळता-जुळता ठरलेला आहे.

काल ही **माया** आहे अशी भारतीयांची श्रद्धा होती या प्रकल्पनेस आवाहन करून भागणार नाही. **फक्त** अद्वैत वेदांत ही भारतीय तत्त्वज्ञान शाखा ही सरतेशेवटी **'काल'** ही **'माया'** आहे हे मान्य करते. परंतु कालाबरोबर विश्वातील बाकीची राहिलेली सर्व तत्वज्ञाने अनुभवजन्य व्यवस्था ही देखील **'माया'** आहे हेही मान्य करते याचा विसर पडू नये. तथापि भारतीय तत्त्वज्ञांपैकी बहुतेक तत्त्वज्ञ काल 'माया' आहे (सत्य नाही) हे स्पष्टपणे नाकारतात. ते काहीही असो. ख्रिश्चन धर्माच्या सुरुवातीचा काल आपणास असे दाखवून देतो की, 'काल' 'माया' आहे (सत्य नाही) ही श्रद्धा इतिहास या विषयाच्या विषयी असलेल्या अगदी प्रखर जाणीवेशी मिळती-जुळती आहे. उदा. ऑगस्टीन आणि इतर धर्मशास्त्रज्ञ (Theologions) यानी नव-प्लेटोवादाच्या प्रभावाखाली, अस्तित्वाच्या अत्यंत उच्च पातळीवरून 'काला'ला वगळले होते. त्याजबरोबर मुक्तीशास्त्र तत्वज्ञानाने (SOTERIOLOGY - DOCTRINE OF SALVATION) कालाची लक्षणियता एक मानसशास्त्रीय वास्तव या स्वरूपात नवप्लेटोवादात स्वीकारली होती.

येथवर केल्या गेलेल्या सुचनापेक्षा वेगळी, आपल्या विवेचनाशी सुसंबद्ध असलेली आणखी एक सूचना आहे. या सुचनेनुसार **'अधिकार'** अशा काही निश्चित तत्त्वज्ञानिय संकल्पनेनुसार वैदिक साक्षात्काराच्या अनुषंगाने (Revelations) कालविरहीत भारतीय अनैतिहासिकता अधिक चांगल्या प्रकारे सांगता येते. **मीमांसा** या दर्शनाच्या तत्त्वज्ञांच्या मते, वेदांचा जो **अधिकार** आहे त्यानुसार संहिता ही अपौरुष आणि कालविरहीत असणे जरूरी आहे. या संहिता अपौरुष असतात याचे कारण त्या जर तशा नसत्या तर त्या सदोष असण्याचा संभव असतो. आपणास परिचित असलेल्या दुसऱ्या अनेक संहिता आहेत,

त्यांचा लेखक ज्ञात असतो. त्या सदोष असण्याचा संभव नेहमीच असतो. अपौरुष संहिता कालाविरहीत आहेत याचे कारण त्याना उद्‌गम नाही आणि आपल्या स्वत:च्या संबंधाला त्या कोणत्याही ऐतिहासिक व्यक्तिचा संदर्भ देत नाहीत. वेद हे कालाविरहीत आहेत. या संकल्पनेबरोबर, वेदांच्या अधिकाराला सर्वसामान्य कर्मठ (Orthodox) ब्राम्हण वर्गाची जी बांधिलकी असते. तिची सांगड **शेल्डॉन पोल्लाक** (SHELDON POLLOCK) घालू इच्छितात. या मिलनाने, आपणास वेद-सदृष्य (Quasi-veda) संहितेची प्रतिष्ठा आहे असा दावा करण्याचा संभव असलेल्या अन्य कोणत्याही ज्ञान शाखेची जागा घेतलेली नाही. महाकाव्यातील इतिहास हा इतिहास मानला जातो. याचे कारण वेदापासून त्या इतिहासाला **'अधिकार'** प्राप्त झालेला आहे. परंतु धर्मातीत (Secular) इतिहासाला हा **'अधिकार'** नाही आणि या कारणामुळे सांस्कृतिक कार्यक्रम पत्रिकेतून या विषयाला 'खो' मिळाला होता.

परंतु हा सिद्धांत अजिबात पटणारा नाही. **(एक)** बुद्ध आणि जैन या दोन्ही धर्मांनी वेदाचा **'अधिकार'** नाकारलेला आहे. तसेच ते धर्मही इतिहासाला फारसे महत्त्व देत नव्हते. या वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण **पोल्लाक** यांच्या सिद्धांताद्वारे मिळत नाही. **(दोन)** मीमांसा या दर्शनाने (Revelation) साक्षात्काराच्या संदर्भात जे सांगितले आहे, त्याच्या प्रभावाबद्दल हा सिद्धांत अतिशयोक्ती करीत आहे. खरे म्हणजे (Revelation) साक्षात्काराच्या संदर्भात अनेक कर्मठ हिंदु दृष्टीकोन उपलब्ध आहेत. **मीमांसा** दर्शनाने सादर केलेला वृत्तांत हा त्यापैकी एक आहे एवढेच. उदा. **'न्याय'** या दर्शनाने दिलेल्या वृत्तांतानुसार सर्वसाक्षी आणि विश्वसनीय ईश्वर हाच मुळी वेदांचा निर्माता आहे. हे असे असल्याकारणाने, त्यांच्या विश्वसनीयतेबद्दल खात्री देता येते. याहीपुढे जाऊन **'न्याय'** हे दर्शन असा दावा करते की वेद 'अमर' नाहीत, याचे कारण प्रत्येक नव्या विश्व (WORLD) चक्रात ईश्वर त्यांची नव्याने निर्मिती करतो. **'सांख्य'** या दर्शनाचे आणखीनच वेगळे सांगणे आहे. या दर्शनानुसार वेद हे अपौरुष आहेत, म्हणूनच इतर नैसर्गिक उत्पत्ती (Products) प्रमाणे ते न-अमर (Non Eternal) आहेत. वेदात्यांची अशी श्रद्धा आहे की, वेद हे अपौरुष आहेत, परंतु सरतेशेवटी ते सत्य व अमर नाहीत. फक्त ब्राम्हण तसे असतात. एवंच वेदांना आरंभ नाही, अमर आहेत आणि ते कालाविरहीत आहेत का? याबद्दल हिंदु तत्त्वज्ञानात सर्वसाधारण स्वरूपाची अशी सहमती व एकवाक्यता नाही.

आदर्श मानव हा कालाबाहेर (Outside TIme) असतो. या भारतीय श्रद्धेला आवाहन केले तर? या प्रकारच्या तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरण घटना (Explanans) बाबत विद्यमान भारतीय तत्त्वज्ञ **जितेंद्रनाथ मोहंती** यांनी विशेष करून एक स्पष्ट व ओघवते स्पष्टीकरण सादर केले आहे.

*'इतिहासाच्या भानाला आवश्यकता कशाची असेल तर ती जाणिवेच्या ऐतिहासिकतेला (Historicity) मान्यता मिळण्याची. आता सर्वसाधारण हिंदु विचारात जाणीव ही बदला*

*पलीकडे आहे (Above Change). . . जाणीव ही कालिक आहे (Temoprality) (ती कालौघात बदलते) हा सिद्धांत स्वीकारला म्हणजे मग 'आत्मा' अगर 'स्व' – ही संकल्पना त्याज्य ठरविणे अपरिहार्यपणे आवश्यक होऊन बसेल. परंतु आत्मा हे हिंदु विचारात सर्वत्र आढळणारे वैशिष्ट आहे. इतिहास या विषयाबद्दल अत्यंत गंभीर असे तत्वज्ञानिय स्वरूपाचे कर्तव्य असण्यास आत्म्याकडे अशी कालिकता हे आवश्यक गृहीतक आहे.*

आणखीही एका ठिकाणी 'कालिक अशी जाणीव' या प्रकल्पनेबद्दल त्यानी विस्ताराने लिहिले आहे. "जी जाणीव कालिक आहे आणि इतिहास असलेली आहे. ती जाणीव उद्दिष्टे बाळगणारी असते (Intentionality) वस्तुस्थिती अशी आहे की जाणिवेची कालिकता आणि उद्दिष्टे बाळगणे ही प्रकृती हे एकाच घटीताचे दोन पैलू आहेत. जी जाणीव इतिहासाच्याही वर (Suprahistorical) असते ती पारदर्शक व स्वयंप्रकाशी असते."

'स्व' ची प्रकृती काय आहे याबद्दल कितीही मतभेद असले तरी 'आत्मा' आणि स्वतःच्या 'सत्य' 'स्व'वर पुन्हा एकदा ताबा मिळविणे हा मुद्दा सर्वच हिंदु तत्त्वज्ञानिय दर्शनात समान आहे. मोक्षाच्या कल्पनेतही काही विशिष्ट अर्थाने तो मुद्दा अंतर्भूत आहे. याशिवाय अनेक हिंदू तत्त्वज्ञ (अर्थात यात सर्वांचा समावेश नाही हे ओघानेच आले) 'आत्मा' या संकल्पनेचा संयोग शुद्ध-न-उद्दिष्टात्मक जाणीवा याबरोबर करतात. याला लक्षणिय अपवाद **रामानुजांचा.** हे तत्त्वज्ञ जाणिवेच्या न-विलोपनात्मक (Irreducible) उद्दिष्टतेवर ठोसपणे भर देतात. एवंच व्यापक दृष्टीने पहाता जाणिवेला उद्दिष्टतेची असलेली आवश्यकता आणि 'स्व'चे कालिकत्व या दोन्ही गोष्टी अनेक हिंदु नाकारतात हे सत्य आहे. परंतु प्राचीन भारतीयांच्या अनैतिहासिकतेबद्दलचे एक सर्वसाधारण स्पष्टीकरण या स्वरूपात या सिद्धांतात दोन चार महत्त्वाच्या अडचणी शिल्लक राहतातच.

**एक** या सर्व विवेचनात भारतातील बुद्धधर्म नीट बसत नाही. बुद्धधर्म हा आत्म्याचे अस्तित्व नाकारतो. हे जगतविख्यात आहे. परंतु बुद्ध धर्मिय देखील हिंदु धर्मिया इतकेच अनैतिहासिक आहेत. **जितेंद्रनाथ मोहंती** या तत्त्वज्ञाने हा असा आक्षेप घेतला जाईल अशी अपेक्षा केली होती. (यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही) या आक्षेपास उत्तर देण्याचा त्यानी प्रयत्न केलेला आहे.

*बुद्ध धर्मातही 'प्रक्रिया' ही संकल्पना विस्तारित करून ती 'जाणिवे'पाशी नेलेली आहे. परंतु ही प्रक्रिया ही उत्स्फूर्त क्षणांची एक मालिका या स्वरूपात कल्पिलेली आहे. **'निर्वाणा'** बरोबर ही मालिका व प्रवाह थांवतो आणि अत्यायि (Transcended) होतो. मोक्ष हा जितका इतिहासापलीकडे आहे. तितकेच **निर्वाणही** आहे आणि म्हणूनच इतिहासातील इतिहासाचे कर्तृत्व या स्वरूपात त्याची कल्पनाच करता येत नाही.*

बुद्धधर्मियांच्या **'निर्वाणा'**चे हे अत्यायिवादी भाष्य, हे टिकात्मकदृष्ट्या तसे विकल्प (Dubious) निर्माण करणारे आहे. निदान **महायानांच्या** दृष्टीने नागार्जुन यांनी **निर्वाण** आणि

**संसार हे** एकरूप (Identification) आहेत असे सांगितले आहे. त्यांचे हे विधान चांगलेच महशूर आहे. पण त्या विधानाचा अत्यायिवादी भाष्याशी मेळ घालता येत नाही. **निर्वाणाच्या** सीमा या **संसाराच्या** सीमा आहेत. या दोन्ही संकल्पनामध्ये काहीही अगदी पराकोटीचा असा बारीकसाही फरक नाही. याशिवाय भारतीय बुद्धधर्मिय तत्त्वज्ञानात न-उद्दिष्ट्यात्मक जाणीवेचे (Non intentional) म्हणजेच शुद्ध, आशयहीन घटनांचे अस्तित्व मान्य केलेले नाही. म्हणूनच तत्त्वज्ञ मोहंती यांच्या सिद्धांतानुसार, बुद्धधर्मियांनी-(हिंदु तत्त्वज्ञानानुसार नाही) 'इतिहास या विषयासंबंधी एक गंभीर असे तत्त्वज्ञानीय कर्तव्य' विकसित न करण्यासाठी तसे काहीही कारण नव्हते. परंतु या धर्मियानी ते केले नाही याचे स्पष्टीकरण **जितेंद्रनाथ मोहंती** यांच्या सिद्धांतात अर्थातच मिळत नाही.

**(दोन) ब्रम्हांडी** (COSMIC) इतिहसाची जी चक्रे आहेत. त्यासंबंधी हिंदुचे काही सिद्धांत आहेत. या सिद्धांतात जो नैतिक गर्भितार्थ आहे आणि त्याचे जे महत्त्व आहे त्याला तत्त्वज्ञ **मोहंतीची** स्पष्टीकरण घटना (explananas) न्याय देत नाही. हिंदुच्या सिद्धांतानुसार जागतिक ऐतिहासिक प्रकियांच्या प्रचंड चक्रांची विभागणी चार पुन्हा पुन्हा येणाऱ्या युगात करण्यात आलेली आहे. यापैकी पहिले **कृत युग**. या युगात **'धर्माचे'** राज्य असते. त्याच्या पाठोपाठ **त्रेत** आणि **द्वापारयुगे** येतात. या युगात धर्माचा अंमल दिवसेंदिवस कमीकमी होत जातो. सरतेशेवटी हे **धर्माचे** राज्य इतके अवनत होत जाते की चौथ्या म्हणजे **कलियुगात** ते पार नाहीसे होते. यानंतर पृथ्वीचा अंत होतो आणि ब्रम्हांडी चक्राच्या एका नव्या आवर्तनाला पुन्हा सुरुवात होते. बुद्ध धर्मिय याच प्रकारची चार युगांचे **ब्रम्हांडशास्त्र** (Cosmoloay) स्विकारार्ह मानतात. जैन धर्मियांनी या युगांची संख्या दोनवर आणून तशाच व्यवस्थेचा स्वीकार केलेला आहे. चक्राप्रमाणे एकामागून एक येणारे युगांचे आगमन हे **केवळ यांत्रिक स्वरूपाचे नाही** हे लक्षात घेतले पाहिजे. त्याला एक **नैतिक** असा पैलूही आहे. मानवाकडून होणाऱ्या कृतीमुळे नैतिक राजवटीत होणारा चढ-उतार हा ते ते युग अवतरण्यातून प्रतिबिंबित होतो. आम जनतेची प्रकृती काय आहे आणि त्यांची कृती कोणत्या प्रकारच्या आहेत, आणि धर्मानुसार वर्तन होते की नाही यावर कोणते युग नेमके कोणत्या क्षणी अवरणार हे ठरते.

चार्वाकांच्या जडवादी दर्शनाच्या प्रभावाचा काल तसा फारच अल्प होता. पण बाकीचे सर्व अभिजात तत्त्वज्ञानी, मोक्ष हे अंतिम मूल्य या विचाराशी सहमत होते. परंतु **'धर्म'** या विचारालाही मूल्य आहे, या विचारशी कर्मठ हिंदु तत्त्वज्ञाची बांधिलकी होती. तथापि धर्माला योग्य कृतीशी कर्तव्य असल्याकारणाने ते कालिक (Temporal) स्वरूपाचे मूल्य आहे आणि मोक्ष हे उघडउघड एक नकालिक (A Temporal) स्वरूपाचे उद्दिष्ट आहे. म्हणूनच या दोन मूल्यात तणाव आहे हे सकृत दर्शनी तसे दिसून येते. **धर्माचे मोक्षाबरोबरचे** संबंध या प्रश्नावर हिंदु तत्त्वज्ञानानी वेगवेगळ्या प्रकारच्या प्रतिपादनांचा पुरस्कार केलेला आहे ही



अनुक्रमणिका

वस्तुस्थिती आहे. धर्मशास्त्र आणि महाकाव्ये यात सर्वात ज्या जुन्या परंपरा ग्रथित झालेल्या आहेत, त्यानी धर्म आणि मोक्ष यांचे संबंध हे आवश्यकपणे अतूट आहेत असा दावा केलेला आहे. निष्काम व नि:स्वार्थ अशा वृत्तीने धर्माचरण केले की त्याची परिणती 'मोक्ष' मिळविण्यात होते असे त्या जुन्या परंपरा सांगतात. शांकर आणि वेदांती यांची नावे एका सर्वस्वी वेगळ्या परंपरेशी निगडीत आहेत. ही परंपरा धर्म आणि मोक्ष यात स्पष्टपणे व धारदारपणे विरोधी आहे या विचारावर भर देते. परंतु असे असले तरी धर्माचे महत्त्व या परंपरेला ही मान्य आहे. मोक्ष मिळविण्याचा हक्क जे कोणी **अधिकारी** या पदास पात्र झाले आहेत त्यानाच आहे. पण **अधिकारी** व्यक्तिचा नैतिक विकास होण्याच्या कामात, **धर्माची** मशागत करणे ही पूर्वअट आहे, असे त्याही परंपरा मानतात. एवंच (Timeless) कालविरहीत असे मोक्ष हे उद्दिष्ट, धर्म या कालिक स्वरूपांच्या उद्दिष्टपासून सहजपणे वेगळे करता येत नाही. **धर्म** ही संकल्पना **ब्रम्हांडी** चक्राचा जो हिंदु सिद्धांत आहे त्याचा अविभाज्य असा भाग आहे. (कॉस्मिक) **ब्रम्हांडी** इतिहासाच्या सिद्धांताच्या पार्श्वभूमीला हिंदु तत्त्वज्ञानीची जी बांधिलकी आहे, त्याकरवी हिंदु तत्त्वज्ञ जाणिवेला परिणामकारकपणे कालिक स्वरूप देतात, ते या अर्थाने – **मोहंतीना** मान्य आहे त्यापेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात हे घडते एवंच तत्त्वज्ञानिय स्पष्टीकरण घटनाना जो भेदाभेद आवश्यक आहे, तो खरोखरच अस्तित्वात आहे का हे स्पष्ट नाही.

**'काल'** ही संकल्पना अगर कालातीत **'स्व'** ही संकल्पना, यांच्याबद्दल मुळातील भारतीय तत्त्वज्ञानीय सिद्धांतामध्ये अनैतिहासिकतेच्या घटीताबद्दल पुरेशा स्पष्टीकरण घटना सापडणारा नाहीत असे दिसते. माझी स्वत:ची या संदर्भात एक वेगळीच सकरणात्मक सूचना आहे. भारतीय अतिभौतिकीत या तत्त्वज्ञानिय स्पष्टीकरण घटना न आढळता त्या अभिजात भारतीय ज्ञानशास्त्रीय (Epistemology) तपशीलात सापडण्याचा अधिक संभव आहे. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास भारतीय तत्त्वज्ञांची **'ज्ञान'** याविषयीची संकल्पना, इतरांपेक्षा वेगळी आहे. या संकल्पनेमुळे इतिहास या विषयाला भारतीय फारसे महत्त्व देत नाहीत. ते इतिहास आणि स्मृती व स्मरणे याना **'ज्ञाना'ची** प्रतिष्ठा देण्यास नाकारतात. या विधानाचा पडताळा घ्यावयाचा असेल तर **'ज्ञाना'ची** प्रकृती काय आहे या संबंधातील भारतीय तत्त्वज्ञानिय विचारांची जी पार्श्वभूमी आहे, ती समजावून घेण्याची आवश्यकता आहे. म्हणजेच भारतीय ज्यास **प्रामाण्यवाद** म्हणतात. त्या संबंधीचा त्यांच्या तत्त्वज्ञानीय परंपरेतील तो भाग समजावून घेणे जरूरी आहे.

५

अभिजात भारतीय तत्त्वज्ञानातील **'ज्ञाना'बद्दलचा** सिद्धांत **'प्रामाण्य'** हे केंद्र मानून त्याच्या अवती-भोवती सिद्ध झालेला आहे. भारतीय **'ज्ञान'** शास्त्रात **प्रमाणे** हे ज्ञानाकडे घेऊन जाणारे **मार्ग** आहेत. आलोकन, निष्कर्ष आणि पुरावा या साधना करवी **ज्ञानाची** प्राप्ती

होते. **प्रमेये** हे ज्याचे **'ज्ञान'** करून घेता येईल आणि ज्यांचे **'ज्ञाना'त्मक** आलोकन करता येतील असे घटक आहेत. या घटकापासून विश्व तयार होते. **प्रमा** ही एक ज्ञान घटना आहे. या अशा **'ज्ञाना'त्मक** घटना आणि त्यांचे **प्रमेय** (हा विषय) या दोघांच्यातील संबंध हे **प्रमाणानी** संरचित होतात. **'ज्ञान'** मिळविण्याचा, **'ज्ञाना'कडे** घेऊन जाणारा एक मार्ग आणि **'ज्ञाना'संबंधी** दावा करण्यास ज्यास अधिकार आहे असा स्त्रोत, या दोन्ही गोष्टी **प्रमाण्या** कडून प्राप्त होता. हेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास **प्रमाणांची** प्रकृती दुहेरी आहे. एकीकडे ती पुरावा प्राप्त करून देतात, पण त्याज बरोबर त्या कारण परिणात्मकही आहेत.

एखादी आलोकन घटना, ही **'ज्ञान'** घटना म्हणून समजली जाण्यासाठी **प्रामाण्य,** पुरावा अथवा समर्थन उपलब्ध करून देते. पण त्याजबरोबर तो अशा घटनेकडे घेऊन जाणारा अत्यंत कार्यक्षम असा कारण परिणात्मक मार्ग आहे असे समजले जाते. एवंच **प्रामाण्ये** सिद्धांत हा एकीकडे **'ज्ञाना'त्मक** समर्थन देण्याचा सिद्धांत आहे. त्याचवेळी तो अशा प्रकारच्या समर्थनाच्या सतत्येसाठी आवश्यक असलेल्या कारण परिणात्मक गरजांचा अतिभौतिकी सिद्धांतही आहे. **प्रामाण्ये** ही केवळ समर्थन पद्धती नाही. कारण परिणाम साखळी आणि समर्थन साखळी ही एकमेकांना अनुरूप करून देण्याचीही **'प्रामाण्ये'** ही पद्धती आहे. **'ज्ञाना'च्या** अधिकाराचा दावा पडताळून पहाण्यासाठी ही अशी अनुरूपता असणे आवश्यक असते.

**'ज्ञान'** घटनांची म्हणजे **प्रामाण्यांची** वैशिष्टे प्रदर्शित करणारी त्यांची एक प्रकृती आहे. ती म्हणजे सत्य, याविषयी भारतीय तत्त्वज्ञानांतील सर्व दर्शनांची एकवाक्यता आहे. काही दर्शनानी सत्याव्यक्तिरिक्त आणखीही काही अटी आवश्यक आहेत असे सांगितले आहे. यात नाविन्य (Novelty) या घटकाचा समावेश आहे. आलोकन आणि निष्कर्ष ही **प्रमाणे** आहेत हे सर्व भारतीय तत्त्वज्ञान दर्शनांना मान्य आहे. अपवाद फक्त चार्वाकांचा. जवळजवळ सर्व हिंदु तत्त्वज्ञ (अगदी अलीकडच्या काळातील वैषेशिक वगळून) हे सत्य आणि नाविन्य याच्याबरोबर 'शब्द' (Testimony) या अटीची भर मोठ्या खुषीने घालतात. परंतु यातील एकही तत्त्वज्ञानीय दर्शन स्मरण वा स्मृती हे **'ज्ञान'** मिळविण्याचे एक साधन या स्वरूपात, यावर उल्लेखिलेल्या यादीत स्मवण / स्मृती ची भर घालू इच्छित नाहीत. प्राचीन भारतीयांचा इतिहासाकडे पहाण्याचा जो दृष्टीकोन आहे, त्याच्याशी ही स्मरणे / स्मृतीना वगळण्याची कृती विश्वसनियपणे संबंधित आहे. या विषयाबाबत आपली जी भूमिका आहे त्याचे समर्थन करण्यासाठी, भारतीय तत्त्वज्ञानानी उपयोगात आणलेल्या युक्तिवादाचा विचार करणे फलदाई ठरेल.

मुलतः तीन कारणासाठी **'स्मृती'** ही **प्रमाणातून** वगळण्यात आलेली आहे. याचा अर्थ सर्वच भारतीय तत्त्वज्ञ ही तीन कारणे, व त्यात अनुस्यूत असलेले युक्तिवाद वा समर्थन स्विकारार्ह मानतात असे नाही. **एक स्मृती** पासू·ı नव्या **'ज्ञाना'ची** प्राप्ती होत नाही. **स्मृती**

जुन्याच्र **'ज्ञाना'ला** उजाळा देतात, नवजीवन देतात (REVIVE) खरे **ज्ञान** हे 'सत्य' **(प्रमा)** असले पाहिजे तसेच ते नवीन – **अनधिगत** – असले पाहिजे. **दोन** एक सत्य 'ज्ञान' घटना ही आपल्या विषयांशी (यात वस्तू व गोष्ट ही दोन्ही देतील) अगदी तंतोतंत जुळते, या गुणासाठीच ती सत्य असते. परंतु स्मृतीने प्रकट केलेला हा 'विषय' हा इत:पर तसा प्रत्यक्षात अस्तित्वात नसतो. ज्या विषयाचे स्मरण केले जाते, ते मुळात सादर केलेला विषय (वस्तू / गोष्ट) नसते. ती स्मृती मुळातील विषयाचा प्रतिनिधी असते. **तीन 'प्रमाणा'ला** आपला विषय स्वतंत्र्यपणे **'ज्ञात'** करून घेण्याची क्षमता असली पाहिजे. परंतु गत अनुभवाच्या छटांच्या वा स्मरणांच्या द्वारा स्मृती आपला विषय उलगडून दाखविते (Reveal), नाविन्य, तुल्ययोगीता (Correspondence) आणि स्वातंत्र्य या तीन अटी एकत्रितपणे आणि एकटेपणानेही एक **'ज्ञान'** मिळविण्याचे साधन या स्वरूपात स्मृतीला हद्दपार करतात, असा युक्तिवाद करण्यात येतो. या तीन अटी अनेक प्रकारे आवाहन करतात. हे आवाहन अशा प्रकारे केले जाते की त्यायोगे स्मृती-अनुभव हा सादर करता येईल असा आलोकीत्वी (Coqnition) अनुभव ठरेल. खरे **'ज्ञान'** हा प्रत्यक्ष अनुभव आहे, ते प्रतिनिधी नाही हे गृहीत धरलेले असते.

हिंदु तत्त्वज्ञानानी स्मृतीला **प्रमाणाची** प्रतिष्ठा दिलेली नाही असे आहे तरी शब्दाला (TESTIMONY) प्रतिष्ठा असल्याचे जवळजवळ सर्वांनाच मान्य होते. ही जी सुट देण्यात आली होती ती इतिहास विषयक ज्ञानाला का देण्यात आली नाही ते ज्ञानही सत्यता–यर्थाथता (Validity) मिळवून देते, असे का वाटले नव्हते? थोडक्यात ते तसे का होते हे अशा प्रकारे सांगता येईल. त्याचे कारण असे होते की नाविन्य आणि स्वातंत्र्य या **'ज्ञाना'वर** घातलेल्या अटीमुळे शब्दाची व्याप्ती फारच मर्यादीत झाली होती. ती इतकी मर्यादीत झाली होती की, इतिहासविषयक **'ज्ञान'** हे सर्वसामान्यपणे बहुतांशाने एका खऱ्या अस्सल स्वरूपाचा 'शब्द' या स्वरूपात स्विकारार्ह नव्हते.

कर्मठ हिंदू तत्त्वज्ञांच्या दृष्टीने **शब्दप्रामाण्य** या संज्ञेला एक खास व विशेष असा गर्भितार्थ होता, याचे कारण वेदांना पवित्र-धार्मिक ग्रंथाचे **अधिकार** आहेत या मुद्याचे समर्थन करण्याचा तो एक मार्ग आहे असे समजले जात होते. **मीमांसा** आणि **अद्वैत वेदांत** यासारख्या तत्त्वज्ञानी दर्शनांनी **शब्दप्रामाण्यचा** अर्थ पवित्र धार्मिक ग्रंथाना असलेला **अधिकार** असाच घेतला जातो, परंतु दुसऱ्या काही दर्शनांच्या दृष्टीने परिस्थिती वेगळी होती. **अलौकिक** ज्यास अनुभवाची जोड नाही अशा बाबतीतच 'शब्दा'च्या **अधिकाराची** कक्षा मग मर्यादीत आहे असे ही दर्शने मानीत. म्हणून पवित्र धार्मिक ग्रंथाना सर्वसामान्य बाबतीत सामान्य अनुभवाशी मतभेद व त्याला विरोध दर्शविता येत नाही. अर्थात हा अशा प्रकारच्य अनुभवजन्य पुरावा अंतर्गतपणे सुसंवादी (Consistent) असला की मग ज्ञानाच्या बाबतीत आवश्यक असलेल्या एका अटीची सहजपणे पूर्तता होते. हा अनुभव मतभेद व विरोध

यापासून मुक्त असतो, तो **अबाधित** असतो. या अशा प्रकारे जो पुरावा समजावून घेतलेला आहे, त्यांच्याकडून नाविन्य आणि स्वातंत्र्य या **'ज्ञाना'च्या** बाबतीत ज्या दोन पूर्वअटी आहेत त्यांची सुद्धा पूर्तता होते. ही अशी 'शब्द' याविषयीची जी संकल्पना आहे, त्यासाठी पुरावा या स्वरूपात इतिहास पात्र ठरणार नाही; हे त्याहूनही अधिक स्पष्ट व उघड आहे.

परंतु **शब्दप्रामाण्य** याविषयी हिंदुचा हाच एक दृष्टीकोन आहे असे नाही. 'ज्ञाना'चा एक मार्ग या स्वरूपात **'शब्दप्रामाण्य'**, **न्याय** हा दर्शनाने स्विकारलेला आहे. असे करताना त्या दर्शनाने **'ज्ञाना'**ची व्याप्तीही मर्यादीत केली आहे. एखाद्या विश्वसनिय तज्ज्ञाकडून **(आप्ताकडून)** जे शाब्दिक **'ज्ञान'** मिळते. तेवढीच **'ज्ञाना'ची** व्याप्ती आहे असे **'न्याय'** या दर्शनाचे सांगणे आहे. शाब्दिक प्रामाण्य दोन प्रकारचे असते. **एक** ज्या विषयांचे आलोकन करता येते, त्याच्याशी ते संबंधित असते. **दोन** ज्या विषयांचे आलोकन करता येत नाही त्याच्याशी संबंधित असते. वेद हे फक्त या दुसऱ्या प्रकारच्या विषयाशी संबंधित आहेत. फक्त त्याच्याशीच त्याना कर्तव्य आहे. एखादा विश्वसनीय तज्ज्ञ एखादा ऋषी हे त्याचे जनक असल्याकारणाने त्याना **'अधिकार'** प्राप्त होतो. विकसित **न्याय** दर्शनात ऋषीच्या जागा **ईश्वरही** घेतो. तथापि ज्या विषयांचे आलोकन करता येते त्याला स्वत: अशा कक्षेत सर्वसामान्य अशा शब्द-प्रामाण्याला-तो शब्द विश्वसनिय तज्ज्ञाचा असला तर **'आधिकार'** आहे. याबाबतीत जुने **न्याय** दर्शन चांगलेच सैल (Permissive) आहे. हा असा **अधिकार** फक्त ऋषीलाच असला पाहिजे असे नाही, तो **म्लेंच्छ** असला तरी चालेल असे **वात्सायनाने** म्हटलेले आहे.

परंतु इतर हिंदु तत्त्वज्ञानानी **'न्याय'** या दर्शनाच्या सर्वसाधारण भूमिकेवर वाढत्या प्रमाणात हल्ला केला होता. वेदांच्या अधिकाराला योग्य न्याय मिळेल अशी खात्री देण्यात **न्याय** या दर्शनाला अपयश आले आहे हे त्या हल्ल्यामागचे कारण होते. ज्याचा वा जीचा शब्द हा **'ज्ञाना'**चा स्त्रोत समजला जावा असा हा / ही **'आप्त'** कोण हे अगदी नेमकेपणाने 'चक्राकार' युक्तिवाद न करता करण्यासाठी एकीकडे अद्वैती न्यायायिकावर दडपण आणती होते. (चक्राकार युक्तिवाद म्हणजे समजा **अ** चे कारण **ब** आहे, **ब** चे कारण **क** आहे, आणि **क** चे. कारण **अ** आहे. अशा प्रकारचा युक्तिवाद). पण त्याच वेळी दुसरीकडे **'ज्ञान'** हे स्वतंत्र्य आहे आणि ताबडतोबीचे आहे या अटी स्वीकारून न्यायायिकाने आपल्या स्वत:वर बंधने घालून घेतली होती. **वैदिक** आणि धर्मातीत असे **लौकिक** अशा दोन प्रकारे त्या शाब्दिक विधानात फरक करून, नंतरच्या काळातील न्यायायिकांनी आपल्यावर होणाऱ्या टिकेला प्रतिसाद दिला होता. **वैदिक** विधाने ही ईश्वराने केलेली असल्याकारणाने ती **'अधिकारी'**च आहेत. धर्मातीत **लौकिक** विधाने ही जरी **'आप्त'** म्हणजे एखाद्या विश्वसनिय व्यक्तीने केलेली असतील तरच ती **अधिकारास** पात्र असतात. **न्याय** दर्शनाने दोन विधानात केलेल्या या फरकामुळे ईश्वराच्या **अधिकाराची** खात्री देण्यात आली. त्यासाठी चक्राकार नसलेला युक्तिवाद न करता ती देण्यात आली. फक्त ईश्वराचे अस्तित्व त्यांनी

स्वतंत्र्यपणे सिद्ध केले म्हणजे काम भागणार होते. कारण परिणाम स्वरूपाची विधाने आणि ब्रम्हांडी स्वरूपांचा विधानांची फलटण उभारून त्यानी ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता, परंतु लौकिक स्वरूपाची सर्वविधाने ही **'अधिकारी'** नाहीत हे एकदा मान्य केल्यानंतर विधाने करणारा· पैकी कोणी **आप्त** आहे वा नाही यात फरक करण्यासाठी मापदंडाची आवश्यकता निर्माण होते. परंतु हे काम तितकंसे सोपे नाही. याचे कारण **'ज्ञाना'च्या** बावतीत तूल्ययोगीत्व (Correspondence) आणि स्वातंत्र्य, या दोन्हींही अटीची पूर्तता व्हावयास हवी. पण त्याजबरोबर आलोकना आणि निष्कर्ष यांनी गृहीत धरलेल्या विशिष्ट **प्रामाण्याची** धर्मातीत पुराव्यातील विश्वसनियता कमी होऊ द्यावयाची नव्हती. आपणास जो कोणी विधाने करीत आहे, त्याच्याविषयी काहीच माहिती नसेल तर मग विधाने करणाऱ्या या अनोळखी व्यक्तीच्या विधानाना आपसुखच **'शब्द'** प्रामाण्याचा दर्जा कसा प्राप्त होईल? त्या विधानाना ज्याना निवाडा करण्याचा अधिकार आहे असे कसे म्हणता येईल? हा असा अधिकार आहे असे म्हणणे हे निश्चितपणे जवळजवळ अशक्य कोटीतले आहे. एवंच अईथिया (AITHIYA) परंपरा याची व्याख्या 'ज्या विधानांच्या मूळ कर्त्याबद्दल माहिती नाही अशी करण्यात आली असल्याकारणाने या अशा परंपरेची गणना, एका वेगळ्या व विशिष्ट **'प्रामाण्यात'** झाली पाहिजे हा प्रस्ताव **'न्याय'** हे दर्शन त्याज्य ठरविते. परंतु हा नकार, म्हणजे इतिहास ही 'ज्ञान' प्राप्तीचा स्वतंत्र्य मार्ग आहे यासच नकार देण्यासारखे आहे.

**ज्ञान** हा अनुभव आहे ते प्रतिनिधी नाही त्या ज्ञानाच्या प्रकृतीविषयी भारतीयानी एक मुलभूत गोष्ट गृहीत धरलेली आहे, येथे केलेल्या सर्व प्रतिपादनाला आधारभूत अशी ती गोष्ट आहे याठिकाणी **प्रमा** या संस्कृत शब्दाला प्रतिशब्द म्हणून **'ज्ञान'** या शब्दाचा वापर करण्यात आला आहे. वास्तविक **प्रमा** म्हणजे ज्ञान-घटना एक 'जाणणे'. ज्ञानाची घटनात्मक प्रकल्पना, पाश्चिमात्य तत्त्वज्ञानातील ज्ञानशास्त्रज्ञांना सर्वस्वी अपरिचित नाहीत. पाश्चिमात्य ज्ञानशास्त्रज्ञानी स्वाभाविक प्रवृत्ती दर्शविणारा **'ज्ञान'** सिद्धांत पसंत आहे. या सिद्धांतानुसार **'ज्ञान'** हे सामर्थ्याचे प्रतिक दर्शक अशी **'ज्ञान'** घटना अगर सामर्थ्याची प्रत्यक्ष प्रचिती देणारी घटना यापेक्षा **'ज्ञान'** हेच सामर्थ्य, असे तो **'ज्ञान'** सिद्धांत सांगतो. परंतु भारतीय तत्त्वज्ञानातील **'ज्ञान'** शास्त्रात आलोकता आणि निष्कर्ष यांची प्रकृती केवळ 'घटना' स्वरूपाची नाही. परंतु भान देणारी **'ज्ञान'** देणारी घटना, या देखील भान अगर अनुभव आहेत. आलोकनात्मक अगर निष्कर्षात्मक प्रक्रियातून सरतेशेवटी प्राप्त झालेली ती निर्मिती असते. याशिवाय प्रत्येक **'ज्ञाना'त्मक** घटना, ही **'ज्ञान'** घटना असतेच असे नाही. फक्त ज्या **'ज्ञाना'**त्मक घटनाद्वारा **सत्याची** प्राप्ती होते, त्याच **'ज्ञान'** घटना असतात. म्हणजेच भारतीय ज्ञानशास्त्रज्ञांच्या दृष्टीने मग **'ज्ञान'** ही खास प्रकारची क्षणिक अशी मानसिक घटना आहे. एका विश्वसनिय कारण परिणाम या मार्गाने वस्तुस्थिती जशी आहे तशीच ती उलगडून दाखविणारी खरी **'ज्ञाना'त्मकता** असलेली मानसिक घटना **'ज्ञाना'ची** ही संकल्पना हो



अनुक्रमणिका

गृहीत धरल्यानंतर **'ज्ञाना'चे** स्रोत या स्वरूपात स्मरणे, स्मृती आणि इतिहास, त्यांच्याकडे घटनाच्या बाबतीत तांतडी नसल्याकारणाने या सर्व गोष्टी का वगळण्यात आल्या होत्या याचे कारण आपणास सहज दृष्टोपत्तीस येते.

प्राचीन भारतीयांची अनैतिहासिकता हे **'घटीत'** ही वस्तुस्थिती आहे. **'ज्ञाना'संबंधी** भारतीयांची जी संकल्पना आहे ती समजावून घेतली म्हणजे त्या घटीतासंबंधी एक अधिक विश्वसनिय तत्त्वज्ञानिय स्पष्टीकरण घटना आपणास सादर करता येते. उन्मेखून सांगावयाचे झाल्यास पुढील सिद्धांताचा उल्लेख करता येतो. अभिजात भारतीय **'ज्ञान'शास्त्रात 'ज्ञान'** काय? या विषयीचा सिद्धांत मुखर झालेला आहे. या सिद्धांतानुसार इतिहास हे खऱ्याखुऱ्या प्रकारचे **'ज्ञान'** नाही असे गर्भितपणे सुचित करण्यात आले आहे. प्राचीन भारतीय इतिहास या विषयाला महत्त्व देत नाहीत. त्याबद्दल त्याना त्याविषयी अनास्था का होती, याचे स्पष्टीकरण या सिद्धांताच्या प्रभावातून मिळते.

परंतु हे येथे सुचविलेले स्पष्टीकरण जर वाजवी असेल, तर आपणासमोर काही प्रश्न अगदी स्पष्टपणे राहूनच जातात. असे गृहीत धरू या **'ज्ञाना'संबंधी** जी तत्त्वज्ञानिय संकल्पना होती, तिच्या प्रभावामुळे भारतीय हे अनैतिहासिक होते. **'ज्ञाना'**च्या या संकल्पनेतून 'इतिहास' या विषयाला वगळण्यात आलेले आहे, असे जर असेल तर मग या सिद्धांतामुळे भारतीय इतके प्रभावित का झाले? त्यानी **'ज्ञाना'च्या** संकल्पनेत **'इतिहास'** समाविष्ट होईल अशा प्रकारे **'ज्ञान'** या संकल्पनेची नवी व्याख्या का केली नाही? इत्यादी प्रश्न लगेच उपस्थित होतात, या प्रश्नांच्या उत्तरासंबंधी काही अंदाज बांधता येतील एवढेच. हे उत्तर तसे विश्वसनिय असावेसे दिसते. या लेखाच्या सुरुवातीला या लेखात ज्या पद्धतीने युक्तिवाद करण्यात येईल त्यासंबंधी गृहीत धरलेली तत्त्वे नमूद करण्यात आलेली आहेत. आदर्शवत अशा पुरेशा स्पष्टीकरण घटनावर या तत्त्वांची बंधने व मर्यादा आहेत, असेही सांगितलेले आहे. या दोन्हीही गोष्टींचा पूर्तता या स्पष्टीकरणाने होते असा दावा करण्याचा इरादा नाही. अगदी नेमकेपणाने सांगावयाचे झाल्यास येथे व्यक्त केलेले अंदाज, हे प्रमुख भारतीय तत्त्वज्ञानिय संहिताशी मिळते-जुळते असले, **तरी त्या अंदाजाना अगदी उघडपणे असलेला पाठिंबा त्या एकाही संहितेतून काढून दाखविता येणार नाही.**

**'मोक्ष'** हे अंतिम मूल्य आहे. अशी भारतीयांची श्रद्धा आहे. या मूल्यांची भारतीय विचाराना फारच महत्त्वाची अशी पार्श्वभूमी आहे. येथे व्यक्त केलेले अंदाज या श्रद्धेला आवाहन करतात. दैनंदिन आयुष्य हे फारच असमाधनकारक आहे. दुःख व हालअपेष्टा या आयुष्यात सोसाव्याच लागत. हा अशा सोसण्यातून मुक्तता करून घेणे शक्य आहे आणि तशी मुक्ती करून घेण्याची मनिषाही आहे. या दोन्ही गोष्टी गृहीत धरून सर्वच भारतीय तत्त्वज्ञानिय दर्शनांचा आरंभ होतो. गुलामगिरीकडे, बंधनाकडे घेऊन जाणारी एक कारण – परिणामांची साखळी आहे. या साखळीत अज्ञानाचे अस्तित्व हा एक आवश्यक घटक आहे.

दु:ख व हालअपेष्टा सोसण्यापासून मुक्ती मिळेल याची खात्री या घटनामुळे मिळते. एवंच **'ज्ञान'** म्हणजे अज्ञानाचे अस्तित्व नसणे. **ज्ञान,** बंधनातून आपली मुक्तता करीलही **ज्ञानाकडे** ती क्षमता आहे. जवळजवळ सर्व भारतीय तत्त्वज्ञांची निदान या बाबतीत तरी सहमती आहे. मग त्यांचे या संबंधीच्या तपशीलाबाबतचे मतभेद काहीही व कितीही असोत. परंतु हे सारे गृहीत धरले की मग त्यातून **'ज्ञान'** याविषयीची एक विशिष्ट संकल्पना गर्भितपणे सुचित होते. ती संकल्पना म्हणजे जे **'ज्ञान'** मुक्ती प्राप्त करून देते ते **'ज्ञान'** प्रतिनिधिक स्वरूपाचे असण्यापेक्षा प्रत्यक्ष अनुभव या स्वरूपात असले पाहिजे. तसे जर नसेल (म्हणजे अनुभव म्हणजे ज्ञान) तर मग आपण अगोदरच **'ज्ञानी'** असतो, त्याचा अर्थ आपण केव्हाच मुक्त झालेले आहोत. (**सांख्य** आणि **अद्वैत** यासारखी दर्शने, एका अर्थाने आपण केव्हाच मुक्त झालो आहोत असा दावा करतात. परंतु ती दर्शने देखील हे नाकारत नाहीत की **आपण 'मुक्त' झालो आहोत यासंबंधी आपणास अजूनही ज्ञान झालेले नाही.** थोडक्यात या अशा प्रकारची मुक्ती करून देणारे **ज्ञान** हे या नंतरच्या **'ज्ञाना'संबंधीच्या** भारतीय सिद्धांताला पायाभूत असा आकृतिबंध बनते (PARADIGM). मोक्ष या आदर्शाचे मूल्य मोठे आहे हे गृहीत धरलेले आहे. ते इतके मोठे आहे की, त्यानंतर खऱ्याखुऱ्या **'ज्ञाना'त** गणना करून घेण्याकरिता दुसऱ्या कोणत्याही प्रकारचे **'ज्ञान'** (इतिहास या विषयाच्या ज्ञानासारखे) हे पुरेशा महत्त्वाचे ठरत नाही. याचे कारण मोक्षाला असलेल्या सर्वोच्च मूल्याचा, **खऱ्या ज्ञानाने** जसा पुरस्कार करावयास पाहिजे त्या प्रकारे ते करीत नाही. **ज्ञान** मिळविण्याचा एक मार्ग म्हणून गणले जाण्यासाठी इतिहास हा कमालीचा **अ महत्त्वाचा** आहे असे गर्भितपणे सुचन करणारी जी **'ज्ञाना' बद्दलची** संकल्पना आहे, त्याला भारतीय तत्त्वज्ञ पराकोटीच्या प्रमाणात जखडलेले होते हे त्याचे कारण आहे.

६

एवंच प्राचीन भारताला इतिहास नाही व भारतात 'इतिहास हा विषयच नव्हता ही गोष्ट सत्य नाही. त्याजबरोबर भारतात वैज्ञानिक इतिहास अगर विकसित इतिहासलेखनशास्त्र (Historiography) नव्हते. याबद्दल आश्चर्य करण्यासारखे काहीही नाही. प्राचीन भारतात इतिहासाला खरेखुरे **महत्त्व** देण्यात येत नव्हते हे सत्य तसेच आश्चर्य करण्यासारखेच आहे. तथापि या इतिहास विषयक घटिताबाबतचे समाधानकारक व पुरेसे तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरण आपणास कोठे गवसते? 'काल' आणि 'स्व' यांच्या संबंधीच्या जो अस्सल भारतीय सिद्धांत आहे व त्याचा जो प्रभाव होता, आणि त्यात जे आवाहन होते त्यात ते स्पष्टीकरण सापडणार नाही. त्याऐवजी कितीतरी अधिक तत्त्वज्ञानीय स्पष्टीकरणांना **अभिजात भारतीय ज्ञानज्ञानातील काही वैशिष्ट्यांना** ते आवाहन करते.

(हा लेख न्यूझीलंडमधील मॅस्सी विद्यापिठातील प्राध्यापक (ROY W. PERRETT) रॉय डब्लू. पेर्‌रेट्ट यांच्या लेखावरून तयार करण्यात आलेला आहे)



अनुक्रमणिका

# संगीत आणि मनोविज्ञान

## वास्तवापासून दूर

**– कै. श्री. ह. देशपांडे**

"स्वर्गलोकापासून प्राप्त केलेले आणि मानवाच्या दृढ परिचयाचे झालेले संगीत हे सर्वश्रेष्ठ लौकिक धन होय." **– जोसेफ ॲडसिन.**

संगीत आणि इतर कलांचा आस्वाद घेण्याची बाब आपल्या सामान्य जीवनव्यवहारापासून काहीशी बाजूला ठेवली जाते. त्याच्यासाठी आपण वेगळा वेळ काढून ठेवतो. आणि त्या आपल्याला हवे ते मिळते की नाही हे पाहण्यासाठी मैफिलीत आणि कलादालनांत हजेरी लावतो. अशिक्षित समाजात कलांचा संबंध सामान्य जीवनाशी अधिक जवळचा असतो. पाश्चात्य लोकांत मात्र त्यांचे विशिष्ट स्थान असून जीवनावश्यक समजण्यापेक्षा त्यांना ऐषारामाचे जणू स्वरूप येते. त्यामुळे संगीत आणि इतर कला या वास्तवापासून दूर किंवा त्याला पर्याय म्हणून त्यांना मानाव्या लागतील; असाही असमंजस दावा करणे शक्य होते. त्यातल्या ह्या निष्कर्षाशी माझा अर्थातच विरोध आहे. तथापि काही मनोविश्लेषण विशारदांनीहि तसेच मत मांडले असल्याने ते चुकीचे कसे आहे हे ठरविण्यासाठी त्यांचे विचार तपासणे गरजेचे वाटते. **फ्राईड** हा भरपूर वाचन केलेला असामी होता. त्याला साहित्याची चव होती. शाळेत असताना वर्गात ओळीने सहा वर्षे तो पहिला असायचा. त्याच काळात त्याचा लॅटिन आणि ग्रीक अभिजात वाङ्मयाशी परिचय झाला. त्याने हिब्रु, इंग्लिश, फ्रेंच, तसेच काहीसा इटालियन आणि स्पॅनिश भाषांचा अभ्यास केला होता. शेक्सपिअर आणि गोएथे हे त्याचे आवडते ग्रंथकार असत. पण डोस्टोएवस्की हा शेक्सपिअरच्या फारसा मागे नव्हता आणि त्याची 'बदर्स कॅरामॅझोव' ही कादंबरी उत्कृष्ट कलाकृती आहे असे त्याचे मत होते. तो स्वत: एक शैलीकार लेखक म्हणून मानला जात असे. आणि साहित्याबद्दल एकदा त्याला गोएथे पारितोषिक ही मिळाले होते. शिल्प आणि काहीशी चित्रकलेतही त्याला गती होती. मात्र एवढे खरे की संगीतात आपल्याला काही रस नाही अशी कबुली त्याने आपल्या 'मोझेझ ऑफ मायकेल ॲन्जेलो' या प्रबंधाच्या प्रस्तावनेत दिली आहे.

त्याचा पुतण्या हॅरी लिहितो – "संगीताचा त्याला तिटकारा वाटे आणि कामातील ती एक केवळ अडचण आहे असे समजत असे. तसे पाहिले तर सगळे **फ्राईड** कुटुंबच संगीताबाबतीत अरसिक होते."

असे वैगुण्य असूनही **फ्राईड** हा सुसंस्कृत गृहस्थ होता. आपल्याला आवडणाऱ्या कलावंत आणि लेखकांचे त्याला कौतुक वाटत असे. कलावंताविषयी त्याने केलेले



अनुक्रमणिका

मतप्रदर्शन हे प्रथमदर्शनी अप्रशस्त वाटले तरी ते त्याच्या मनोविश्लेषण विषयक उपपत्तीचे द्योतक आहे हे लक्षात आले म्हणजे त्याचे नवल वाटणार नाही.

उपद्रवी संवेदनापासून मुक्त व्हावे यासाठी माणसाचा जीव एकसारखा धडपडत असतो अशी **फ्राईडची** मूलभूत कल्पना आहे. ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणांत उल्लेख केल्याप्रमाणे, अशा बाह्य आणि आंतरिक संवेदनापासून सुटका करणारे मज्जासंस्था हे उपयुक्त साधन आहे असा विचार त्याने माडला आहे. ह्यावरून मग ठरते ते असे की कोणताही ताण नसलेली, शांत अशी मनाची अवस्था हीच आदर्श म्हणून म्हटली पाहिजे.

**फ्राईडच्या** म्हणण्याप्रमाणे अशा अवस्थेचा नमुना फक्त संतृप्त बालकांत मिळतो. आई आणि तिचे अपत्य यांच्या संबंधात दोन्हीकडून प्रेरणा, जागृती, आणि आल्हादकारक संमिलन आढळून येते. तथापि त्याच्या मनोविश्लेषणाने जागृतीच्या अवस्थेकडे दुर्लक्ष करून केवळ संमीलनावर भर दिला आहे. त्यामुळे त्याने कल्पिलेले निर्वाण हे अर्भकावस्थेत आईच्या स्तनातून, तारुण्यांत संभोगाने, आणि अखेरीला शांतीचे आगमन सुचविणारे कबरस्तान यातूनच लाभू शकते.

"आईच्या अंगावरचे बालक स्तनपान केल्यानंतर निद्रेच्या आहारी सुखाने जात असताना ज्यानी पाहिले असेल, त्याच्या गालावरील स्मित पाहिले असेल त्यांना हे चित्र त्याच्या पुढील उमेदीच्या वयातील कामतृप्तीची पुसटशी कां होईना जाणीव करून दिल्याखेरीज राहणार नाही.

कामवासनेच्या तृप्तीत स्त्रीपुरुषांच्या समाधानी जीवनाचा उग्दम असतो असे आपले मत **फ्राईड** एकसारखे मांडीत आला आहे. तरीसुद्धा कामवासनेचे संपूर्ण शमन होणे हे अवघड आहे असेही तो म्हणतो. आपली संस्कृतीच जुलूम करते, आणि व्यक्तिमात्रावर बंधने लादते. मग या संस्कृतीचे आदर्श पाळायचे म्हणून त्याला आपल्या कामवृत्तीचे रुपांतर कामविरहीत अशा छंदात करणे भाग पडते. पण हा केवळ उपद्रवापासून स्वत:ला सांभाळून घेण्याचा एक प्रकार, एक सोज्वळ पर्याय असतो.

अर्धवेड्या माणसाना कामोपभोगापासून संपूर्ण समाधान लाभत नाही. याचे कारण त्यांच्यात बाल्यावस्थेतले कामावशेष तसेच राहिलेले असतात; ते त्यांना कामक्रियेमधील प्रौढपणापर्यंत येऊन देत नाहीत. मग हे अवशेष त्यांच्या वेडेपणाच्या लक्षणांतून, स्वप्नांतून आणि आभासामधून प्रकट होतात.

"वास्तवापासून अर्धवेडे मागे फिरतात, कारण त्यांना ते संपूर्ण वा विभागश: सहन होत नाही."

आभास हा माणसाच्या स्वच्छंदवृत्तीतून उद्‌भवतो असे **फ्राईड** म्हणतो आणि दोन्ही-मधूनही वास्तव नाकारले जात असल्याने, अशा त्या बालिश क्रियातून बाहेर पडले पाहिजे असे त्याचे मत आहे. कलेचे सगळे प्रकार हे आभासावर आणि कलाकारांच्या कल्पकतेवर अवलंबून असल्याने कलाकार हे वेडसर माणसाच्या आसपास असतात असे **फ्राईड** म्हणत



अनुक्रमणिका

असल्यास नवल नाही.

"कलाकार हा मूलत: मनाने अंतर्मुख असून." वेडसरपणापासून फारसा लांब नसतो. सामर्थ्यावान अशा मूळच्या संवेदनानी तो अगोदरच गुदमरलेला असतो. त्याला लौकिक, सत्ता संपत्ती, आणि स्त्रियांचे प्रेम यांची हाव असते. पण त्या गोष्टी प्राप्त करून घेण्याची कुवत त्याच्यापाशी असत नाही. परिणामी तो इतर असंतुष्ट माणसांप्रमाणे वास्तवापासून तोंड फिरवतो. आणि आपल्या सगळ्या मनीषा आणि कामप्रेरणा आभासत्मक जीवनाकडे वळवतो. वेडसरपणाकडे झुकण्याचा त्याचा हाच मार्ग असणार.

**फ्राईडच्या** मताने कलेचे आणि साहित्याचे एकूण एक प्रकार हे अतृप्त कामवासनेची रुपांतरे होत.

"कलाकार हा स्वभावत: वास्तवापासून मागे वळणारा माणूस असतो. याचे कारण वासनांची अतृप्ती त्याला सहन होत नाही. म्हणून तो आपल्या कामविषयक आणि इतर आकांक्षाना आभासात्मक वातावरणात मुक्त विहार करायला लावतो."

कलाकाराच्या मूळ काम संवेदनाना अर्धवेड्याप्रमाणेच अटकाव झालेला असतो. "पण त्यांना इतर वरदान लाभलेले असल्याने ते आपल्या आकांक्षाना निर्मितीत वाट करून देतात. फ्राईडची ही मानवस्वभावाबद्दलची विचारसरणी ही कामवासना आणि मृत्यु या दोन गृहितावर आधारलेली असल्याने, कला आणि विज्ञान यामधील निर्मितीला त्याने दुय्यम स्थान दिले आहे. कलावंताला आपल्या निर्मितीत आणि आभासला पार्थिव रुप देण्यांत मिळणारा, किंवा विज्ञानवंताला समस्या सोडविण्यात वा सत्य सापडण्यात लाभणारा आनंद एका गुणवैशिष्ट्याने युक्त असतो. त्याचे वर्णन एकदा केव्हातरी मानसशास्त्रीय अध्यात्माच्या भाषेंत निश्चित करता येईल. तूर्त मात्र असा आनंद निर्मळ आणि उच्च प्रतीचा असतो असे आपण अलंकारिक रितीने म्हणू शकतो. पण नैसर्गिक रीत्या प्रेरित होणाऱ्या संवेदनांच्या समाधाना-पेक्षा त्याची प्रत खालची असते. कारण त्यांत माणसाच्या शारीरिक अवस्थेत बदल होत नाही.

**फ्राईडच्या** ह्या विचारसरणीतून एक विचित्र निष्कर्ष निघतो. तो असा की, वास्तवाला अनुसरून कामवासनेची पूर्णपणे तृप्ती होत असल्यास, संगीतासह कोणत्याही कलेचा आधार निरर्थक ठरतो. अशा निष्कर्षातील अपुरेपणाची मी दुसरीकडे चर्चा केली आहे. **फ्राईडच्या** स्वत:च्या लेखनातील संगीतासंबंधीचे उल्लेख तुरळक असून ते महत्वाचे सुद्धा नाहीत. तरी पण **फ्राईडच्या** अनेक अनुयायांना त्याचा हा संगीताशी असहकार मान्य नाही. आणि त्यांनी त्याचे मनोविश्लेषणात्मक विवरण करण्याचा प्रयत्न केला आहे.

**फ्राईडचे** मनोविश्लेषण हे माणसाच्या अगदी लहान वयातिल मनोविकसनावर आधारलेले आहे. माणूस पुढे कितीही प्रौढ वा जाणता झाला तरी तो आपल्या या बाल्यावस्थेच्या 'भूतकाळांतून' बाहेर पडत नाही. त्यावेळची त्याची तोंडातूनच प्रकट होणारी कामप्रेरणा, त्याच्या तरुणपणांत धूम्रपान, पेन्सिल चघळणे, किंवा [illegible]ताना तोंड वेडेवाकडे करणे यासारख्या लकबीत पुढे तशीच राहिलेली दिसते. माणसे [illegible]कून गेलेली असताना, किंवा आजारी पडली म्हणजे, ती आपल्या अगदी पूर्वीच्या बाल भावनांत माघार घेतात. या

ठिकाणचे गृहित असे की माणसाच्या प्रौढपणांत, त्याच्यावर लहानपणाचा भूतकाळ एकसारखा प्रभाव पाडीत असतो. आणि तो मोह त्याला टाळता येत नाही. कोणत्याही माणसाची पुरेशी भावनात्मक वाढ होत नाही. हे मनोविश्लेषणाला मान्य असेल तरी माणसाची अशी वाढ खुंटणे, प्रौढत्वाने त्याला ओझे नको असणे, ही गोष्ट मात्र त्या शास्त्राला शोचनीय वाटते. माणसाच्या बाल्यावस्थेत होणाऱ्या परागतींच्या संदर्भात संगीताचा भावनात्मक परिणाम काय होतो याचा खुलासा करण्याचा प्रयत्न काही मनोविश्लेषणतज्ज्ञानी केला आहे. आईच्या अगर तिच्या लहान मुलाच्या कंठातून निघणारे आवाज हे त्या दोघांमधील निकटचा सहवास टिकवून ठेवतात. संगीत हे त्या स्फूट आवाजांतून उद्‌भवले असल्यास ते बाल्यावस्थेतील शब्दहीन वा शब्दपूर्ण संवादाचे प्रतीक असले पाहिजे असा पक्ष त्या तज्ज्ञांनी मांडल्यास तो समजण्यासारखा आहे. पण पटत मात्र नाही. उदाहरणार्थ **कोहट लिहितो :-**

'तथापि संगीत हा मानसिक प्रक्रियेचा शब्दबाह्य प्रकार असून तो माणसाच्या अनुभवाचे परागतीतले प्राथमिक स्वरूप दाखवितो, त्याचबरोबर त्यात सामाजिक आणि सुंदरतेचे सत्त्व असेलही.'

अशा मागील परागत अवस्थेला स्वत:वरचे कमालीचे प्रेम वा स्वयंकेद्रितता असे इतर तज्ज्ञ संबोधितात. म्हणजे त्या वेळेला माणसाचे सत्व हे बाह्य वस्तूपासून वेगळे झालेले नसते. आपल्या कित्येक पेशंटनी संगीत परत परत ऐकण्याची निकड होती असे **पिंचसनॉयने** म्हटले आहे. त्यातल्या काहीना फार पूर्वी गेलेल्या आईची आठवण व्हायची. त्यांना गमावलेला तान्हेपणांतला स्वर्गीय आनंद पुन्हा हवा असायचा. आईने आपल्या प्रेमळ आणि आश्वासक आवाजांत दिलेले अभय त्यांना संगीतात पाहिजे होते. **पिंचसनॉय** असेही सांगतो की त्याच्या काही पेशन्टना संगीताची चटक लागली होती. आणि ते मिळाले नाही तर ते दु:खी होत असत. अशी संगीताची खास हाव असली तरी त्यात त्याना काही गती असते असे मानण्याचे कारण नाही. त्या दोन्हीत काहीसा संबंध असतो एवढेच. **पिंचसनॉयच्या** तर्कानुसार अशा चटक लागलेल्या पेशंटना, आपण आणि आई यांच्यातला तो पूर्वीचा भावनात्मक संवाद पुन्हा हवा असतो. उलट संगीतातील गति ही ध्वनि वा आवाजाला साद घालणाऱ्या संवेदनेत मुरलेली असते. अर्थात यासारखी विधाने ही प्रमाण म्हणून मानण्यापेक्षा केवळ ऐकून घ्यायच्या कथा समजता येतील; कारण अशा विधानाना बऱ्याच हरकती घेता येतात. उदाहरणार्थ शब्दपूर्व संवाद हा बाल्यावस्थेतच असतो, हे म्हणणे टिकण्यासारखे नाही. आई आणि तिच्या लहानग्यातला संवाद हे स्वरमयतेचे प्राथमिक स्वरूप असते. मुलाचे त्यावेळेचे आवाज पुढे संगीतात बोबडे बोल स्पष्ट शब्दांत विकसित होतीलही. म्हणून बोलण्यातली स्वरमयता ही बाल्यावस्थेतच असते असे म्हणता येणार नाही. आपल्या मनातला अर्थ पोचविण्याकरता केवळ शब्द कधीच पुरे पडत नाहीत. शिवाय प्रौढांच्या बोलण्यात अशा स्वरमयतेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण असते. 'खरंच' हा ऊद्गार लक्षात आणल्यास त्यात आश्चर्य, गैरविश्वास, नाकबुली, उतावळेपणा, तिरस्कार असे कितीतरी भाव अभिप्रेत असतात. आणि त्यातला प्रत्येक भाव हा अनेक तऱ्हेच्या स्वरांनी

कळवायचा असतो. नुसत्या शब्दाने हे साध्य होत नाही.

मागील दुसऱ्या प्रकरणात आपण हे पाहिलेच आहे की लहान मुलांच्या उजव्या मेंदूत दुखापत झाली असल्यास त्यांना आपल्या भावना नीट सांगता येत नाहीत. कारण त्यांचे बोलणे एकसुरी असते. तीच अवस्था स्वयंकेंद्रित किंवा भमिष्ट प्रौढाचीही होते. त्यांचे बोलणे विचित्र वाटते. याचे कारण त्यांत मनोविश्लेषण म्हणते त्या बालसदृश स्वरमयतेचा अभाव असतो. रुक्ष भावहीन बोलण्यात मेंदूची इजा वा तसा आजार संभवतो. त्याची पूर्ण बौद्धिक वाढ झालेली आढळत नाही. अलिकडे माणसाच्या आवाजाचे हुबेहूब अनुकरण करीत असलेले कार्यक्रम कॉम्प्युटरकडून केले जातात. तरीसुद्धा सराईत रसिकाच्या लक्षात राहते ते असे की त्यातल्या गाणाराचा आवाज चांगला असला तरी त्यातून त्याला विशेष काही सांगायची इच्छा आहे असे दुर्दैवाने दिसत नाही. प्रत्यक्ष गाणारा मात्र त्यांत दाखल करतो ते स्वरमयतेचे बीज असते.

मागे सांगितल्याप्रमाणे प्रौढ वयात संभोगसुखाचा अनुभव घेतल्यानंतर, एक शांतीपूर्ण तृप्ततेची भावना प्राप्त होते असे **फ्राईडचे** म्हणणे आहे. सांगीतिक आणि कामतृप्तीचा अनुभव यांत साम्य दाखविणे अर्थातच शक्य आहे. संगीतामुळे ते ऐकणाऱ्याच्या मनांत कमालीचा उद्रेक होण्याबरोबर, त्याचा शरीराच्या हालचालीतही फरक पडत असतात. आणि ते संपल्यानंतर, तसे शांत समाधानी वातावरण पसरणे शक्य आहे. पण अशी नेमकी घटना परंपरा चॅम्पियनशिप टेनिस पहाणाऱ्या उत्साही प्रेक्षकजनांतही आढळून येते. यापैकी कोणताही अनुभव म्हणून कामभावनेशी जोडता येतो असे म्हणता येणार नाही उद्रेक संपल्यानंतर लाभणारा विरंगुळा सगळीकडे सारखाच असतो आणि तो माणसाच्या वा प्राणीमात्राच्या जीवनांत अनुभवाला आल्याखेरीज राहत नाही.

"कष्ट केल्यानंतरची झोप, वादळानंतरचा बंदराचा आसरा, काळजीतून सुटका, आणि जगून झाल्यावरचा मृत्यु ह्या गोष्टी फार सुखावह असतात."

संगीत हे सागरसदृश भावनांना प्रेरित करते. असे म्हणून काही विश्लेषणवेत्त्याना **फ्राईडची** वरील विचारसरणी संगीताला लावली आहे. आईच्या अपत्यांना आपण अलग आणि स्वतंत्र आहोत ही जाणीव होण्यापूर्वीच त्या दोघांच्या आनंदमय मिलनाचा भाव संगीत प्रकट करते, अशी त्यांची कल्पना आहे. तथापि ती दोन कारणानी चुकीची ठरते. एकतर संगीत हे सागरसदृश अनुभव देत असले, तरी तसा प्रकार क्वचितच घडतो. शिवाय संगीताच्या प्रत्यक्ष कार्यक्रमांत तर तो फारसा प्रत्ययाला येतच नाही. दुसरे असे की सागरसदृश अनुभवाचे साम्य संभोगसुखाशी वा दुसऱ्या व्यक्तीच्या मिलनाशी असत नाही.

'सागरसदृश' (ओशियानिक) ही संज्ञा **फ्राईडला** त्याचे मित्र **रोमा रोला** यांच्या आलेल्या पत्रांत प्रथम सापडते. **फ्राईडने** धर्मविरुद्ध केलेल्या 'दि फ्युचर ऑफ अॅन इल्यूजन' या पुस्तकातील टीका वाचून, **फ्राईडला** धर्मभावनेचा मूलस्त्रोत समजलाच नाही, असे **रोलॉने** म्हटले आहे. **रोलॉच्या** मताप्रमाणे, ह्या भावनेचा उगम काहीतरी, अनंत, अमर्याद अपरिमित, जणू सागरसदृश' अशा माणसाला होणाऱ्या संवेदनेतून झालेला आहे.

या सागरसदृश भावाचे गूढवादी वर्णन करतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे अशा भावस्थितीने माणूस हा जगताशी आणि स्वत:शी एकरूप होतो. अर्थात हा अनुभव त्याच्या एकट्यापुरता असून, ही एकत्वाची जाणीव परमेश्वर वा विश्वाला उद्देशून असते. आणि तिचा दुसऱ्या माणसाशी मीलन होण्याचा संबंध नसतो. 'सॉलिट्युट' ह्या माझ्या पुस्तकात वर्डस्वर्थ, वॉल्ट व्हिटमन, एडमंड गॉस, ए. एल. रोसे, आर्थर कोएस्लर, बर्नार्ड बेरेन्सन, सी. एस. लेवीस आणि ॲडमिरल बोर्ड यांनी वर्णन केलेल्या सागरसदृश अनुभवांचा मी उल्लेख केलेला आहे.

**फ्राईड** या भावनेला बाह्य जगाशी अतूट नाते असण्याची जाणीव असे समजतो. तो तिचे साम्य उत्कट प्रेमभावनेत म्हणजे स्वत्व आणि वस्तुजात यांच्यामधील अंतर विरून गेले असण्याच्या मन:स्थितीत पहातो. अर्थात ही मन:स्थिती त्याच्या म्हणण्याप्रमाणे बाल्यावस्थेत परागत होते. इतकी की त्यावेळी आईच्या स्तनाला चिकटलले मूल अजून बाह्य जगाशी संबंधित झालेले नसते. **फ्राईडच्या** मताने, हा सागरसदृश अनुभव मुलाच्या बाल्यावस्थेतील, आईशी होणाऱ्या संलग्नतेला सूचित करतो. भावनात्मक अनुभवातून होणारा उद्रेक आणि सागरसदृश मन:स्थिती या दोन्हीमध्ये फरक करणे मला महत्त्वाचे वाटते. दोन्हींनी कधीकधी 'परमानंदाची अवस्था' असे उथळपणाने म्हटले जाते. पण उद्रेक म्हणजे सागरसदृश अनुभव नाही. कारण ह्या अनुभवात शांत स्थिती अपेक्षित असते. मागे उल्लेखिल्याप्रमाणे संगीत ऐकून भावनोद्रेक झाल्यानंतर विरंगुळा आणि तृप्त भावना निर्माण होते. पण संगीताला मिळणारा असा नेहमीचा प्रतिसाद सागरसदृश भावासारखा अलौकिक स्थितीपासून फार दूर असणार.

संगीत चालू असताना काही वेळा आपण भारले वा झपाटले गेल्यासारखे वाटते असे संगीतकार म्हणतात. ही एक प्रकारची विशिष्ट सुखावह अवस्था असून ती एखाद्या मादक द्रव्याच्या सेवनानेहि येऊ शकते. संगीताशी एकजीव झाल्याचा अनुभवही येतो. इतका की ते जणू आपणाकडूनच प्रसृत होत जाते. म्हणजे तर संगीतकार यावेळी स्वत:मधून बाहेर निघून गेल्यासारखा होतो. ह्या अवस्थेचे सागरसदृश अनुभवाशी साधर्म्य सांगता येईल. पण या दोन्हीत पुन्हा गुणात्मक फरक संभवतो. याचे कारण भारावलेल्या स्थितीत शांतपणाचा अभाव असतो. **मार्मनिटा लास्कीच्या** 'एक्स्टसी' ह्या पुस्तकावरून दिसून येते की तिच्या प्रश्नावलीला उत्तर देणाऱ्यांनी बहुतेक वेळा इतर कलापेक्षा सुखकारक चेतना देण्याचे सामर्थ्य संगीतात अधिक असते, इतके की.

"प्रश्नावलीला उत्तर देणाऱ्या साहित्यिक गटात संगीत हेच चेतनादायी असते, असे मत दिसून आले. सुखकारक चेतना देणाऱ्या गुणांचा आणि त्यांच्या परिणामांचा अभ्यास करण्यासाठी संगीत हाच अतिशय उपयुक्त विषय आहे असे मला वाटते."

**मोझार्टचे** 'डॉन गिओव्हनी' हे द्वंद्वगीत ऐकताना कसे वाटले त्याचे वर्णन मला माहीत असलेल्या एका गृहस्थाने केले आहे. त्याला ते गीत अगोदरच चांगले माहीत होते. तरी त्याला त्या गीताने एकदम घेरून टाकले. त्याच्या डोक्यात ते घुसले आणि त्या दिवसाचा

काही वेळ तो बदलून गेला होता. आत्यंतिक आनंदाची एक शांत अवस्था तो अनुभवित होता. तिच्यात तो सबंध मानवजातीशी, जगाशी आणि स्वत:शी एकरूप झाला होता. हयातभर संगीत ऐकणारा हा रसिक प्रथमच सागरसदृश अनुभव देणारे संगीत ऐकत होता आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणे उत्कृष्ट संगीत ऐकून होणाऱ्या शारीरिक उद्रेकापासून तो वेगळा होता.

संगीत ऐकणाऱ्या रसिकापेक्षा ते रचना करणाऱ्या सांगीतिकांना हा सागरसदृश अनुभव अधिक येत असावा. **अलेक्झांडर गोहेर** सांगतो त्याप्रमाणे नवीन संगीत रचना करताना सुरुवातीला त्याला कमालीचे कष्ट पडायचे, त्यावेळी त्याला निराशा, वैफल्य, याबरोबर संतापही येत असे. पण एकदा सूर सुचू लागले की "संगीत स्वत:च लिहू लागते. मग त्याठिकाणी कोणी मजकूर सांगायला रचनाकार नसतोच, फक्त एक, सूर काय सांगताहेत ते ऐकून घेणारा नोकर असतो. अशाच नेमक्या अनुभवाची मी वाट पहातो आणि तो प्राप्त झाल्यावर आपल्याला सगळे काही मिळाले असे वाटते. माझ्या बाबतीत असा अनुभव मला ठाऊक असलेल्या वा कल्पना केलेल्या समाधानाच्या पलीकडे जातो. कारण त्याक्षणी माझ्या सभोवतीच्या जगाशी एकरूप झाल्यासारख्या सागरसदृश भावनेने मी भारून गेलेला असतो."

ह्या प्रकरणाच्या एका ठिकाणी, कामोपभोगासकट माणसाच्या इतर अनेक अनुभवानंतर येणारा उद्रेकानंतरचा विरंगुळा ही सामान्य गोष्ट आहे, असा उल्लेख केला गेलेला आहे. तथापि याहिबाबत लक्षात घ्यायला हवे ते हे की **मार्गनिटा लास्कीच्या** तपासात असे दिसून आले की काम ही एक चेतनाशक्ती आहे असे म्हणणारांनीसुद्धा त्या दोन्हीत फरक केला आहे. संपूर्ण कामोपभोग झाल्यानंतरही 'परमानंद' होतोच असे नाही. याचे कारण परमानंद हा विरंगुळ्यापेक्षा अगदीच वेगळा आहे. उत्कृष्ट संगीताची तशीच यशस्वी मैफील ऐकल्यानंतर आपण तेवढ्यापुरते उचंबळून जातो. आपल्या काळज्या दूर होतात आणि **शोपेनहायर** म्हणतो त्याप्रमाणे सगळ्या व्यथांतून आपण मुक्त होतो. हे खरेच आहे. आणि कामोपभोगातून लाभणाऱ्या तृप्तीशी त्या अनुभवाचे साम्य असेलही. तरीसुद्धा सागरसदृश अनुभूतीशी मात्र त्याची नेहमीच तुलना होऊ शकत नाही.

मानसिक आजाराने ग्रस्त झालेले काही रुग्ण एखादे वेळी त्यांना आनंद झाल्यास त्याचे वर्णन आपण विधात्याशी तसेच निर्मित जगाशी एकरूप झाल्यासारखे करतात. वास्तविक या एक प्रकारच्या वेडसरपणात, न आवरता येणारा क्षोभ, झपाट्याने एकमेकांचे पाठलाग करणारे उलटसुलट विचार आणि भव्योदात्त् आभास, त्याचबरोबर चिडखोरपणा यांचो गर्दी झालेली असते. सामान्य माणसाला होणाऱ्या आनंदात या विचित्र गोष्टी येत नाहीत. उलट झालेल्या आनंदाची सुखावहतेची ते कौतुकाने आठवण करतात. शिवाय आपले मानसिक स्वास्थ्य त्यामुळे सुधारले आहे असेही सांगतात :

तथापि वरील मानसिक आजाराबरोबर दुसरी एक अवस्था आढळते. यावेळी काही माणसे आपल्या आनंदाबद्दल बोलतात. ती तशी आजारी म्हणूनही ठरविलेली नसतात; पण त्यांचा बराचसा काळ, विषण्णता, नैराश्य, वैफल्य यात व्यतीत होतो. हा अनुभव तर

आनंदहीन असणार. अशा अवस्थेला 'आत्म्याची अंधारी रात्र' असे धार्मिक लोक संबोधितात. हे वर्णन प्रत्यक्षापेक्षा अधिक परिणामकारक आहे. **मार्गनिटा लास्कीला** आपल्या 'परमानंद' या पुस्तकात हताशपणावर एक वेगळे प्रकरण समाविष्ट करावे लागले. याचे कारण दोन्ही अवस्था एकाच माणसात आढळून येतात. तेवढ्यापुरत्या शांत वातावरणांत नेऊन, संगीत हे ते ऐकणाराला जीवनाच्या क्लेशापासून दूर ठेवते, असे काही तत्त्वज्ञानी लोकांचे म्हणणे आहे. हा विचार पुढे आपण चर्चेला घेणार आहोतच. तथापि संगीत हे भावनांचा उद्रेक निर्माण करते या वास्तवाशी हा विचार जुळत नाही. असे असूनही, संगीताच्या काहीसा भाग वेगळ्या जगताशी संबंधित असतो; हे खरेच आहे, आणि त्या जगात संगीताचा रसिक वा श्रोता आपल्या कल्पनेने विसर करू शकतोही.

असे होत असताना ते शब्दात सांगणे जरूर असते. मग त्यासाठी ते संगीताच्या चालीत एकादे काव्य गाणे किंवा रचनाकारानेच आपल्या स्फूर्तीचा उगम कसा झाला असे सांगणे हे ओघाने येते. माझ्या मनांत यावेळी बोदलेरच्या 'एल इन्व्हेटेशन' 'आ व्हॉयेज' या काव्याला, डुपारेची उत्कृष्ट चाल, तशीच 'राचमनीनोव्हनी' 'दि ऑइल ऑफ दि डेड' ही परिणामकारक वृंदवादनातील स्वरमेळाची कविता आहे. बोदलेरचा प्रवास त्या विचित्र प्रदेशात समाप्त होत असातना आपण त्याची कल्पना करू शकतो. पण तिथे जात मात्र नाही. राममनीनोव्हला 'दि ऑईल ऑफ दि डेड' या काव्याची स्फूर्ती आमेल्डि बॉकलिन या स्विस कलाकाराच्या चित्राने झाली. ते चित्र एका अनिवासी बेटाचे असून, त्यात फक्त मेलेली माणसेच शांतपणे राहत असतात. बोदलेरच्या कल्पनेपेक्षा जास्त प्रत्ययकारी निर्वाणाचे ते दृश्य होते. कलाकार मात्र त्याला स्वप्नसदृश चित्र म्हणत असे. राममनीनोव्ह हा हताश मनस्थितीत असताना त्याला या चित्राचे आकर्षण वाटले असावे. कदाचित मृत्युचा स्निग्ध छायेतच माणूस दु:खापासूनच दूर होतो; असा त्याचा विश्वास असावा. फ्राईड हा संगीताचा रसिक असता, तर हे संगीत त्याला नक्कीच आवडले असते.

आभासाविषयीचे **फ्राईडचे** एकूण विचार चुकीचे असूनही ते पुन्हा अपुरे आहेत. पण त्यातूनही सृजनशीलतेला वाव मिळतो. आणि त्यामुळे वास्तवाशी जुळवून घेण्याचे नवीन मार्ग सापडतात. इतर कलाप्रमाणेच संगीत सुद्धा जीवनाच्या क्लेशांतून आपली तात्पुरती सोडवणूक करते. पण हा त्याचा अनेकातला एक परिणाम आहे. आणि तो फारसा महत्वाचा तर नाहीच. जीवनाशी सन्मुख होणाऱ्या विविध मार्गात मागे सांगितल्याप्रमाणे संगीत आपली सोबत करते. पण हा विषय अजून संशोधित झालेला नाही.

लेखकाप्रमाणेच संगीतरचनाकारांना काल्पनिक प्रदेशाकडून स्फूर्ती मिळते. १९०३ साली जेव्हा **दूब्यूसीने** आपले 'सोइरी डान्स ग्रेनेड'' हा पिआनो एस्टॅम्पेसचा दुसरा गानप्रकार लिहिला. त्यावेळी त्याची स्पेनबद्दलची माहिती सॅन सेबॅस्टिन मध्ये राहिलेल्या फक्त एका दिवसापुरतीची होती. स्फूर्ती देणारा स्पेन हा त्याच्या कल्पनेतला होता आणि तो तसाच पुढे कायम राहिला. हे त्याने १९०६ ते १९०९ च्या दरम्यान रचलेल्या 'आयबेरिया'चे तीन भाग आणि 'इमेजेस' या वृंदवादनातील दुसरा भाग यावरून दिसून येते.

स्पेनबद्दलचे तसेच अज्ञान **रॉव्हलचेही** होते. त्याचे 'ऱ्हॅपसोडी एस्पाग्नॉल' हे वृंदगीत, एक ह्यूरे एस्पागनोल हा ऑपेरा आणि 'अल्बोरा डेल ग्रॅशिओसो' हे पिओनागीत, ही सगळी त्याचं काळातील होती. **राव्हेलची** आई शुद्ध स्पॅनिश बोलत असे आणि तिने आपला उमेदीचा काही काळ माद्रिदमध्ये व्यतीत केला होता. या रचनाकाराने मात्र स्पेनची सरहद्द कधी ओलांडली नव्हती. कीटस्च्या कल्पनेतील सत्यतेवर ज्यांचा विश्वास आहे, त्यांना "मॅन्युएल डी फालाने" या दोन रचनाकारानी केलेली प्रशस्ती वाचून आनंद होईल. त्या प्रशस्तीत एखादा भूप्रदेश माहीत नसतानासुद्धा बारकाईने आणि अधिकृतपणे त्याचे सत्य या रचनाकारानी जाणून घेतले; त्याबद्दल त्यांना धन्यवाद दिलेले आहेत. काल्पनिक प्रदेशा–बद्दलचे दुसरे उदाहरण **रव्हेलचेच** आहे. त्यात त्याने शब्दांचा वापर सूचक म्हणून केला आहे. त्याची शेहेराझाडे ही गानकृति लिऑन लेकेरेच्या तीन कविताभोवती फिरते. तिला 'ट्रिस्टान क्लिंगसोर' असे **वॅग्नेर** पद्धतीचे नाव दिले आहे. आणि त्यातले एशियाचे वर्णन तर, पर्शिया, हिंदुस्तान आणि चीन यातील प्रत्यक्ष माहितीपासून फार दूर आहे.

हेलन जोर्डान मोरहेन्जने एक हकिकत दिली असून तिच्यात स्फूर्तीसाठी वास्तवांची ताकद पुरेशी नसते, हा **राव्हेलचा** विश्वास प्रकट होतो.

"फेझ येथील डायरेक्टर ऑफ फाईन आर्टस् मि बोरीस मारलो, हे **राव्हेलला** एम्बसी आणि सुंदर बाग दाखवीत होते."

'तुम्हाला काही अरेबियन रचना करण्याची स्फूर्ती व्हावी असा हा परिसर आहे ना?' असे तो म्हणाला, **राव्हेलने** लगेच उत्तर दिले.

मी अरेबियन रचना केली, "तर ह्याच्यापेक्षा ती अधिक अरेबियन होईल."

वाल्टर डी ला मरेची विख्यात कविता 'अरेबिया' हे एक भावगर्भ कल्पित असून त्याचा त्या प्रत्यक्ष देशाशी काहीही संबंध नाही. वास्तविक तो वाळवंटाचा भूभाग असूनही, मरे तिथे नसलेले काळा केशसंभार असलेले गायक, हिरवळीचे नदीकाठ, आणि संथ वहाणारे झरे यांचेच वर्णन करतो. **व्हॉघान विल्यमस्ची** 'सिनफोमिया अंटार्टिका' या नावाखालची सेव्हन्थ सिम्फनी हिचे स्फूर्तिस्थान, कॅप्टन स्कॉटच्या तिकडच्या अखेरच्या मोहिमेत होते. पण अलीकडे जवळजवळ सगळे जग नकाशात येऊन तपासले आणि माणसाच्या पायाखाली तुडवले गेले असताना लेखकांना आणि रचनाकारांना प्रत्यक्ष भूमीभोवती आपापल्या कल्पकनेचे जाळे विणता येत नाही. म्हणूनच ते आता वैज्ञानिक परिकथा किंवा **होल्टस्–** प्रमाणे गालार्धांच्या संगीताकडे वळलेले दिसतात.

तथापि लेखक वा संगीतरचनाकार, आदर्श समाज, सुखानुभूतीची बेटे, पूर्वेकडील देश, किंवा माहिती नसलेली ठिकाणे, अशा विषयांची निवड करतात. म्हणून काही त्यांचा वाचक वा रसिक, तसल्या जागी अवतरत नाही. शेहेरझाडेला संगीत लावताना तसे काही होत असेलही, पण अभिजात संगीताबावत नाव देऊनही, तसे म्हणता येत नाही. रचनाकाराला काल्पनिक प्रदेश हा केवळ चेतना देण्यापुरता असतो आणि अशा स्फूर्तीतून उगम पावते ती



अनुक्रमणिका

संगीतकृती असते. गूढतेकडे निसटणारे ते प्रतिबिंब नसते. **स्ट्रॉव्हिन्की** म्हणतो, त्याप्रमाणे एखादी संगीतरचना पूर्ण झाली म्हणजे तिला तिचे स्वतंत्र अस्तित्व प्राप्त होते. म्हणून संगीत हे रचनाकाराचे हृद्गत कथन करणारा संवाद नसतो तर त्याच्याकरवी तो आपल्या भावनांचे अर्थमाहात्म्य आणि त्याची रचना याना रसिकापर्यंत संक्रमित करीत राहतो.

आतापर्यंत केलेले संगीताचे मनोविश्लेषणात्मक विवेचन हे फारसे उब्दोधक ठरलेले नाही. याचे कारण जीवनाच्या यातायातीतून सुटका होणे हा संगीतानुभवाचा केवळ एक गौण–भाग आहे. पण त्याचा दुसरा भाग मात्र लक्षवेधी आहे. भावजागृतीची अवस्था तिच्या आवेगा–नुसार सुखावह वा क्लेशकारक होऊ शकते असे आपण दुसऱ्या प्रकरणात नमूद केले आहे. पण गोंगाटाबद्दलची कमालीची संवेदनाशीलता ही संगीताचे अधिक आकलन होण्यास मदत करते. असा काही मनोविश्लेषणवेत्त्याचा अंदाज आहे. त्यासाठीचा त्यांचा दावा असा :-

अकस्मात होणाऱ्या गलबल्यामुळे वा कर्कश आवाजाने माणसाची शारीरिक अवस्था बदलते. तो आवाज कसला आहे वा कोठून येतो, याचा आपण तपास करतो. किंवा दचकून तो टाळण्याचा प्रयत्न करतो. एकादे दृश्य नको असेल तर आपण डोळे मिटतो. अगर पाठमोरे होतो. पण कर्णभेदक आवाज टाळणे कठीण होते. मागे फिरून तो नाहीसा होत नाही कुठून तो आवाज येतो हे पाहाणे शक्य होत नसते. आणि ते जमून गेले तरी तो थांबविता येतोच असे नाही. डोळे मिटून घेण्यापेक्षा काम बंद ठेवणे अधिक अवघड आणि कमी उपयोगाचे असते. यंत्रातून सोडलेली हवा अगर गॅस किंवा पोलिसगाडीची सायरन थांबविणे अशक्य आहे. नको असलेला गलबला ही धोक्याची सूचनाही असू शकते. आणि असा अनुभव नसलेला बरा. दक्षिण आफ्रिकेच्या राक्षसी तुरुंगात माणसांच्या किंकाळया, काचाफोडी, कुत्र्यांचे भुंकणे आणि सिंहाच्या गर्जना यांच्या खास टेप बनवून त्या एकएकट्या कैद्यांना, तीव्र आवाजात ऐकविल्या जातात. परिणाम अघोरी होतो.

ब्रिटिश मनोविश्लेषणतज्ज्ञ **डोनाल्ड विनीकॉट** यांच्याकडे एकदा एक सतावून गेलेली बाई आली. तिचा दोन वर्षाचा मुलगा कोणत्याही कर्कश आवाजाने दचकतो अशी तिची तक्रार होती. **विनीकॉटने** त्याच्या हातात एक टिनचे ताट आणि चमचा देऊन त्याला तितकाच आवाजा उलट करायला सुचविले. धोक्याच्या प्रसंगी आपली असहायता दूर करून ताठ राहण्याची ही एक युक्ती असते. ताट वाजवताना होणारी शारीरिक घुसळण ही त्या कोलाहला इतकीच महत्त्वाची असते. ऐकल्या जाणाऱ्या आवाजाचा ऐवज हा असह्य होत असताना शरीरात होणारी चलबिचल स्वाभाविक असणार. ऐकत असताना त्या वातावरणात बदल करून आपण त्यावर मात करायला शिकतो, असे **रॉबीन मॅकोनि** म्हणतो.

आवाज ऐकण्याच्या क्षेत्रात बदल घडवून आणण्याचे दोन मुख्य प्रकार आहेत. (१) समोर होत असलेल्या घटनांचा संबंध आणि त्यातला वेग यात फरक करण्यासाठी शारीरिक हालचाल करणे, (२) नको असलेल्या आवाजावर कुरघोडी करण्यासाठी तितकाच मोठा आवाज काढणे. त्यावेळी आपण गातो किंवा नाचतोही. **विनीकॉटचा** पेशन्ट पुढे संगीत-रचनाकार झाला की नाही, हे आपल्याला ठाऊक नाही. पण त्याच्या आवाजाच्या संवेदन–

शीलतेमुळे, त्यातील ध्वनीचे संकलन, आणि रंजकतेत संघटन करण्याचे कौशल्य त्याला साधले असावे. संगीतरचनाकार नेमके हेच करतात. स्थिर प्रकृतिच्या माणसाना गोंगाट अस्वस्थ करतो. त्यातला एखादा अधिकच संवेदनाशील असला आणि त्या कोलाहलातले नको असलेले आवाज, त्याला बाजुला करता येत नसले तर, त्यातही काही आटोपशीरपणा आणि व्यवस्था आणण्याकडे त्याचा कल होणे शक्य आहे. त्यातून तो काही अर्थ शोधील किंवा जे काही नको आहे, त्याच्याशी तो जुळवून घेईल. **मॅकोनी** याबद्दल थोडक्यात सांगतो:–

"ह्या गडबडीने मला वेड लागायची पाळी आली आहे." या उद्गारात काही खरेपणा असेल, तर ह्या 'संगीताने माझे डोके ठिकाणावर राहाते' अशी उलट विनोदांतहि तितकाच अर्थ निघेल. शब्दांच्या अशा उलटसुलट मांडणीतून भावार्थ निघतो तो असा की, ऐकू येणारा ध्वनिसमूह आणि त्याला होऊ पहाणारा प्रतिसाद यात एक चेतनामय संबंध असतो." ऐकाव्या लागणाऱ्या ध्वनिसमुदायाला प्रतिसाद देताना माणसामाणसात बराच फरक पडतो, हे मला दिसून आले आहे. मागच्या बाजुला संगीत चालू असताना काही लोकाना संभाषण करणे दुरापास्त होते. तर इतरांचे तिकडे लक्ष नसते; किंवा ते तिकडे कानाडोळा करतात. बरीच माणसे घरात टी. व्ही. सेटस् दिवसभर लावून ठेवतात, इतरांचे बोलणे त्याठिकाणी मग चालले असो वा नसो. रेडिओवरचे भाषण ऐकत असताना एखाद्याने मध्येच टीका केली की, काहींचे डोके उठते. आपल्याला दोन गोष्टी एकाच वेळी ऐकता येत नाही, आणि दोघेही काय बोलत आहेत हे कळत नाही अशी त्यांची तक्रार असते. त्यांच्यासमोर केवळ गोंधळ माजतो. नेमके काय ऐकावे, आणि बाकीचे कसे सोडून द्यावे, याची सवय होण्यासाठी, आवाजाच्या समूहातून अर्थपूर्ण आणि विसंगत भागांची निवड प्रथम करावी लागते. घरातल्या इतर कोणाच्याही ध्यानात आले नसताना आईला आपल्या मुलाचे रडणे ऐकू येते. **कोनरॅड लॉरेन्सबरोबर** नास्ता करतानाचा एक प्रसंग मला आठवतो. मधूनच टेबलावरून तो उठला. आणि म्हणाला, "एका बदकाच्या पिल्लाचे कण्हणे मला ऐकू येतेय तो आवाज दुसऱ्या कुणीच ऐकला नव्हता. झाले होते ते एवढेच की ते पिल्लु कुठेतरी अडकले होते."

संवेदनशील मुलाला ऐकू येणाऱ्या अनेक आवाजातून फारच थोडे आवाज ऐकून घेणे हे कठीण होते. ह्याकरिता निराळी योजना अंमलात आणावी असे **पिंचास नॉर्थ** याचे म्हणणे आहे.

या कोंडीतून सुटण्याचा एकच मार्ग म्हणजे ऐकू येणाऱ्या एकूण परिसराशी सन्मुख होऊन त्यावर ताबा ठेवण्याचा प्रयत्न करणे. त्यासाठी एकाच वेळी उभ्दवणारे वेगवेगळ्या वीस ध्वनीकडे लक्ष केंद्रित करून ते आत्मसात करण्याची कुवत लहान मुलात आणावी लागले. याबाबतीतला अगदी कडेचा नमुना वाद्यवृंदाच्या प्रमुख कंडक्टरमध्ये दिसून येतो. वाद्यवृंदातील एकूण संगीत तो साकल्याने ऐकत असताना, त्याचवेळी, प्रत्येक वादनकाराची कामगत निरखण्याची किमया त्याच्या ठायी आढळून येते. वरील प्रकारच्या सूचनेला प्रत्यक्ष प्रयोगातून अनुमती मिळायला हवी हे, या लेखकाला मान्य आहे. पण गोंगाटाने त्रस्त



अनुक्रमणिका

झालेलेच लोक त्यातून व्यवस्था शोधू शकतील,ही कल्पना मात्र विचारात घेण्यासारखी आहे.

भ्रमिष्ट माणसे अति संवेदनाशील असतात, आणि त्यांना आगंतुक, छळवादी, आणि टीका करणाऱ्या नातेवाईकापासून सांभाळावे लागते, हे आपल्याला माहीत आहे. अशा नको असलेल्या गोष्टीने ते बेजार होतात. दुसऱ्या प्रकरणात दोन प्रकारच्या श्रवणाच्या प्रयोगाचा उल्लेख केला आहे. त्यावरून दिसून आले ते हे की, स्थिर प्रकृतीच्या माणसाना त्यांच्या मेंदूच्या डाव्या बाजूने भाषा आणि उजवीतून संगीत जास्त चांगले समजून येते. भ्रमिष्टपणा अगर इतर मानसिक व्यथेल, बळी पडलेल्या लोकांत मेंदूच्या दोन्ही बाजूची कामे स्पष्टपणे वेगळी उरकली जात नाहीत, असे संशोधन सांगते.

ऐकू येणारी माहिती पुढे नीट मनन केली जावी याकरिता मेंदूच्या दोन्ही बाजू अधिक कार्यक्षम केल्या जातात; त्यावेळी काही मनोव्यथाग्रस्त माणसे संत्रस्त होत असल्यास नवल नाही स्थिर प्रकृतीच्या माणसाना अशी माहिती पुरवताना त्यांना नको असणारी, अनुचित वा विसंगत, तर्जुमा जाणीवेतून टळेल अशी अलीकडे काळजी घेण्यात येते. अशा माहितीच्या आक्रमणापुढे काही भ्रमिष्ट संतापल्याची तक्रार होते. कारण त्यांच्यात निवड करण्याची प्रक्रियाच कार्यरत नसते.

सृजनशील कृतीची माणसे अतिसंवेदनशील असतात. बाह्य जगाच्या उपद्रवापासून संरक्षण करील अशी निबर त्वचा त्यांची नसते, असे बऱ्याच लेखकांचे म्हणणे आहे. मानसिक व्यथा आणि निर्मितीक्षमता यांच्यात एक दुवा असतो, असा की निर्मितीला सुसंगत विचार करण्याची, नवीन नवीन कल्पनामधील साम्य शोधण्याची कुवत ही एखादा तरी मनोरुग्ण आलेल्या कुटुंबातच अधिक प्रमाणात आढळून येते. अर्थात सगळीच सृजनशील माणसे मानसिकरित्या आजारी असतात असे मला म्हणायचे नाही. त्यातली काही तशी होतीहि. तरीसुद्धा अपरिचित विचारसरणी ही मनोरुग्ण आणि सृजनशील अशा दोघातही आहे असे दाखविता येईल. आतापर्यंत मिळालेल्या माहितीवरून मात्र दिसून येते ते असे की, बाह्य जगातून प्राप्त होणाऱ्या श्रवणसामग्रीशी मुकाबला करताना दोघांना सारखीच अडचण येत असते. मग ते भाषण, शब्दहीन ध्वनि, वा भावनात्मक उच्चार असोत, गोंधळ अगर गडबड यांच्यासमोर मनोरुग्ण हैराण होतो. तर सृजनशील माणूस आपल्या कृतीमधून त्यात नवा रेखीवणा शोधून त्या आव्हानाला सामोरा जातो. **बॉबर्ट शूमान** आणि **ह्युगो वूल्फ** ह्या दोन संगीतकारांची अशी उदाहरणे आहेत. दोघेही हतबुद्धतेचे शिकार बनले होते. . अशा मानसिक व्यथेला अखेरीला बळी पडले तरीही त्यांचे निमार्तृत्व हे त्या अस्थिरतेचे एक फळ होते, त्यात शंका नाही. **राचमनीनोव्ह** हाही असाच खिन्न वृत्तीचा झाला होता. या अवस्थेत ती तशीच वाहत गेली की, निर्मितीक्षमता अडून राहते. उलट तशा अवस्थेकडे कल होतानाच किंवा तशी सूचना मिळतानाही माणूस निर्मितीला उद्युक्त होतो. या प्रकारच्या विषण्ण वृतीत असताना संगीताखेरीज जगणे अशक्य आहे असे **बर्लिओझ** आपल्या वडिलांना म्हणाला होता. **चेकोव्हस्कीने** सुद्धा अशा आजाराचे धक्के सहन केले होते. त्याने लिहिले आहे 'संगीत नसेल तर वेडे व्हायला कारण मिळते.' त्याचा चरित्रकार जॉन वारक

सांगतो, त्याप्रमाणे **चेकोव्हस्की** खरे तेच सांगत होता.

माणसाच्या अबोध आणि जाणीवेतल्या अशा दोनही मनोव्यापारावर त्याची निर्मितीची प्रक्रिया अवलंबून असते. आपण अजूनही **फ्राईडच्या** प्रभावातून बाहेर आलेलो नाहीत. त्यामुळे अबोध मनातून उद्भवलेली कोणतीही गोष्ट ही भावनात्मक, अविवेकी, न पटण्यासारखी, आणि कदाचित् अनुचितही असते, अशी बऱ्याच लोकांची समजूत असते. वास्तविक तसे काही नाही. अबोध मनाच्या हालचाली या मनोरचनेच्या धारणेला, भावनात्मक आविष्कारा इतक्याच पूरक ठरतात. स्वप्नांतला विचित्रपणाही वरकरणीच असतो. त्यात विसंगती, असंभवनीयता आणि विवेकी मनाला न पटणाऱ्या अनेक गोष्टी जरूर असतात. पण पुष्कळशी स्वप्नेही कथासदृश असतात. माणसाच्या निद्रावस्थेत त्याचे मनन होत असताना जुन्या आणि ताज्या घटना जुळविल्या जातात आणि त्यातून जो भाव निर्माण होतो, त्याचा दुसऱ्याशी संबंध जोडता येत नाही. अशा घटनांच्या सरमिसळीतून स्वप्न हे कथासदृश आकार देण्याचा प्रयत्न करते.

भोवलातचे जग आणि त्यातले स्वत:चे जीवन या दोन्हीचा अर्थ लावणे, तसेच ते दोन्ही अर्थपूर्ण करणे मानवजातीला भाग पडले आहे. अशा तऱ्हेचा विचार मी इतरत्र मांडलेला आहे. माणसाचे वर्तन उत्क्रांतीक्रमामधील खालच्या स्तराच्या प्राणीमात्रांप्रमाणे केवळ मुलभूत संवेदना आणि त्यांना द्यायचा प्रतिसाद यांनीच सीमित झालेले नाही तर त्यातून बाहेर पडून काही नवीन शोधण्याचा प्रयत्न करणे ही त्याची नियतीच होऊन बसते. जगाला आणि स्वत:ला समजून घेऊन त्याला नवीन उद्भवणाऱ्या परिस्थितीशी जुळवून घ्यावे लागते आणि अशा प्रक्रिया त्याच्या मनोजीवनात, अबोध मन आणि जाणीव या दोन्ही करवी होत असतात. जगाच्या व्यवहारात आणि स्वत:च्या हालचाली सुसंगती शोधण्याच्या अबोध मनाच्या प्रयत्नातून त्याची सुटका होत नसते. आणि अशा प्रयत्नाना उत्तेजन देण्याचे, सुसंस्कृत करण्याचे कार्य जाणीवेकडून होत असते. संगीत हे आपल्याला भारावून टाकते याचे एक कारण माझ्या मताने असे की, त्यात आपल्या श्रवणानुभवाला आकार देण्याचे आणि त्याला अर्थवाही करण्याचे सामर्थ्य असते. संगीत वास्तवापासून आपल्याला दूर नेऊन ठेवते किंवा बाल्यावस्थेचा पुन्हा अनुभव आणून देते. या मनोविश्लेषणात्मक भूमिकेचे खंडन करण्याचा मी बराच प्रयत्न केला आहे. तरीसुद्धा बाह्य जगाच्या कोलाहलातून तात्पुरत्या सुटकेचा मार्ग संगीत दाखविते याबद्दल मात्र मला शंका नाही. ही गोष्ट अर्थातच उत्तेजक वाटते. याचे कारण दिवास्वप्नात किंवा निद्रेत अभावत: होणाऱ्या मानसिक घटनांच्या अभिसरणाप्रमाणे यावेळी सुद्धा तशीच प्रक्रिया घडून येत असते. अशी अवस्था प्राप्त होण्याचे, ग्रामीण परिसरात एकट्याने सहल करणे, वा आध्यात्मिक चिंतन करणे, यासारखे दुसरे अनेक मार्ग असतीलही. संगीतात प्रथम भाग घेताना अगर उत्कृष्ट संगीत ऐकताना आपण तेवढ्यापुरते बाह्य उपद्रवापासून सुरक्षित राहतो. एका विवक्षित आणि अलग अशा जगात आपण अवतरतो. तिथे केवळ सुव्यवस्था असते आणि विसंगतीला वाव नसतो, ही एक हितकारक गोष्ट आहे. कारण यावेळी थोडीशी माघार होऊन मानसिक

घटनांची पुनर्रचना होते. ही बाल्यावस्थेकडील परतीची वाटचाल नाही, तरे तीमुळे बाह्य जगाशी सन्मुख होण्याचा मार्ग मात्र स्पष्ट दिसून येतो.

आपल्या एरवीच्या दिनक्रमात संगीत आणि इतर कला अधिक जवळ आल्या तर वर उल्लेखिलेली तात्पुरती माघार जरुरीची वाटणार नाही. युरोपिअन माणसे वागण्यात इतकी ताठर का दिसतात हे इतर संस्कृतीच्या लोकांना कधी कधी समजत नाही न्यू मेक्सिकोत यंगची एका इंडियन टोळी प्रमुखाशी गाठ पडली त्यावेळी तो प्रमुख म्हणाला होता.

'बघा तर ही गोरी माणसं किती क्रूर दिसतात ती : त्यांचे ओठ पातळ, नाक धारदार, चेहऱ्यावर वाकड्यातिकड्या आठया;रोखून बघते त्यांची नजर,त्याना उठल्यासुटल्या काही–तरी पाहिजे असत. काय पाहिजे असत त्याना? ही गोरी माणसं काहीतरी शोधतच असतात. एका ठिकाणी स्वस्थ बसतच. नाहीत ती. बेचैन असतात. सारखी आणि त्यांना काय हवंय, ते आम्हाला समजत नाही. आम्हाला ही माणसच कळतच नाहीत. वेडीच असली पाहिजेत.'

संगीताच्या समारोहाचा परिणाम म्हणून तो जीवनाच्या चक्रव्यूहातून निसटून जाणे. असा असला तर त्याचे कारण असे असावे की, आपल्या व्यवहार संस्कृतीने जीवनात काही करून दाखवावे, आणि त्यात लौकिकदृष्ट्या यशस्वी व्हावे. ह्या वृत्तीने आपणास ग्रासून टाकले आहे. इतके की त्यामुळे आपल्याला एखादा कलाविचार सुचतच नाही. वास्तविक संगीत हा आपल्या दिनक्रमांत जीवनोत्तेजक उत्साहवर्धक द्रव्य असणे शक्य आहे आणि तसे ते असायलाही हवे. आपल्या निद्रावस्थेत किंवा निव्वळ दिवास्वप्नातही जे मानसिक घटनांचे अभिसरण होऊन त्यांना आकार प्राप्त होतो; त्या प्रक्रियेला संगीताचे विशेष, साहाय्य होत असते. निसर्गातून येणाऱ्या असंघटित आवाजांच्या घोषातून लाभणाऱ्या सुखानुभवाचा **स्ट्रॉव्हिन्स्कि** उल्लेख करतो. पण त्याला संगीताचे त्यापुढील परिमाण प्राप्त होत नाही, असेही तो म्हणतो. पण अशा निरपेक्ष अनुभवाच्या पलीकडे आपणांपुढे परत संगीत अवतरते. असे संगीत की जे आपले मानसिक संगोपन करते आणि सृजनशीलतेला प्रेरणा देते.

मनोविश्लेषणतज्ज्ञ अशा मनोवस्थेला 'एक प्रक्षेपक आत्मपरिचय' म्हणतात. म्हणजे या प्रक्रियेत माणूस आपल्या कल्पनेने बाह्य वस्तुजाततेत संक्रांत होतो. अनुकरण करणे ही केवळ विद्या देणाऱ्याची निष्ठापूर्वक प्रशस्ती नसून तो एक अभ्यासाचा मार्ग आहे. अधिक वरदान लाभलेल्याशी एकरूप होताना आपली कुवत वाढत जाते. तात्विक विवरण करण्या-पेक्षा 'मी करतो तसे कर' हा शिक्षण देण्याचा मार्ग अधिक प्रभावी असतो हे संगीत शिक्षकांना माहीत आहे. संगीत हे शरीरातील स्नायूच्या हालचालींना वळण देते. एवढेच नाही तर मनातील घटनातही क्रम आणि आकार आणते. "दि कॉमनसेन्स व्ह्यू ऑफ म्युझिक" या आपल्या ग्रंथातील 'दि पॉवर ऑफ म्युझिक' या प्रकरणात **'जॉन ब्लॅकिंग'** म्हणूनच लिहितो-

"संवेदनाचे विकसन आणि कलाविषयांतून भावनाचे प्रशिक्षण ह्या गोष्टी अगत्याच्या असतातही. पण शिवाय त्या समतोल वर्तन आणि बुद्धीच्या परिणामकारक वापर यासाठी आवश्यक ठरतात."

ऐकू येणाऱ्या विसंगत ध्वनीच्या अतिरेकाने गुदमरून जाण्याऐवजी संगीताच्या साहाय्याने त्याच्यावर आपले संकल्प लादण्याला आपण शिकतो. त्यातली विसंगती टाळतो. महत्त्वाच्या गोष्टीकडे लक्ष पुरवितो. आणि या रीतीने बाह्य जगातील आकृतिमयता शोधू पहातो आणि ती नसल्यास निर्माण करू लागतो. या प्रक्रियेतील सुखानुभवाची तुलना विज्ञानविषयामधील गृहीत प्रमेयातील अनुभवाशीच करता येते. एखाद्या शास्त्रीय उपपत्तीने जगाचे आकलन सुकर झाले की त्याच्या आहारी आपण पूर्वीइतके जात नाही. उलट त्यातील घडामोडीवर आपण नियंत्रण ठेवू शकतो, अर्थात सगळ्याच घटना आपल्या ताब्यात येत नाहीत. भूगर्भशास्त्रा–नुसार आपल्याला कितीही तपशीलवार ज्ञान झाले असले तरी धरणीकंपाचे बळी आपण ठरतोच. ऐकण्याच्या बाबतीत आपण कितीही विवेक बाळगला तरी आकस्मिक आणि कर्णकर्कश आवाजाने आपण अजूनही बेजार होतो. पण जगाच्या अधिक परिचय करून घेतल्यावर आपल्याला धीर येतो. इतरही अनेक तऱ्हेने संगीत महत्त्वाचे समजले गेले असले तरी त्याचे हे कार्य मात्र काहीसे दुर्लक्षित राहिले आहे.

मेंदूला दुखापत झालेल्या लोकांना एरवी न उरकता येणारे कार्यभाग संगीताच्या मदतीने पूर्ण करता येतात. भावनिक रितीने हळव्या झालेल्याचे किंवा मानसिक आजाराने ग्रस्त होत असलेल्यांचे जीवन संगीत सुसह्य करते. संगीत हे बहुतेकांना तितकेसे रोजच्या गरजेचे वाटत नसल्याने त्याचे महत्त्व कमी लेखण्याकडे त्यांचा कल होतो. पण संगीतीशिवायच्या जगाची कल्पना करणे अवघड आहे. संगीताच्या मैफिलीवर बंदी घातली, त्याची आविष्कारसाधने नष्ट केली तरी आपल्या डोक्यात त्याचे सूर गुंजन करीत राहणार आणि त्याचा अनुसार होत असताना आपल्या जीवनात आणि भोवतीच्या जगात सुसंगती आणि अर्थवाहीपणा लाभणार यात शंका नाही.

## २. प्राप्त जीवनाचे समर्थन

"कला आणि एकमेव कला, ती जीवन जगणे शक्य करते, तसे करण्याचा मोह पाडते आणि उत्तेजनही देते"

**– फ्रेडरिक नीत्शे.**

संगीताला महत्त्वाचा विषय म्हणून मानणारा दुसरा तत्त्वज्ञ **फ्रेडरिक नीत्शे** होय. माणसाच्या मूल्यश्रेणीत संगीत आणि इतर कला यांनी केवढे उच्च स्थान प्राप्त करून घेतले आहे, हे नीत्शेच्या लेखनातून आपल्याला कळून येते.

**नीत्शेचा** १८४४ साली जन्म झाला. वयाच्या २० व्या वर्षापासून **शोपेनहायरचे** लेखन त्याच्या वाचनात येऊ लागले आणि काही काळ तो शोपेनहायरच्या मताशी एकरूप झाला. वयाच्या २२व्या वर्षानंतर एकट्याने फिरणे, **शुमानचे** संगीत ऐकणे आणि **शोपेन–हायरबद्दल** विचार करणे हीच आपली विरंगुळ्याची ठिकाणे आहेत, असे तो म्हणत असे. १८६४ सालापावेतो त्याची खिश्चन धर्मावरील श्रद्धा उडून गेली होती आणि **शोपेनहायरचा** नास्तिकवाद त्याला प्रथमच आकर्षिक करू लागला. सौंदर्यविषयक विशेषत: संगीतसंबद्ध



अनुक्रमणिका

अनुभवावर भर देणाऱ्या **शोपेनहायरच्या** आग्रहाचे त्याला कौतुक वाटत असे. मात्र संगीत हे जीवनापासून परावृत्त करणारे नसून ते उपभोगासाठी, उलट उल्हसित करणारे आहे; असा जीवनोन्मुख दृष्टिकोन **नीत्शेच्या** संगीतविषयक लेखनात दिसून येतो. उलट **शोपेनहायरच्या** मतानुसार संघर्षमय आणि दु:खकारक जीवनातून चांगले संगीत आपली सुटका केवळ तात्पुरतीच करते. पण **नीत्शेच्या** म्हणण्याप्रमाणे, जीवनाचा स्वीकार करण्याची प्रेरणा तीव्र करणारी आणि त्याला अर्थ देणारी संगीत ही एक कला आहे. या प्रकरणाच्या सुरुवातीचे त्याचे बोधवचन हेच सूचित करते.

मागच्या प्रकरणात कधीही अंत नसणाऱ्या अतृप्ततेपासून माणसाची मुक्तता सौंदर्यानुभव करते, या **शोपेनहायरच्या** कल्पनेची **फ्राईडच्या** निर्वाणासंबंधीच्या विचारांशी तुलना केली होती. अशा निर्वातात, माणसाचे त्याच्या बाल्यावस्थेकडे परावर्तन होत असते आणि संवेदनाना मोकळीक मिळाल्याने इच्छाशक्तीला तेवढ्यापुरते काम उरत नाही. जीवन हे मूलत:च असमाधानी आणि निराशाजनक असते असे हे दोघेही विचारवंत मानतात आणि त्यातून मुक्तता किंवा मृत्यु ह्यातच त्याचे साफल्य लाभते असा त्यांच्या म्हणण्याचा अर्थ संभवतो.

संगीत कलेत **फ्राईडला** रस नव्हता. तरी साहित्य आणि शिल्प हे विषय मात्र त्याला महत्त्वाचे वाटत असत. पण कलाविषय हे जीवनाला आवश्यक आहेत, असे त्याच्या एकूण अभ्यासयोजनेने गृहीत धरलेले नव्हते. कला आणि साहित्य यांची निर्मिती माणसाच्या अतृप्त वासनांच्या उदात्तीकरणातून होते असे त्याचे मत होते. मनामधील विमनस्कता टाळण्यासाठी कलावंत आपले असमाधान आपल्या कलाकृतीमधून प्रकट करीत असले तरी ते केवळ आभासमय जग आपल्यापुरते निर्माण करतात. प्रत्यक्ष व्यवहारी जगात त्यांना स्वारस्य वाटत नाही. नाटके स्वप्ने वा इतर आभासमय बाबी त्याला बालिश वाटत असत. असमाधानी जीवनातील इच्छापूर्तीसाठीचे ते एक तंत्र आहे असे त्याचे म्हणणे होते. **फ्राईडची** अशी मताप्रणाली तार्किक दृष्टीने शेवटपर्यंत नेली तर प्रत्येक माणसाची कामवासना परिपूर्ण झालेल्या आदर्श समाजात कलाविषयांना जागा राहणार नाही. सांस्कृतिक जीवन हे अर्थातच अपूर्ण असल्याने कलांचे व्यवहार ते काहीसे सुसह्य करू शकतील. याची जाणीव **फ्राईडला** होतीही. पण त्या जीवनाला अर्थपूर्ण करतील ही कल्पना मात्र त्याला अगदीच परकी वाटायची. त्याला अशा गोष्टीची खरोखरच जरूर वाटली तर ती तो कलेऐवजी विज्ञानात शोधीत असे. तरीसुद्धा प्रयोग आणि त्यातूनचे निष्कर्ष याबद्दल तिटकारा वाटत असल्याने त्याच्या मनोविश्लेषणाला शास्त्रीय दर्जा मात्र मिळू शकला नाही.

**फ्राईडपेक्षा शोपेनहायर** कलाविषयात अधिक रमलेला होता हे उघड आहे. संगीत हे तर त्याला विशेष अगत्याचे वाटत असे. तरीसुद्धा, संगीत हे जीवनाचे रहस्य उलगडून दाखविते असा दावा करीत असूनही, जीवनात उत्साहाने सहभागी करण्यापेक्षा, संगीत हे माणसाला त्याच्या कष्टमय व्यापातून मुक्त करते असे मात्र त्याचे म्हणणे होते. म्हणज सौंदर्यानुभव जीवनाविषयी तीव्र उत्सुकता वा त्यातली अर्थनिष्पत्ती निर्माण करण्याला प्रेरणा

देते. ही गोष्ट दोघाही विचारवंताना मंजूर नव्हती. ही दोन्ही माणसे लहानपणापासून नास्तिक होती. हे इथे लक्षात घ्यायला हवे.

**शोपेनहायर** आणि **फ्राईड** यांची **नीत्शे** आणि **युंग** यांच्याशी तुलना करणे मनोरंजक होईल. **नीत्शे** आणि **युंग** हे दोन्हीही विचारवंत, घरातल्या धार्मिक वातावरणात वाढले होते पारंपरिक ख्रिश्चन धर्म त्यांनी पुढे सोडून दिला होता आणि त्याच्या अभावी इतर गोष्टीची स्थापना करायला ते आतुर झाले होते. धार्मिक श्रद्धेला पर्याय शोधण्याचे दोघांचे मार्ग मात्र भिन्न होते. पण त्यांचे विचार काही बाबतीत एकमेकाशी जुळत असल्याने, त्यासाठी केलेली तुलना उब्दोधक होईल असे वाटते.

**युंग** आणि **नीत्शे** या दोघांचे वडील धर्मगुरू होते. **युंगच्या** घरात धार्मिक बाबीवरील चर्चा त्याला लहानपणापासून ऐकायला मिळायची. स्विस रिफार्मर्ड चर्चमध्ये त्याचे वडील मिनिस्टर होते. तसेच त्याचे दोन चुलतेही मिनीस्टर होते. शिवाय त्याच्या आईच्या बाजूने सुद्धा असे सहा मिनिस्टर होते. **युंगच्या** वडिलांना पारंपरिक ख्रिश्चन आचारप्रणालीत तथ्य वाटत असायचे. आपल्या श्रद्धेबद्दल मुलांनी विचारलेल्या प्रश्नांना तो कधी उत्तर देत नसे. या कारणाने **युंगला** आपल्या वडिलांच्या श्रद्धाळुपणाबद्दल शंका येऊ लागली. **युंगने** आपल्या आत्मचरित्रात त्याला पडलेली लहानपणीची धार्मिक स्वरूपाची स्वप्ने आणि दृश्ये नमूद करून ठेवली आहेत आणि त्यातूनही प्रेमळ पिता अशा ख्रिश्चन परमेश्वराच्या कल्पनेबद्दल त्याचा अविश्वास दिसून येतो. पुढे तर ख्रिश्चन रिवाजांचा खऱ्या धार्मिक अनुभूतीशी काही संबंध नसतो याबद्दल त्याला खात्री वाटू लागली.

**नीत्शेचे** आईवडील हे ल्यूशेरन मिनिस्टर्सची अपत्ये होती आणि त्याच्या वडिलांनी तर तशी दीक्षा घेतली होती. **नीत्शे** केवळ ५ वर्षांचा असताना त्याचे वडील मानसिक आजाराने त्रस्त झाले आणि त्यात त्यांचा अंत झाला. तथापि धार्मिक वातावरणात वाढलेला असल्याने धर्मशास्त्र आणि अभिजात भाषाशास्त्र यांच्या अभ्यासाकडे त्याचे मन वळले. धर्मशास्त्राचा अभ्यास १८६५ मध्ये त्याने शेवटी सोडून दिला. ख्रिश्चन धर्माचा तो पुढे कट्टा विरोधक बनला आणि १८८१ साली तर "परमेश्वर निधन पावला आहे" अशी त्याने जाहीर घोषणा केली. त्यातूनच त्याला जीवनाला अर्थ लावण्याची प्रेरणा झाली आणि त्याच प्रश्नाची **युंग** पुढे तद्रूप झाला.

जीवन लाभले आहे तसेच ते पत्करले पाहिजे, त्याचा अर्थ समर्थन वा श्रद्धास्थाने शोधण्याच्या भानगडीत पडूं नये अशीच काही लोकांची भावना असते. आणखी असे की कर्मठ अशी धार्मिक वातावरणात वाढलेल्या लोकांना तसले ओझे टाकून देणे अवघड होते. **युंगचे** पुढील सर्व लेखन विवेचन म्हणजे धर्मश्रद्धेला मन:शास्त्रीय पर्याय शोधण्याचा प्रयत्न होता. त्याचबरोबर सौंदर्याच्या अनुभवात जीवनाच्या अनुभवाचा अर्थ शोधण्याच्या नीत्शेच्या अट्टाहासाला तितकेच महत्त्व होते.

**रोजर स्क्रूटन म्हणतो** – "आध्यात्मिक जिज्ञासेला सौंदर्यानुभव हा पर्याय असतो. या



अनुक्रमणिका

म्हणण्याचे समर्थन हवे असेल तर ते नीत्शेच्या विचारात आणि व्यक्तिमत्त्वात सापडते. **नीत्शेचे** तत्त्वज्ञान कला– विचारातून उद्भवले असून, ते सौंदर्यानुभवातून जगाकडे पाहण्याचा दृष्टी देते आणि नीतिमत्ता आणि श्रद्धा यांनी व्यापलेल्या स्थानावर उदात्तता, भव्यता आणि शोकजनक सौंदर्य यांची स्थापना करते."

माणूस आहे तसा कसा झालेला असतो, याबद्दलच्या **नीत्शेने** आरंभलेल्या आपल्या 'एकहोमो' मधील शोधांचे साम्य, युंगने नाव दिलेल्या 'व्यक्तिमत्त्वाच्या पूर्ततेत' सापडते. युंग धार्मिक परिभाषेत आपले विचार मांडतो, तर नीत्शे सौंदर्यानुभवाला अनुसरून आपल्या कल्पनेचा विस्तार करतो. मात्र दोघेही माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचे रहस्य उलगडून दाखविताना स्वत:च्या जाणीवेचे महत्त्व प्रस्थापित करतात. त्यांच्या मताने तशी जाणीव माणसाने आपणहून साध्य करायची असते, तिच्यात आनुवंशिक संस्काराचा संबंध नसतो.

**युंग लिहितो** – "जीवमात्राच्या मूलभूत विकृतीची उत्कट जाणीव व्यक्तिमत्त्वात आढळून येते. जीवन जगत असताना त्याला दिले जाणारे ते धीराचे आव्हान आहे. त्यातल्या एकूण वैशिष्ट्यांचे ते प्रतिपादन आहे. जीवनाच्या प्राप्त अवस्थेशी समरस होऊन स्वत:च्या निर्धाराला देणारे ते स्वातंत्र्य आहे."

स्वत: निर्माण केलेल्या कलाकृतीत कलावंत आपले वैशिष्ट्य प्रकट करतो, त्याप्रमाणेच श्रेष्ठ व्यक्ति आपल्या मनोविकारावर नियंत्रण ठेवून आणि त्याचे उदात्त स्वरूपात परिवर्तन करून आपल्या स्वभाव वैशिष्ट्याला वळण लावतात असे नीत्शेचे म्हणणे आहे. "सौंदर्यमय अवस्थेतच जीवनाला आणि बाजूच्या परिस्थितीला समर्थन मिळते" या नीत्शेच्या प्रसिद्ध बोधवचनाचा हा अर्थ आहे. आपण स्वत: आहोत तसे होणे हे कलाकृती निर्माण करण्या–सारखेच निर्मिती कार्य आहे. लहानपणापासून होणाऱ्या जोपासनेतला जाच, प्रचलित रूढी, शिक्षण, वर्ग वर्चस्व, धर्मश्रद्धा सगळे सामाजिक निर्बंध आणि संकेत ह्या गोष्टी स्वत:ची ओळख होण्याच्या आड येतात. या सर्वातून सुटका होण्याचे कार्य अशा निर्मितीत होत असते.

व्यक्तिमत्वाची पूर्तता करणे हा एक धार्मिक स्वरूपाचा शोधविषय आहे. कोणत्याही धार्मिक पंथाशी मात्र त्याचा संबंध नाही. **युंगच्या** मताप्रमाणे, हेतुपुरस्सरता मात्र, स्वप्नात आढणारी दृश्ये, भ्रामकपणा यासारखी परमेश्वराच्या आवाजातून भासणारी कल्पकता यातून आपण मुक्त आहोत, याची खात्री पटल्याखेरीज कोणीही मनुष्य मानसिकदृष्ट्या सशक्त असूच शकत नाही. अशा निरर्थक संघर्षातून मनाला शांतात लाभते असे **युंग** म्हणतो.

लोक आपल्या अनुभवाविषयी सांगतात, त्याची गोळाबेरीज केली तरी त्यातला तर्जूमा मिळेल तो असा की स्वत:पुरते ते कोठेतरी पोहोचलेले असतात; त्यात ते स्वत:शी जमवून घेतात आणि विपरीत परिस्थितीला जुळवून घेतात. याचा जवळजवळ अर्थ असा करता येतो की, त्यांनी परमेश्वराशी मिटवून घेतले आहे आणि त्यांच्या तंत्राप्रमाणे आचरण करताना त्यांनी आपली इच्छाशक्ती गमावली आहे. जीवन निरर्थक वाटणाऱ्या मध्यम वयस्कावर उपचार करण्यात **युंग** प्रसिद्ध होता. अशा वेळी त्याप्रमाणे स्वत:च्या बाबतीतही होणाऱ्या यातनांचे निवारणही तो मुख्यत: धार्मिक समस्या समजत असे.

**नीत्शेमध्येसुद्धा** धार्मिक वृत्तीचे अवशेष टिकून होतेच. वास्तविक त्याने ख्रिश्चन धर्माचा त्याग केला होता आणि परमेश्वराचा मृत्यु झाल्याचे जाहीर केले होते. **वॉल्टर कॉफमन** हा त्याचा भाषांतरकर्ता, विवेचक आणि चरित्रकार होता. त्याच्या मताप्रमाणे जीवनाचा अर्थ हिरावून गेल्यामुळे, परमेश्वराचा मृत्यु हा **नीत्शेला** धोका वाटत होता.

**आणि युंग लिहितो – "नीत्शे** आस्तिक नव्हता. पण त्याचा देव मात्र गेला होता. त्याच्या "झरतृष्टाची" शोकांतिका, त्यामुळे अशी झाली की परमेश्वर मृत झाल्याने **नीत्शे** स्वत:च परमेश्वर बनला आणि याचेही कारण म्हणजे तो आस्तिक नव्हता आणि आस्तिकतेचा भ्रम मनात न बाळगण्याची त्याच्यात उमेद होती.'

**नीत्शेचा** अखेरचा शक्तिपात होण्यापूर्वीसुद्धा त्याची दर्पोक्ति आणि भव्यतेची आस प्रबळ होती. पण पक्षाघात झालेल्या माणसात अशी भ्रमिष्ट लक्षणे सामान्यत: दिसून येतातच आणि **नीत्शेच्या** मन:स्थितीचे काहीसे विकृत वर्णन करताना **युंगला** ही गोष्ट लक्षात घेता आली नाही. खरे तर **युंग** समजतो त्यापेक्षा **नीत्शे** हा त्याच्या म्हणण्याशी सहमत होता. व्यक्ति–मत्त्वाच्या पूर्ततेबद्दल **युंग** हा धार्मिक संज्ञाचा वापर करीत असे. तर जीवनाचा अर्थबोध होण्यासाठी **नीत्शे** सौंदर्यसंबद्ध भाषेचा उपयोग करीत होता. **युंग** आणि **नीत्शे** ही माणसे स्वभावाने अगदीच वेगळी होती. तरी दोघांनी धर्मश्रद्धेचा त्याग केल्यामुळे माणसाच्या 'ईगो'–पेक्षा वेगळ्या अशा स्थिर वस्तूची त्यांना गरज वाटू लागली होती. वास्तवता आणि मानसिक गरजा यात समन्वय साधण्याची शक्ती 'ईगो'त असायची. किंबहुना अबोध मनातून प्रस्फुरित होणारा आवेग त्यांना हवा होता. आपल्या "नीति आणि अनीतिच्या पलीकडे" या ग्रंथात **नीत्शे** कलाकाराल आध्यात्मिक शिस्तीची जोड हवी असे प्रतिपादन करतो. त्यात तो भव्यतेची उपासना करीत नाही तर प्रदीर्घ काळात एकाच दिशेने करीत असलेल्या प्रतीक्षेतून बाहेर पडल्यानंतर आपण या जगात राहणे उचित आहे,आणि त्यात सद्‌गुण, संगीत, नृत्य आणि विवेक यांची साधना करावी अशी उपरति माणसाला होतच असते असे त्याचे म्हणणे आहे.

अबोध मनाच्या आदेशपालनाची कल्पना **युंगला** मान्य होती. ती त्याने धार्मिक भाषेत मांडली. पण ती त्याने अबोध मनातून आवाज म्हणून कल्पिली होती. स्वप्नाबद्दल बोलताना तो एकदा मला म्हणाला होता. "माणसाला प्रत्येक रात्री दैवी प्रसाद मिळण्याची संधि प्राप्त होते. वास्तविक धर्म हा मानसोपचार म्हणून तो यावेळी समजत होता. धार्मिक अनुभव ही विलक्षण घटना असून कलेने दिलेल्या अनुभूतीपेक्षा ती पूर्णपणे वेगळी असते, असे त्याचे म्हणणे होते. अबोध मनाचे आदेशपालन आणि त्याचे परिवर्तन ह्या **युंगच्या** कल्पना **नीत्शेच्या** पेक्षा अतिशय संकुचित होत्या. **फ्राईडप्रमाणेच युंगमध्ये** सौंदर्यदृष्टीचा अभाव होता आणि तीच त्याची मर्यादा होती. **फ्राईड** आणि **युंग** दोघेही संगीताचा आस्वाद घेण्याला असमर्थ होते. **युंगच्या** आत्मचरित्रात संगीताबद्दल एकदाच उल्लेख आढळतो आणि तो केवळ किटलीच्या आवाजाचा तो आवाज अनेक ध्वनिमिश्रित संगति असून ते मला ऐकवत नाही असे त्याचे उद्गार आहेत. **युंग** हा संगीतप्रेमी, कवी, चित्रकार किंवा बऱ्यापैकी लेखक असता तरी त्याच्या अमोल मानसविचाराला शास्त्रपूत पाया लाभला असता आणि त्याचे



अनुक्रमणिका

अधिक स्वागत झाले असते. पण परमेश्वराशी कशाही रीतीने संबंध होऊ शकतो ही कल्पना त्याला मनातून काढता आली नाही. त्यामुळे **युंगकरिता** परमेश्वर **नीत्शेसारखा** मेला नव्हता. परिणामी अबोध मनाचे आदेशपालन ही आपली कल्पना **नीत्शेच्या** विचारसृष्टीतील एक अंशभाग होता हे त्याच्या लक्षात आले नाही.

याच्या उलट, **नीत्शे शोपेनहायर** प्रमाणेच कला विषयाना आणि विशेषत: संगीताला आत्यंतिक महत्त्व देत होता. संगीताचा आस्वाद हा क्षणिक सुखानुभव नसून तो जीवनाचा प्रमुख आधार आहे, असे त्याचे मत होते. वर उधृत केलेले **नीत्शेचे** उद्गार लक्षात घेता संगीताची मैफिल आणि कलादालन यांनी चर्चची जागा व्यापून टाकली आहे. अशी त्याची खात्री झाली होती, हे कळून येते. **सॉक्रेटीस** आणि म्हणून **प्लेटो** यांच्या विचाराबद्दल त्याची मते उलटसुलट असली तरी संगीत हे माणसाच्या मनावर अमोघ परिणाम करते हे त्यांचे म्हणणे त्याला मान्य होते. संगीताला एवढे महत्त्व देताना, **नीत्शे** हा अलीकडील बऱ्याच विचारवंतापेक्षा प्राचीन ग्रीक विचारांशी अधिक जवळ झाला होता.

**नीत्शेला** लहानपणापासूनच संगीताची आवड होती. गुस्टाव क्रूग हा त्याचा शाळेतील मित्र होता. त्याचे वडील संगीतप्रेमी होते आणि त्यांचा **मेन्डेलसॉनशी** दाट परिचय होता आणि क्रूगचे घर तर संगीतमयच होते. **मेन्डेलसॉन १८४४** साली वारला त्याच्याशी **नीत्शेची** गाठ पडणे शक्य नव्हते. कारण **नीत्शे** त्यावेळी तीन वर्षाइतका लहान होता. तरीही तेव्हापासून तो क्रूगच्या घरात वावरत असे आणि वय वाढेतो तो संगीत निर्माण करायचा आणि कविताही लिहित असे. पीआनो वादनात तो तरबेज झाला. तसेच स्वतंत्र आणि सांघिक गीते करू लागला. लुई ॲन्ड्रीज सालोम हिच्या काव्याला **नीत्शेने** आपल्या वृंदवादनात आणि संघगीतात स्थान दिले होते. ही गोष्ट मनोविश्लेषणाच्या इतिहासकाराना कदाचित पसंत पडावी. **नीत्शेची** आणि तिची १८८२ सालात भेट झाली आणि तो तिच्या प्रेमात पडला आणि लग्नाची त्याने मागणी केली. तिने ती नाकारली. तरी ती त्याला तसेच कवी रिल्केला स्फूर्ति देत असे. पुढील काळात ती स्वत:च मनोविश्लेषणतज्ज्ञ झाली **फ्राईडची** दाट मैत्रीण बनली. **फ्राईडच्या** कन्सल्टिंग रूममध्ये एका भिंतीवर तिचे चित्र अजून पहायला मिळते. हॅम्पस्टीड मधील **फ्राईड** म्युझियममधील एका भागात 'ती रूम (खोली)' आहे.

संगीत हा **नीत्शेचा** जन्मभराचा ध्यास होता. पुढे तो भ्रमिष्टपणाच्या पलीकडे गेला आणि १९०० साली पक्षाघाताने वारला. तरीसुद्धा म्हणजे शब्दांना वळण देण्याची त्याची ताकत गेली असूनही तो पिआनो उत्स्फूर्ततेने वाजवीत होता. संगीताचा बालपणापासूनचा त्याचा सृजनशील नाद शेवटपर्यंत टिकला होता.

आपल्या 'शोकांतिकेचा उगम' या ग्रंथात 'विचारसरणीचे विभाजन' या विषयावर **नीत्शेने** चर्चा केली आहे. मागच्या प्रकरणात मी तसा उल्लेख केला आहे. सांगीतीक अनुभवाशी तिचा जवळचा संबंध येतो. **बीथोव्हेनच्या** विचारातून नीत्शेने दोन तत्त्वप्रणाली स्वीकारल्या होत्या. **(जोहान जाकोब बाचोफिन (१८१५ ते १८८७)** ह्या प्राचीन संस्कृती या मातृसत्ताक होत्या. अशा उपपत्तीचा पुरस्कर्ता होता) त्या तत्त्वप्रणालीचा संबंध अपॉलो आणि डायोलिसस



अनुक्रमणिका

या देवतांशी जुळत होता. अपोलोनियन संस्कृती ही पितृसत्ताक आणि डायोनिसिअन मातृ-सत्ताक होती असे **बाचोफिनचे** मत होते. **नीत्शेने** त्या दोन्हीचे सुव्यवस्थितपणा आणि स्फूर्ती या दोन प्रवृत्तीत रूपांतर केले. अपॉलो हे प्रकाशमयतेचे दैवत असून माणसाचा आभास आणि त्याची स्वप्ने यांचे ते नियमन करते ते व्यवस्थितपणा, प्रमाणबद्धता, संख्याविचार आणि अनिर्बंध वर्तन यांची नियंता आहे; आणि त्याचा मुख्य आविष्कार शिल्पकलेतून होतो. उलट डायोनिसस ही मर्यादित स्वातंत्र्य, उन्माद आणि कामवासना-पूर्तीतील अतिरेक यांचे समर्थन करते आणि त्याचे प्रकट स्वरूप संगीतात दिसून येते.

माणसाच्या मनातील सुरुवातीची अविवेकी हालचाल आणि त्यापुढील विवेकशीलता अशा **फ्राईडच्या** विचारविभाजनाचा उगम काहीसा **नीत्शेच्या** डायोनिसियन आणि अपोलो-नियन या विचारविभागणीतून झालेला असावा. आपली विचारसूत्रे निश्चित होईपर्यंत आपण **नीत्शेचे** लेखन वाचले नव्हते असे **फ्राईडने** म्हटले आहे. तरीसुद्धा तो युनिव्हर्सिटीत असताना तिथल्या रीडिंग सोसायटीचा तो सभासद होता आणि त्याठिकाणी **शोपेनहायर** आणि **नीत्शे** यांच्या विचारावर चर्चा होत असे हे आत्ता कळून येते. शिवाय उदात्तीकरण (सब्लीमेशन) आणि 'इड' (मनाच्या आंतरिक आणि प्राथमिक स्तरावरील संवेदना) या संज्ञा **नीत्शेने फ्राईडच्या** अगोदर वापरल्या होत्या. **फ्राईड** मान्य करतो त्यापेक्षा त्याच्यावर **नीत्शे** आणि **शोपेनहायर** यांचे ऋण अधिक होते.

**युंगच्या** भाषेत अपोलोनियन अवस्था ही मनाच्या आत्मकेंद्रियततेची द्योतक असून तिच्यात माणूस स्वत:च्या स्वप्नसृष्टित रमून गेलेला असतो. **शोपेनहायरच्या** सौंदर्यविषयक मताशी हे **युंगचे** म्हणणे जुळून येते. मनाची डायोनिशियन अवस्था ही उलट बाह्य जगाला आमंत्रित करते आणि त्यात भावनात्मक रीतीने भाग घेण्याला प्रवृत्त करते. **युंगने** आपल्या 'सायकॉलॉजिकल टाइप्स' (मनोरचनेतील नमुने) या ग्रंथात या विषयावर एक प्रकरण लिहिले आहे. ग्रीक शोकांतिकेचा उगम अपॉलोनियन आणि डायोनिशियन या दोन्ही प्रवृत्तींच्या सम्मीलनातून होतो.असे **नीत्शेचे** म्हणणे आहे (आपल्या नंतरच्या लेखनात नीत्शे-डायोनिशियन या संज्ञेचा, नियंत्रित झालेले मनोविकार, असा वेगळया अर्थाने वापर करतो. मनोविकाराचा त्याग करावा या ख्रिश्चन विचाराचा त्याने धिक्कार केला आहे आणि (डायोनिससविरुद्ध) अपॉलो, ऐवजी डायोनिससविरुद्ध क्रूसावरील फाशी या शिर्षकाचा उपयोग करतो)

**शोपेनहायर** आणि **नीत्शे** या दोघांना जीवनातील भयाण स्थितीची कमालीची जाणीव होती. पण **शोपेनहायर** हा कलेला या अवस्थेतील एक आश्रयस्थान समजत असे. त्यातील निवास हा दु:सह जीवनातून सुटका करून घेण्याचा तात्पुरता मार्ग आहे आणि तो माणसाच्या नंतरच्या विचारमग्नतेत रमून जातो. **नीत्शे** मात्र जीवनापासून अलिप्त राहण्याऐवजी कला ही त्याचा स्वीकार करण्याला सांगते असे प्रतिपादन करतो. त्याच्या म्हणण्याप्रमाणे दुर्बळ माणसेच **शोपेनहायरचे** ऐकतात आणि बलवान सौंदर्यनिर्मिती करून जीवनाचे समर्थन करतात. शोकांतिकेच्या कलेशी या विषयाचा निकटचा संबंध आहे.



अनुक्रमणिका

"जीवनात कितीही बदल झाला तरी मूलत: तो शक्तिप्रेरक आणि सुखावह असतो. हा शोकांतिकेमधील मूलग्राही भाव आत्मिक समाधान प्राप्त करून देतो असे मी अजूनही म्हणतो."

शोकांतिका ही जीवनाचा परित्याग करायला शिकवित नाही. अविश्वसनीय वाटावा अशा भीषण प्रसंगाविषयीची कलावंताची उत्सुक संवेदना ही त्याचे सामर्थ्य आणि भव्यतेविषयीची आकांक्षा प्रकट करते. त्याला भीती वाटत नाही. कलेमध्ये निराशावाद वगैरे काही नसतो. तिचे स्वरूप विधायक असते. मांगल्य आणि सौंदर्य या दोन्ही गोष्टी एकरूप आहेत असे म्हणणारा तत्त्ववादी हा अवनत झालेला असतो. तो आणखी असे म्हणून लागला की त्यात सत्यतेचीही भर असायला हवी तर त्याला झोडपून काढले पाहिजे. सत्य हे विद्रुप असते. "आपणापाशी कला आहे, म्हणून तर सत्यता आपल्याला नष्ट करीत नाही."

जीवनसंग्रामातील भयानकतेची जाणीव असूनही **नीत्शे** तिला विधायक समजतो. **शोपेन-हायरला** उलट त्यात आशादायक असे काही वाटत नाही. त्याचा स्वीकार न करता त्याच्यापासून अलिप्त राहावे असा त्यांचा आग्रह आहे.

**वॉल्टर कॉफमन म्हणतो** – "उदात्तता ही जीवनातील भीषणतेवरचा विजय आहे असे **नीत्शे** म्हणतो. त्यासाठी तो ग्रीक माणसाची तारीफ करतो. कारण तो म्हणजे ग्रीक म्हणतात, त्या जगाच्या इतिहासातील विध्वंसकतेकडे आणि निसर्गाच्या निर्दयपणाकडे उघड्या डोळ्यांनी बघतो आणि बुद्धीप्रणालीतील नकारात्मकतेकडे दुर्लक्ष करून कला-निर्मितीच्या आधाराने जीवनाचे समर्थन करतो."

याचा अर्थ असा की, शोकांतिकेची निर्मिती हा जीवनातील अभद्रतेचा प्रतिवाद असून तो तिच्यावर प्रभुत्व मिळविण्याचा मार्ग आहे. जीवनात उदात्तता असते. हे शोकांतिकेपासून आपण शिकतो. मग त्यात केवेढेही दु:ख असो. त्याचमुळे एरॉईका सिम्फनीमधील किंवा सिंगफ्रीडच्या फ्यूनरल मार्चमधील संथ गतिमानता यातील शोकमग्नता जीवन उन्नत करणारी आहे. हे **नीत्शे** आपल्याला पटवून देतो. संगीतामधील रंजकतेच्या पलीकडे, जाऊन आपण आता अशा अवस्थेला पोहोचलो आहोत की आहेच त्या शोकमय, आनंदकारक, वेदना-कारक आणि उत्साहजनक अशा आयुष्याचे आपण स्वागत करू लागतो. "बर्थ ऑफ ट्रेजेडी" (शोकांतिकतेचा जन्म) या ग्रंथातील **नीत्शेचे** मुख्यसूत्र हे आहे की कला ही जीवनाला अर्थपूर्णता देते. त्याचे प्रतिपादन आणि समर्थन करते.

आपल्याला माहीत असलेले जीवन हे परस्परविरोधी घटनानी भरलेले आहे ही गोष्ट **नीत्शेइतकी** दुसऱ्या कुणाला जाणवली नाही. दु:खाशिवाय सुखाची, अंधारीशिवाय प्रकाशमयतेची, हेटाळणीखेरीज प्रीतीची आणि दुष्टाव्या शिवाय शिवाची कल्पना करताच येत नाही. एखाद्या वेगळ्या जगात असे विरोध नसतीलही. पण आपल्या जीवनात स्वर्गीय सुख आणि नरकयातना या हातात हात घालून चालतात. आयुष्यानंतरच्या, कधीच नसलेल्या जीवनात त्या अलग असण्याचा संभव आहे. म्हणूनच यातून थोर कलेत, शोकमयता समाविष्ट का असते, तिच्यात शोकमग्नतेबरोबर जीवनाचे साफल्य का लाभते, आणि दु:खकारक

जीवनाचा त्याग म्हणजे एकूण जीवनाचाच नकार का असतो, या गोष्टीचा खुलासा होईल.

कलावंताच्या निर्मिती प्रक्रियेला प्रतिकूल परिस्थितीने विशेषत: मानसिक वा शारीरिक अनारोग्याने प्रोत्साहन मिळते. असे **नीत्शेचे** मत होते. मानसिक व्यथांचा सृजनशीलतेशी निकट संबंध पोहोचतो, या अलीकडील संशोधनाचे त्याने स्वागत केले असते. माणसाचा आजार हे त्याच्या निश्चयाच्या बळाला आव्हान असते असे त्याचे म्हणणे होते. आपत्कालाशी यशस्वी मुकाबला करूनच माणसाला त्याचे सुप्त सामर्थ्य कळून येते. आपल्या कवितेच्या शेवटच्या चरणात **हेन** हा कवी पुढील शब्द ईश्वराच्या तोंडात घालतो.

"माझ्या सृजनशीलतेच्या उद्रेकाचे मूलस्त्रोत व्याधिग्रस्तता आहे आणि तिचे शमन झाल्यावर, माझी शरीरावस्था पूर्ववत् होते."

जीवनातील अनेक समस्यांचे धार्मिक अगर कलात्मक रीतीने निराकरण करू पाहणाऱ्या तत्त्वज्ञानाचा उगम शारीरिक उपद्रवातून झालेला असतो. असे **नीत्शे** म्हणत असे.

"न कळलेल्या वा सांगता न येणाऱ्या शारीरिक गरजाचा उपहास करणाऱ्या आध्यात्मिक उपाययोजनाना अंत नाही आणि मला तर असा प्रश्न पडतो की तत्त्वज्ञान हे अखेरीस केवळ शरीर या विषयाचे विवरण आणि तेही चुकीचे करीत नाही का?"

**नीत्शे** हा स्वत:च डोकेदुखी, अपचन, निद्रानाश, आणि अशाच इतर व्याधीनी व्यथित झाला होता आणि त्याच्या शेवटच्या दुखण्यात ती लक्षणेही उमटून येत होती. शाळेत असताना, म्हणजे १८५६ सालात डोकेदुखी आणि डोळ्यांची तक्रार यामुळे त्याला गैरहजर राहण्याची मुभा मिळाली होती. डोकेदुखी ही नेहमीचीच होती. **बाझल** येथील युनिव्हर्सिटी–तील प्राध्यापकाची जागा वयाच्या ३४व्या वर्षी आजारपणामुळे त्याला सोडावी लागली. असे असूनही, त्याने **जॉर्ज ब्रॉन्डर्स** याला पत्रात लिहिले की, "माझे आजारपण हे सर्वात मोठे वरदान आहे. त्यामुळे मला चांगली उमज आली आणि स्वत:विषयीची समज करून घेण्याला धीर मिळाला." आजारपणामुळे तो इतर लोकात फारसा मिसळत नसे. नीत्शेने आपल्या "दज स्पोक झरतुष्ट' या ग्रंथाला "एकटे-पणाचे स्त्रोत्र" असे नाव दिले आहे.

**शोपेनहायरच्या** नकारात्मक तत्त्वज्ञानाशी **नीत्शेच्या** असहकार हा **वॅग्नेरशी** झालेल्या त्याच्या ताटातूटीशी संबंधित आहे. **वॅग्नेरशी** त्याची पहिली गाठ नोव्हेंबर १८६८ सालात पडली. त्यावेळी तो २४ वर्षाचा होता. **नीत्शे** हा त्या संगीतकारापेक्षा ३० वर्षांनी लहान असला तरी त्याचे उत्तेजन **वॅग्नेरला** हवेसे वाटत असे. आणि त्याच्या 'ट्रिस्टान आणि इसोल्डे' या कृतीची **नीत्शेने** तारीफ केली होती. **वॅग्नेरला नीत्शेची** "दि बर्थ ऑफ ट्रॅजेडी" फार आवडली होती. या दोघांची मैत्री जवळजवळ दहा वर्षे टिकली. वास्तविक **नीत्शे** हा सुरुवातीला **शोपेनहायरच्या** चेला होता. पण हळूहळू तो त्याच्या संस्कारातून बाहेर पडला. **वॅग्नेर** मात्र शेवटपर्यंत **शोपेनहायरचा** भक्त म्हणून टिकून राहिला.

आपल्या सिंगफ्रीड या कृतीत **वॅग्नेर** विभूतिमत्वाच्या विचाराने व्यग्र झालेला दिसून येतो. अर्थात अशा हीरोफिगरची कल्पना **नीत्शेच्या** अतिमानवापेक्षा (Superman) वेगळी नव्हती. **वॅग्नेरने** सिंगफ्रीडमध्ये एक विशिष्ट क्रांतिकारक शोधून काढला असे **नीत्शे** म्हणत



अनुक्रमणिका

असे. अगोदरचा आशावादी आणि सिंगफ्रीड पुढे संगळे संकेत नाकारणारा, कायदे, नीति, आणि तशा प्रकारच्या संस्था यांचा नाश करावा म्हणणारा, आणि नवीन समाजाची वाट पाहणारा असा मानव **वॅग्नेरने** अपेक्षिला आहे. पण अखेरीला मात्र त्याचे जहाज एका खडकावर आदळले.

"आणि तो खडक म्हणजे **शोपेनहायरचे** तत्त्वज्ञान होते. जगताच्या दोन परस्परविरोधी कल्पनामुळे **वॅग्नेर** संभ्रमात पडला. मग त्याने संगीतात काय आणले? तो आशावाद होता का? त्याला संकोच वाटला. अशा आशावादाला शोपेनहायरने अशिष्ट आशावाद असे नाव दिले होते. म्हणून वॅग्नेरने 'रिंग' या कृतीचे **शोपेनहायरच्या** पद्धतीने भाषांतर केले. प्रत्येक गोष्ट चुकीची ठरते;तिचा नाश होतो; नवे जग हे जुन्या इतकेच कुजके आहे; त्याला एखादी हिंदी चेटकीण बोलावते आहे."

१८५४ सालच्या अखेरीला **शोपेनहायर** प्रथम वाचल्यानंतर आपण रिंगची भाषा बदलली असे **वॅग्नेरने** स्वत:च म्हटले आहे. पण आपल्या अगोदरच मनात घोळत असलेल्या कल्पना शोपेनहायरने परिणामकारक रीतीने परत मांडल्या असेही त्याचे म्हणणे होते.

**वॅग्नेरचे** शेवटचे नाट्यसंगीत ऐकून तर **नीत्शेला** अधिकच धक्का बसला. १८७७च्या डिसेंबरात **वॅग्नेरने** 'पर्सिफिल'चे हस्तलिखित **नीत्शेकडे** पाठविले होते. आपल्या बाबतीत त्याचा भ्रमनिरास झाला आहे याची कल्पना **वॅग्नेरला** त्यावेळी नव्हती. 'पर्सिफिल'मधील ख्रिश्चन पंथाची प्रशस्ती ही त्याग-वृत्ती आणि स्वत्वाचा परित्याग यांचा गौरव करणारी, आणि अतिमानवतेच्या कल्पनेला विघातक अशी **नीत्शेला** वाटली. **शोपेनहायर** हा नास्तिक होता. तरीसुद्धा त्याचे तत्त्वज्ञान आणि ख्रिश्चनपंथ हे दोन्ही जीवनाच्या निष्फळतेबाबत एकमत आहेत हे **नीत्शेला** मान्य झाले नाही. **नीत्शेला** मात्र पुढे पुढे **वॅग्नेरच्या** पूर्वीच्या पूजा मूर्तीच्या पेक्षा **बिझेट** आणि **ऑफन बाख** यांचे संगीत अधिक आवडू लागले. एका सौंदर्य-विषयक लेखात **नीत्शे** त्याच त्याच्या दैवी पण खेळकर नृत्याचे वर्णन करतो तर दुसऱ्या ठिकाणी तो **बिजेटच्या** 'कारमेन' या संगीतकृतीची उत्साहपूर्ण स्तुती करतो.

"तुम्हाला खरे वाटणार नाही, पण मी **बिजेटचे** अत्युत्कृष्ट संगीत विसाव्या वेळी ऐकले. परत परत ऐकले आणि तरी मी तेच ऐकत बसलो. त्याच्या संगीताने माझ्या अधीरपणावर कुरघोडी केली. त्याचा मला अचंबा वाटला. असे संगीत ऐकून माणूस किती पूर्णतेकडे जातो! मला वाटते तोच एक संगीतकृती बनतो."

"प्रत्येक वेळी ते 'कारमेन' मी ऐकले, तेव्हा आपण एक तत्त्वज्ञ, किंवा जास्तच कोणीतरी आहोत. अशी माझी समजूत व्हायची. मी सुखाचा शांतपणाचा, स्थिरतेचा, इंडियन माणसाच्या पावित्र्याचा जवळजवळ पाच तास अनुभव घेत होतो."

**नीत्शेचे** विचार ज्यांनी वाचले नसतील त्यांना तो विनोदप्रियही होता, हे कळणार नाही. **बिजेट** आणि **वॅग्नेर** यांची तुलना म्हणजे उपरोधिकपणाचा नमुना होईल असे तो म्हणत असे.

**नीत्शेला** संगीत हे मध्य समुद्रोन्मुख व्हायला हवे होते. जर्मन भावनात्मकतेचा स्वाभिमान त्यात त्याला नको होता आणि **वॅग्नेरच्या** मृत्युविषयीच्या विवंचनेऐवजी, निरभ्र आकाश

आणि दक्षिण प्रदेशातील प्रकाशमय कामोत्सुकता पाहिजे होती.

'जर्मन संगीताबद्दल सर्व प्रकारची सावधगिरी बाळगली पाहिजे' असे मला (**नीत्शेला**) वाटते.

"एखाद्याचे माझ्याप्रमाणेच दक्षिण प्रदेशावर प्रेम आहे असे समजू. तो प्रदेश तर स्वत:च्या कोणत्याही व्याधीतून मुक्त करणारे शिक्षण केंद्र आहे. त्याठिकाणी भरपूर सूर्यप्रकाश आणि आरोग्याचे वरदान असून माणसाच्या स्वत्वावर आणि आत्मविश्वासावर उजेड पाडतो; असा माणूस जर्मन संगीताबद्दल जागरूक राहाण्याला इथेच शिकेल. नाहीतर तो स्वत:च्या मनोधारणाच नव्हे तर प्रकृतीही बिघडून ठेवील."

शेवटच्या काव्यात **नीत्शेने वॅग्नेरला** बहिष्कृत केले असले तरी त्याचे ऋण मान्य केल्याशिवाय मात्र तो रहात नाही. आपल्या शेवटच्या 'एके होमो' (ECCE HOMO) या ग्रंथात **वॅग्नेरच्या** संगीताखेरीज आपण आपला उमेदीचा काळ व्यर्थ दवडला असता आणि तो असह्य झाला असता. आपल्या जीवनावरील तो उपकारकर्ता होता; हा मजकूर **नीत्शेने** १८८८ सालात म्हणजे आपल्या अखेरच्या प्रमिष्टपणाच्या अगोदर लिहिला होता.

अपॉलोनियन आणि डायोनिशियन या दोन्ही प्रवृत्तींचे सम्मीलन व्हावे या **नीत्शेच्या** आग्रहाशी **शोपेनहायरचे** मत पुढीलप्रमाणे जुळते.

"आयुष्याच्या क्रमांत माणसाचे मस्तक आणि अंत:करण अधिकच अलग होऊ लागतात. ती माणसे नेहमीच स्वत:च्या व्यक्तिगत भावना आणि वास्तवाची जाणीव यात फरक मानतात."

सौंदर्यप्रेरक अनुभव हा एकटाच जीवनाचे समर्थन करण्याचे साधन आहे. हे **नीत्शेचे** मत व्यक्तिनिष्टता आणि वास्तवता, म्हणजेच मन आणि शरीर यांच्या समन्वयावर अवलंबून असते. "माझे सगळे लेखन मी सबंध शरीर आणि जीवनानिशी लिहिले आहे असे 'विल-टू-पॉवर' या आपल्या ग्रंथात **नीत्शे** म्हणतो. कला ही शारीरिक अनुभवावर थेट परिणाम करते आणि म्हणूनच जीवन हे शोककारक असले तरी जगण्याला सामर्थ्य प्राप्त करून देते."

'गे सायन्स' या ग्रंथात **नीत्शे** लिहितो. "माझे सगळे शरीर संगीताकडून काय मागते असे मी नेहमीच स्वत:ला विचारतो. मला वाटते त्याच्यातून शरीरातील सर्व हालचालींना चेतना मिळते आणि तिला सहजगत्या पण उठून दिसणारी पुरेशी लय लाभते. त्यामुळे माझी शोकमग्नता लुप्त पावते; म्हणून तर मला संगीत हवे असते."

**नीत्शेची** ही मतप्रणाली लक्षात आली म्हणजे त्याने ख्रिश्चन पंथाला बहिष्कृत का केले याचे नवल वाटणार नाही. ख्रिश्चन वर्णनातले निरस पारंपरिक स्वर्गाचे चित्रण त्यातील देवदूताकडूनचे परमेश्वराचे चिंतन आणि त्यातील दु:ख, मरण, पाप आणि अंध:कार यांची हद्दपारी या बाबींसारख्या दुसऱ्या कोणत्याही कल्पना त्याच्या मनात नव्हत्या, शोकमयता सोडणे म्हणजे जीवनालाच इन्कार करणे होय.

ख्रिश्चन पंथाचा निषेध करण्याला **नीत्शेचे** दुसरे कारण घडले ते असे की तो पंथ आत्म्याला शरीरापेक्षा श्रेष्ठ मानत असे आणि कामवासनेला त्याज्य समजत असे. उलट **नीत्शेच्या** दृष्टीने श्रेष्ठ व्यक्तीने संयम बाळगून मनोविकाराचे उदात्तीकरण करावे. पण या दोन्ही गोष्टी नष्ट कराव्यात असे मात्र त्याचे मत नव्हते. शरीराच्या गरजा पूर्ण न करणे ही धोक्याची गोष्ट आहे असे **फ्राईडप्रमाणेच नीत्शेचे** मत होते. उलट मनोविकाराचे निर्बलीकरण हे गुन्हेगारीला प्रवृत्त करते, असेही **फ्राईडसारखे** त्याचे म्हणणे असे, "दज स्पोक झरतृष्ट" या ग्रंथात त्याने "ऑफ दि डिस्पाइजर्स ऑफ दि बॉडी" (शरीराची तुच्छता) या विषयावर एक प्रकरण लिहिले आहे.

"मी शरीर आणि आत्मा असा दोन्हीही आहे असे लहान मूल म्हणते आणि इतरांनी मुलासारखे कां बोलू नये?"

"पण जागृत झालेला आणि सुसंस्कृत माणूस म्हणतो की, मी संपूर्णत: शरीर आहे; दुसरे काही नाही, आणि शरीरात दुसरे काही असले तरी त्याला केवळ आत्मा हे नाव देता येईल."

"शरीर हे बुद्धिमत्तेचा विकास आहे, एकाच अर्थाने त्यात विविधता आहे. त्यात युद्ध आणि शांति तसेच समुदाय आणि त्याचा नेता दोन्हीही असतात."

"हे बंधो तू जिला चेतना म्हणतोस ती तोटकी अशी तुझी बुद्धिमत्ता ही सुद्धा तुझ्या शरीराचे एक साधन आहे, एक खेळणे आहे."

"तू स्वत:ला 'मी' म्हणतोस आणि त्याचा तुला अभिमान वाटतो. पण तुला खरे वाटणार नाही तरी त्याहीपेक्षा तुझे शरीर श्रेष्ठ आहे आणि ते मी म्हणत नसून मी कलाकृती करतो असे म्हणतो."

संगीतातील महत्त्वाच्या प्रक्रिया या माणसाच्या शरीररचनेत सापडतात. तसेच समाजातील इतर व्यक्ति संबंधातून त्याचे अभिसरण होते. हे **जॉन बॅकिंगचे** मत **नीत्शेने** मान्य केले असते. आपल्या 'बिल टू पावर' या ग्रंथात संगीताच्या परिणामाविषयीचे नीत्शेचे मत ल्बकिंगच्या म्हणण्याचाच प्रतिसाद आहे.

"मनुष्याच्या स्नायूवर आणि मनावर कोणतीही कला आपले सुचकतेचे सामर्थ्य निदर्शनास आणते. ती कलात्मक मनाला प्रथम चेतना आणते. त्याच्याशीच मग ती संवाद करते. त्याच्या शरीरात सक्रीयता आणते. सुरांच्या साहाय्याने त्या मनाला बळ येते, म्हणजे बळ आल्याची भावना निर्माण होते असे उत्तेजन मिळाल्यावर त्याची संवाद करण्याची आणि आकलनाची शक्ती वाढू लागते. इतर माणसाविषयीची आत्मीयता ही नैतिक गोष्ट नसून ती एक शारीरिक स्वरूपाची सूचकता असते. संगीताशी तुलना केल्यास, शब्दानी पोहोचविलेल्या भावना संकोच प्रकट करतात. शब्द उथळ आणि अमानुष होतात. ते व्यक्तिमत्त्वाचे हरण करतात आणि असाधारण गोष्टीना सामान्यपणात बसवितात."



अनुक्रमणिका

'दि बर्थ ऑफ ट्रॅजेडी' या ग्रंथात भावकवी हे संगीतातील चैतन्याचा आविष्कार करण्यास असमर्थ असतात या गोष्टीवर नीत्शेने भर दिला आहे. तरीसुद्धा शोपेनहायरने जेवढे दिले आहे, तितकेच विशेष महत्त्व त्याने संगीताला दिले आहे.

संगीत हे विश्वव्यापी स्वरूपाचे प्रतीक आहे आणि ते प्रकट करण्याला भाषा ही कधीच पुरेशी समर्थ ठरलेली नाही. याचे कारण माणसाच्या अंत:करणातील अतिप्राचीन काला- पासूनच्या विसंगतीचे आणि वेदनांचे संगीत हे प्रतीक असून ते जाणून घेऊ पाहाणाऱ्या खगोलज्ञाच्या आत्मशक्तिच्याही बाहेर आहे; किंबहुना असेही म्हणता येईल की, खगोलज्ञांना ज्ञात असलेले जे काही विश्वरूप आहे ते केवळ या अवाढव्य विश्वरूपाची सूचना करून थांबते. म्हणून भाषा ही या ज्ञात स्वरूपाची सूचक असल्याने तिच्याकडून संगीताचे ह्रद्गत कधीच उलगडून दाखविता येणार नाही. तसा प्रयत्न केल्यास संगीताला केवळ स्पर्श केला जाईल आणि ते करू पाहणारे भावकाव्य एरवी कितीही परिणामकारक असले तरी ते आणखी मागे पडते. आपल्या विल टू पावर (Will to Power) या ग्रंथात **नीत्शे** परत लिहितो की,"शब्द आणि त्यातले विचार हे बाजुला ठेवले तर संगीताचा कितीतरी फायदा होईल."

भाषेच्या अपुरेपणाच्या नीत्शेने केलेल्या वर्णनाला एका अनपेक्षित ठिकाणाकडून आधार मिळतो. **पॉल व्हॅलेरी** या कवीला संगीतकारांचा हेवा वाटतो. याचे कारण संगीत निर्माण करण्यासाठी ते जे स्वर वापरतात ते अत्यंत नेमके, तोलून आणि मापून घेतलेले आणि निश्चित जागेवर स्थिर केलेले असतात. उलट कवींनी उपयोजिलेले शब्द हे बहुधा संदिग्ध आणि गैरसमजाला वाव देणारे असतात. भाषा ही एक व्यवहारातील घटक आहे आणि म्हणून तिला स्वत:चा आकार नसतो. प्रत्येक जण तिचा आपल्या गरजेनुसार वापर करतो आणि आपल्या लहरीप्रमाणे तिला विकृतही करतो. ती कितीही व्यक्तिमत्त्वाला धरून असली आणि माणसाचा विचार स्पष्ट करण्याच्या प्रयत्नात असली तरी तिचा उगम त्याच्या हिशेबीपणात आणि शेवट व्यवहारी उद्दिष्ट साधण्यात असतो. आता कवींच्या पुढे प्रश्न असा पडतो की, अशा या व्यवहारी घटकातून, वेगळे आणि अतिशय दूर असे एखादे साधन निर्माण करायचे, याबाबतीत संगीतकार किती सुखात असतात. त्याच्या कलेच्या अनेक शतकांच्या विकासातून त्याला विशिष्ट स्थान प्राप्त झालेले असते. प्राचीन काळापासूनच्या निरीक्षणातून आणि प्रयोगांमधून, त्याला गोंगाटातून स्वरांचे विश्व निर्माण करता आले आहे. हे स्वरांचे नवीन घटक, ओळखू येणारे नेमके, आणि स्वत:ची आकृती असलेले असून, त्याचा पडताळा वाद्यवादनातून पटू लागतो.

बोलण्याची भाषा आणि संगीत यामधील तफावतीचा मी मागेच उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणे इतरांच्या कानापर्यंत पोहोचविणारी आणि कल्पनांचे संक्रमण करणारी तात्त्विक आणि वस्तुनिष्ट भाषेची, आणि भावनात्मकतेपासून ती दूर असण्याचा विषय यांचीही चर्चा मागे केलेली आहे. **नीत्शे** जेव्हा शब्द हे व्यक्तिमत्त्वाचे हरण करतात असे म्हणतो. त्यावेळी



अनुक्रमणिका

त्याला ही अशी भाषा अभिप्रेत असावी. विचारप्रधान भाषेच्या वापरासाठी, तिची भावना-त्मकतेपासून, म्हणजेच मनाची शरीरपासून फारकत होणे अवश्य आहे. यावरून सुचते ते असे की, अशी विभागणी मिटवून टाकण्याचा संगीत हा एक मार्ग आहे. **झुकर कॅन्डलीच्या** "आवाज आणि सूचकता" (Sound and Symbol) या ग्रंथातील विवेचन नीत्शेला कदाचित मान्य झाले असते.

"शब्द भेद निर्माण करतात, स्वर एकत्र आणतात, जगण्यातल्या एकजीवीपर्यंत शब्द हे नेहमीच ताटातूट करतात. एका गोष्टीपासून दुसरीला वेगळी ठरवितात. थोडक्यात ते व्यक्ति-निष्ठतेपासून वास्तवाला दूर ठेवतात. स्वराकडून मात्र त्यांना एकत्र आणले जाते. सगळे जग केवळ भाषेमध्ये संक्रमित करण्याला संगीत प्रतिबंध करते आणि माणसाला व्यक्तित्व हीच आणि एक वस्तू म्हणून होण्याला अटकाव करीत असते. अलीकडील वाद्यवादनामधील स्वरांचे सामर्थ्य आणि त्याचबरोबर, आधुनिक विज्ञानातील शब्दांना वस्तुनिष्ठ बनविण्याचे तितकेच सामर्थ्य ह्या दोन्ही घटना व्यक्तित्व आणि वास्तवता यातील विभागणीला अनुसरूनच झालेल्या दिसतात."

या ठिकाणी **नीत्शे** आणि **झुकरकान्डली** हे दोघेही विज्ञानातील आणि तात्विक विचारांच्या विवरणातील भाषेविषयी बोलत असतात. तथापि ती भाषा जरी व्यक्तित्व आणि वास्तव या विभागणीला महत्त्व देत असली, तरी भाषेचे दुसरे अनेक प्रकार वेगळ्याच कारणासाठी उपयोगात आणले जातात. वक्तृत्व हा प्रकार भावनोत्तेजक असून तो आपल्या ज्ञानात कोणतीच भर न घालता आपल्याला आकर्षित मात्र करू शकतो. **हिटलेरच्या** भाषणातील मागे उल्लेख केलेला नमुना पाहून ही गोष्ट आपल्या लक्षात येते. काव्यवाचनाने गैररसमज होणे शक्य असते. असे **व्हॅलेरी** सुचवित असला तरी ते मनाला भारून टाकते आणि उद्दीपीतही करते. इतके की बाजूच्या जगाकडे आपण नवीन दृष्टीकोनाने पाहू लागतो. गिबनच्या गद्यांतील भाषा तिच्या लयकारीतील बांधेसूदपणा आणि त्यातील एकमेकांना तोलून धरणारी वाक्ये नजरेखाली आणली किंवा **फ्राईड** आणि **बर्ट्रांड** रसेल यांच्या लेखनातील रेखीवपणा पाहिला की त्यातील शैलीच्या परिणामाने त्यातील आशयाकडे आपले दुर्लक्ष होते. **रूसोचे** ग्रंथ आपल्याला अनेकवेळा वाचावे लागले, असे **कान्ट** म्हणतो. त्याचे कारण त्याच्या लेखन- शैलीतील सौंदर्याने पहिल्या वाचनापासूनच त्यातील आशयाकडे त्याचे दुर्लक्ष होत गेले. नीत्शे म्हणतो म्हणून शब्द हे नेहमीच उथळ आणि अमानुष असतात असे नव्हे.

यावरून म्हणावयाचे ते असे की कोणत्याही कलाकृतीत डायोनिशियन आणि अपोलोनियन घटकांचे कमी अधिक प्रमाण असल्याखेरीज ती कलाकृती म्हणून होऊच शकत नाही; याचे कारण तिचे स्वरूप मानवी भावना आणि त्यांचा नेटका आविष्कार यावर अवलंबून असते. संगीतातील डायोनिशियन घटकावर **नीत्शेने** भर दिल्यामुळे, संगीतकाराला आपल्या आविष्कारात योग्य त्या मांडणीची गरज असते, या गोष्टीकडे मात्र त्याचे दुर्लक्ष होत नाही. **वॅग्नेरच्या** निराशाजनक भूमिकेमुळे संगीत आपले जीवनप्रतिपादक स्वरूप हरवून



अनुक्रमणिका

बसते. या **नीत्शेच्या** विचाराला याठिकाणी फारसे महत्त्व देण्याचे कारण नाही. महत्त्वाची गोष्ट ही आहे की, इतर संगीतकारांच्या कृतींतून तसे स्वरूप उठून दिसते या गोष्टीवर त्याचा विश्वास असतो.

**नीत्शेच्या** संगीतविषयक विचाराचे असामान्य आणि लक्षात ठेवण्यासारखे गमक असे दिसते की, ती संगीत ही कला जीवनाचा स्वीकार करायला लावणारीच नव्हे तर त्याचा उपयोग करण्याची प्रेरणा देते असे तो आग्रहाने म्हणतो. **चेकोव्हस्की** आणि **बर्लीओझ** निराश पावत त्याप्रसंगी संगीताने त्यांना सावरून घेतले होते. **नीत्शे** तर पुढे जाऊन म्हणतो की, संगीत हे जीवनाला उपकाराच नव्हे तर प्रेरकही असते. त्याच्या मदतीने मनातील विकार हेही उत्साहजनक बनतात. अवास्तव अशा दूरच्या जगांचा विसर हे संगीत पाडते आणि कला म्हणून प्राप्त जीवन उन्नत करून माणसाला शोकांतिकेच्या पलीकडे नेते.

त्याच्या विचारप्रणालीप्रमाणे दुसरी गोष्ट जाणवते. ती अशी की संगीताला शारीरिक तसेच भावनात्मक अधिष्ठान असते. ते शरीरांतर्गतच असते. मग त्याला अपोलोनियन तंत्र कोणताही आकार आणि संघटितपणा देतो. 'एके होमो' या ग्रंथातील पूर्वीच्या लेखनाची चर्चा करीत असताना आपल्या 'बर्थ ऑफ ट्रॅजेडी' विषयी तो म्हणतो,"एक प्रचंड आशाविश्व निर्माण होते आणि संगीताला यापुढे डायोनिशियन भवितव्य आहे. हा विचार सोडून देण्याला मला कोणतेच कारण दिसत नाही."

संगीत हे अपोलो आणि डायोनिसस. या दोन्ही प्रणालींचा शोकांतिकेसारखाच संगम घडवून आणते. हा त्याचा तिसरा महत्त्वाचा विचार वाटतो. ख्रिश्चन पंथाने कलाक्षेत्रातून डायोनिससला हद्दपार केले असले तरी त्याचा आनंदकारक असा पुनर्जन्म होईल असेही तो म्हणतो.

१८७१ सालच्या अखेरीस एका पत्रात तो लिहितो. संगीतामधून मला लाभले, ते पुढील पिढीच्या काही शेसवाशे लोकांना मिळाले तरी मला एका अगदी अभिनव संस्कृतीची अपेक्षा करता येते. मात्र काही प्रसंग असे येतात की, आजच्या संगीतातून राहून गेलेले आणि न कळलेले जे काही असेल, त्यांचा विचार करताना मला कीव आणि भीतीही वाटते.

संगीत ही इतकी अर्थपूर्ण कला आहे की, तिचा आविष्कार माणसाच्या प्राप्त जीवनात स्वारस्य आणून देतो. ही **नीत्शेची** विचारसरणी प्राश्चात्य राजकारण्याच्या आणि शिक्षण–विदांच्या व्यवहारी विवंचनेपासून फार दूर गेलेली दिसते. तंत्रकौशल्याने व्यापलेल्या अलिकडच्या जगात स्त्रियांना आणि पुरुषांना जीवनोपयोगी म्हणून विज्ञानात आणि व्यवसायात तज्ज्ञ करावे आणि त्यांचे उपजीवन उच्च स्तरावर आणावे ही त्यांची काळजी रास्तच म्हणावी लागेल. पण उच्च प्रतीच्या जीवनात त्याचा आस्वाद घेणे जमून जाते असे नाही. ते काम कलांचे आहे आणि त्यातूनही ते संगीत या कलेचे आहे असे **नीत्शेचे** म्हणणे आहे. माझ्या कल्पनेप्रमाणे अलीकडच्या इतर तत्त्वज्ञानापेक्षा, **नीत्शेची** संगीताची समज अधिक व्यापक तशीच सूक्ष्म दृष्टीची असलेली आढळून येते आणि त्याचे कारण, तो स्वत:च एक निपुण पिआनोवादक आणि संगीतकार होता.



अनुक्रमणिका

**फ्रांझ काफ्का**
**(१८८३-१९२४)**

**जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा जर्मन कथा-कादंबरीकार.**

**विसाव्या शतकातील या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा मराठीमधील पहिला ग्रंथ**

# थोडाबहुत काफ्का

**शकु नी. कनयाळकर**

**१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.**
**'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.**

चरित्रपट, वाङ्मयसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

**मूळ किंमत रु. २००**
**'नवी क्षितिजे' च्या वर्गणीदारांना सवलतीची किंमत रु. १२०**

त्वरित संपर्क साधा
**नाना जोशी**
**४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०० ०१२**

अनुक्रमणिका